॥ श्रीगणेशायनमः ॥

# पौराणिक आर्यस्त्रीरत्नें !

## भाग १ ला.



मुद्रक व प्रकाशक,

दामोदर लक्ष्मण लेले.

यांनीं

आपल्या "मोदवृत्त" छापखान्यांत

वांई मधली आळी घर नं० ४१० येथें छापून

वांई, मधली आळी घर नं० ४१० येथें

प्रसिद्ध केलें.

आश्विन शुद्ध १० शके १८३८.

किंमत १॥ रुपया

# प्रस्तावना.

**श्री भगवज्जन जो जो**
**जी जी त्याची महासती भार्या ॥**
**तीस नमस्कार असो**
**मजवरि ती बहु दया करो आर्या ॥**

पृथ्वीच्या पाठीवर अनेक देश आहेत; आणि निरनिराळ्या देशांत निरनिराळे कित्येक धर्म प्रचलित आहेत. धर्मवैचित्र्यानुसार भिन्नभिन्न धर्मांतील धर्मतत्वें जरी परस्पर विरोधी दिसतात व निरनिराळ्या देशाच्या स्थितिवैचित्र्याप्रमाणें देशोदेशीं जरी आचार व चालीरीति यांच्यामध्यें भिन्नता दिसून येते तरी धर्म, उन्नत नीति व सदाचार यांसारख्या महत्वाच्या गोष्टींचीं मूलतत्वें कोठेंही समभावीच आहेत असें आढळून येतें. चोरी, चहाडी, व्यभिचार यांचा कोणत्याही धर्मांत निषेधच केलेला आढळेल. कांहीं कांहीं विद्वान ह्मणविणारांच्या मतानें धर्म व नीति या दोन्ही गोष्टी एकच असल्या, कांहीं कांहीं धर्मांना पुनर्विवाह मान्य असला, कांहीं धर्मांनीं मद्यपान, मांसभक्षण यांसारख्या गोष्टींचा निषेध केला नसला तरी सत्य, शुद्धता, दया, शांति, औदार्य, पातिव्रत्य इत्यादि उच्चतम गुणांना कोणत्याही धर्मानें शिरावरच धारण केलें आहे. आमच्या सनातन धर्मानें तर पातिव्रत्याचें महत्व पराकाष्ठेचें वर्णन केलें आहे. स्त्रियांच्या पातिव्रत्याचें सामर्थ्य अगाध आहे. पृथिव्यादि पंचतत्वें पतिव्रतेच्या सेवेंतच धन्यता मानतात एवढेंच नव्हे तर सर्व देवगणांसह अखिल ब्रह्मांडांचा शास्ता जो सनातन परमेश्वर तो देखील साध्वीव्रतपर स्त्रियांचा केवळ सेवक होऊन राहतो. ऐश्वर्य, वैभव, यश, कल्याण

इत्यादि गोष्टींची किल्ली स्त्रियांच्या उज्वल पातिव्रत्यांत आहे असें अनेक दाखल्यावरून प्रस्थापित होणारे आहे. ज्यांनी आपल्या पातिव्रत्यप्रभावानें आपलीं दोन्हीं कुळें पावन केलीं आणि आपल्या निर्मळ यशाच्या लखलखीत ध्वजानें सर्व जगत् प्रकाशमान केलें अशा कित्येक साध्वी स्त्रियांनीं हा आर्यावर्त पवित्र करून ठेविला आहे-तशा प्रकारच्या, गुरुस्थानीं शोभणाऱ्या, प्राचीन आर्यांगनांची यत्किंचित् तरी सेवा घडावी, व सांप्रतच्या बिकट काळीं सुधारणेसाठीं हपापलेल्या आर्यावर्ताला सनातन धर्मसंमत स्त्रीशिक्षणाची व शुद्ध स्त्रीधर्माची जाणीव पटावी या हेतूनें आह्मीं हें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. यांत दिलेलीं बहुतेक चरित्रें पौराणिक आहेत. प्रत्येक चरित्रांत कारणपरत्वें आह्मीं निरनिराळे विचार प्रकट केले आहेत व बऱ्याच ठिकाणीं कांहीं मुद्यांच्या बाबतींत टीकात्मक लिहिलें आहे तरी चरित्रांचा सर्व मतितार्थ आधारावांचून लिहिलेला नाहीं-आमच्या देशांत आजपावेतों जे अनेक साधुसंत व सत्वस्थ कवी होऊन गेले अशा महाजनांच्या ग्रंथाधारेंच हीं सर्व चरित्रें लिहिलेलीं आहेत. या पुस्तकांत सीमंतिनी, सावित्री, महानंदा, द्रौपदी, अनुसूया, दत्तकांता, स्वाहा, सीता, पद्मावती, सुलोचना, संत सखू, देवहूती अशीं १२ चरित्रें दिलीं आहेत. यासारखीं आणखी पुष्कळ चरित्रें प्रसिद्ध करण्यासारखीं आहेत. तीं सर्व आमच्याजवळ लिहून तयार आहेत. व कांहीं कालानें आह्मी यासारख्याच चरित्रांचा दुसरा भाग प्रसिद्ध करणारही आहों.

सांप्रत काळीं पुस्तकें प्रसिद्ध करण्याचें काम बरेंच बिकट आहे-तरी पण श्रीमंत सं. जत संस्थानाधिपति यांसारखे समयज्ञ, पुस्तक-प्रसिद्धीस सहाय्य करतात त्यामुळें फार खर्च न देतां कांहीं तरी मातृभाषेची सेवा करण्याचें फळ जोडण्यास सवड सांपडते ही आनंदाची गोष्ट होय!

---

॥ श्रीगणेशायनमः ॥

# पौराणिक आर्य-स्त्रीरत्नें !



## सीमंतिनी.



प्राचीन काळीं या पवित्र आर्यावर्त देशांत चित्रवर्मा या नांवाचा राजा राज्य करीत असे. तो राजा हरिश्चंद्र, नल यांच्याप्रमाणेंच पुण्यशील व पराक्रमी होता. तो अंतःकरणाचा दयाळू असून आपल्या प्रजेचें पुत्रवत् पालन करीत असे. दुष्ट व दुर्जन अशा लोकांना दंड करण्यांत तो प्रत्यक्ष यमच होता. प्रयत्न करण्यांत तो दुसरा भगीरथच असून सामर्थ्यानें तो मारुती, भीम यांच्या तोडीचा होता. तो समरभूमीवर उभा राहिला ह्मणजे आपण अजिंक्य अशा परशुरामाशीं सामना करीत आहों कीं काय असें त्याच्या शत्रूंना वाटत असे. तो विरोचनसुत बळीराजाप्रमाणें उदार असून हरिहरांची अनन्य भक्ति करी. त्याच्याप्रमाणेंच प्रतापवंत असे त्याला पुष्कळ पुत्र होते. आपल्याला एखादी कन्या असावी अशी चित्रवर्म्याला प्रबल इच्छा उत्पन्न झाली. आपले मनोरथ पूर्ण व्हावेत ह्मणून त्यानें शंकराला पुष्कळ नवस केले. श्रीशंकराच्या प्रसादानें त्याला एक कन्यारत्न प्राप्त झालें.

ती कन्या शुभलक्षणांनीं संपन्न होती. सुलोचना किंवा दमयंती यांचीही उपमा तिला बरोबर शोभण्यासारखी नव्हती. मदनाची

रती, रावणाची मंदोदरी, चंद्राची रोहिणी इत्यादि लावण्ययुक्त सुंदरींचें तेज त्या कन्येच्या सौंदर्यापुढें फिकें पडणारें होतें. ब्रम्हदेवाची भार्या सावित्री हिची उपमा तिला कांहींशी शोभणारी होती. प्रत्यक्ष भवानीच तिच्या रूपानें भूलोकीं अवतीर्ण झाली होती; साक्षात् लक्ष्मीनेंच तो अवतार धारण केला असावा असें वाटे. कलंकरहित अशा चंद्राप्रमाणें तिचा मुखचंद्रमा शोभत होता. तिन्ही लोकांतील सर्व सौंदर्य गाळूनच ब्रह्मदेवानें तिची मूर्ति ओतली होती.

ती कन्या जन्मास आली तेव्हां ज्योतिषशास्त्रनिपुण अशा ब्राम्हणांनीं तिचें जातक वर्तविलें. ती कन्या साऱ्या पृथ्वीची स्वामिनी होईल; ती दहाहजार वर्षें राज्य करील; अशा प्रकारचें त्या कन्येविषयीं भविष्य ऐकून चित्रवर्मा राजाला अति आनंद वाटला. त्यानें सत्पात्र ब्राह्मणांना वस्त्रें व अलंकार दान केले. इतर याचकांनीं जें जें मागितलें तें तें त्यांना देऊन त्यानें सर्वांना खुषी केलें. त्या कन्येचें नांव सीमंतिनी ठेवावें असें ठरलें. केवळ लावण्याची गंगानदीच आपल्या घरांत सीमंतिनीच्या रूपानें प्राप्त झाली आहे असें वाटून राजा चित्रवर्मा ब्रह्मानंदांत निमग्न झाला. इतक्यांत अमृतांत विषाचा थेंब पडावा त्याप्रमाणें एका ब्राम्हणानें अमंगल शब्दांचा उच्चार करून राजाचा सर्व आनंद नाहींसा करून टाकिला. त्या ज्ञानसंपन्न पंडितानें असा भविष्यार्थ सांगितला कीं, " या सीमंतिनीला तिच्या चवदावे वर्षीं वैधव्य प्राप्त होईल. "

त्या भविष्यवाद्याच्या तोंडचे अशुभ शब्द ऐकतांच राजाला धीर कसा निघेल ? तो पराकाष्ठेचा उद्विग्न झाला. त्याचा चेहरा म्लान दिसूं लागला. त्याच्या डोक्यावर एकाएकीं वीजच कोसळून पडली असें त्यास वाटलें. त्या ब्राम्हणाच्या मुखांतील शब्दरूपी तरवारीनें त्याचें काळीज कापून निघालें. राजाची ती अवस्था ध्यानांत घेऊन

तो ब्राम्हण पुन्हां ह्मणाला, " राजा, तूं कन्येच्या दुर्भाग्याविषयीं इतका चिंतेंत पडूं नको. श्रीशंकराच्या कृपेनें तुझ्या कन्येला सौभाग्य प्राप्त होईल. "

इतकें सांगून तो ब्राम्हण आपल्या घरीं निघून गेला. त्याच्या शेवटच्या बोलण्यानें राजाचें समाधान होईना. आपली हुरहुर नाहींशी व्हावी, चिंतेंत राहून आपण झुरणीस लागूं नयें एवढ्याच हेतूनें ब्राम्हणानें जातेवेळीं आपलें कांहीं तरी समाधान केलें अशा समजुतीनें राजा अगदीं चिंताक्रांत झाला. त्याला अन्नपाणी गोड लागेना. सदासर्वकाळ तो कन्येवर कोसळणाऱ्या आपत्तीच्या विचारांनीं व्यापलेला दिसे.

सीमंतिनी चंद्रकलेप्रमाणें वाढतां वाढतां बरीच मोठी झाली. ती सर्व कलांमध्यें निपुण झाली. तिच्या अंगीं विलक्षण चातुर्य दिसूं लागलें. तिचा कंठ फारच मधुर होता. तिचें सुस्वर गायन ऐकून कोकिळा मौन धरून बसत. तिच्या अंगाच्या सुवासामुळें कस्तुरी–मृग अरण्यांत दडून बसले. तिचें मुख पाहतांच रतिपती मदन हा लज्जायमान होत असे. तिचा कटिप्रदेश पाहून सिंह तोंड लपवून बसत. तिची चालण्याची ऐट पाहून हंस मानससरोबराच्या कांठीं जाऊन दडून बसले. तिच्या डोक्यावरील कुरळे केश भुंग्यांच्या रांगेप्रमाणें शोभत. तिच्या डोळ्यांची शोभा पाहून हरणें, मासे, कमळें, ताजवा किंवा दय्यर या नांवाचे पक्षी लज्जित होत असत. तिच्या वेणीची आकृति पाहून सर्प विवरांत लपून बसले. तिचें नांक पाहतांच राघूंची धांदल उडे. तिचे ओंठ बघून पिकलेल्या तोंडल्याचा गर्व हरण होत असे. तिची दंतपंक्ति पिकलेल्या डाळिंबबीजाच्या पंक्तीप्रमाणें खुलून दिसे. तिच्या अंगाच्या सुवासानें आसपासचा प्रांत दरवळून जाई. सूर्याच्या प्रभे-

प्रमाणें ती आपल्या कांतीनें अक्षय्य चमकत असे. अशा प्रकारच्या अद्भुत सौंदर्यानें युक्त असलेली ती सीमंतिनी उपवर झाली. ती नेहमीं आपल्या सखीजनांसह किन्नरकन्यांचें मनोहर गायन ऐकत बसे.

ऋषीनें वर्तविलेलें जातक अद्याप तिला समजलें नसल्यामुळें तिला काळजी वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें; पण आपला पिता चित्रवर्मा हा मात्र आपल्याबद्दल नेहमीं चिंताक्रांत असतो ही गोष्ट तिच्या ध्यानांत आली. तिनें त्यासंबंधानें आपल्या सख्यांजवळ शोध केला तेव्हां त्यांच्याकडून तिला तिच्या भविष्यत् आपत्तीचें ज्ञान झालें. आपल्या चवदावे वर्षीं आपणास वैधव्य प्राप्त होणार असें त्रिकालज्ञ ऋषिमुखांतील भविष्य समजतांच सीमंतिनीची वृत्ति बावरली. आर्यस्त्रियांना अन्य कोणतीही स्थिति वैधव्यदशेइतकी दुःखदायक वाटणारी नाहीं. मनुष्यमात्राला अत्यावश्य असलेल्या अन्नाची मोताद पडली तरी ज्या आर्यस्त्रिया आपल्या पतीबरोबर भिक्षा मागून उदरनिर्वाह करण्यांतही आनंद मानतील; वस्त्राच्या अभावानें काया उघडी पडली तरी ती लज्जारूपी वस्त्रानें झांकून तशा स्थितींतच ज्या आर्यपतिव्रता आपल्या पतिसमवेत आनंदानें काळ कंठतील; हिंवाळ्यांतील थंडीच्या कडाक्यानें शरीराचा काकडा वळला; उन्हाळ्यांतील उष्ण किरणांनीं देहकांती करपून गेली; पावसाळ्यांतील जलवर्षावानें सर्व अंग सदैव ओलें चिंब होऊन राहिलें तरीही ज्या आर्यसाध्वी डगमगणार नाहींत त्या एका वैधव्यापुढें मात्र थरथर कांपावयास लागतील. भयंकर जंगलांत प्रवास करावा लागला तरी चालेल; वनवासामध्यें असतांना व्याघ्र सिंहादि हिंसक प्राणी आ पसरून पुढें येऊन उभे राहिले तरी बेहे-त्तर; इतकेंच काय पण सर्वभक्षक काल उग्ररूप धारण करून प्राप्त झाला असतां त्याच्या स्वाधीन होण्यासही त्या आनंदानें कबूल होतील; पण

वैधव्यदुःख पतकरण्यास त्या एक क्षणभर देखील राजी होणार नाहींत. एका मंगलसूत्रापुढें ज्यांना सोन्यारुप्याच्या किंवा रत्नजडित अलंकाराचीही किंमत नाहीं, कपाळावरील कुंकुमातिलकासच ज्या आपलें सर्व सौभाग्य समजणार, आपल्या हातांतील वज्रचुड्यांतच ज्या स्वर्गसौख्य मानणार, मस्तकावरील केशभारासच ज्या आपली सर्व शोभा मानणार त्या सनातनधर्मीय पवित्र स्त्रियांना वैधव्य या शब्दाची कल्पना देखील सहन होणार नाहीं. ज्याच्या सुखदुःखावर आपलें सुखदुःख अवलंबून आहे, ज्याच्या सेवेमुळें आपल्याला परलोकप्राप्ति होणारी आहे, ज्याच्या सुखरूपतेवर आपली सुखरूपता अवलंबून आहे, अशा पतीचा विरह होण्याचा प्रसंग आपल्या चवदाव्या वर्षीं आपणावर गुदरणार हें ऐकतांच सीमंतिनीचें हृदय फाटून गेलें. ती कावरीबावरी झाली; तिचे हातपाय लटपटूं लागले. तिच्या मनाचा सर्व धीर सुटून ती क्षणभर प्रेतवत् होऊन पडली. जी दशा म्हणजेच साध्वी–स्त्रियांना भूलोकांतील नर्क होय ती आपणास चुकवितां येण्यासारखी आहे किंवा नाहीं हा विचार उत्पन्न होऊन सीमंतिनीनें मैत्रेयीकडे धाव ठोकली.

ही मैत्रेयी ह्मणजे याज्ञवल्क्याची पत्नी होय. ही आपल्या पतीप्रमाणेंच अधिकारसंपन्न होती. ती धर्माधर्म जाणत होती. समसमान हक्कांचीं तत्वें, समाजरचना, स्त्रीशिक्षण, स्त्रीस्वातंत्र्य, अबलोन्नति या गोष्टींचा तिनें अभ्यास केला नव्हता; तरी पण ती अडाणी नव्हती. नरजन्म, इहपरलोक, कर्माकर्म, सदाचार, भूतदया, परमार्थ, परमेश्वर, सृष्टिरचना, नीति इत्यादि गोष्टींचीं चोख तत्वें तिला अवगत होतीं. अशा प्रकारच्या मैत्रेयीकडे जातांच सीमंतिनीनें सद्गदित होऊन तिच्या चरणावर लोटांगण घातलें. तिनें आपल्या नेत्रांतील अश्रुजलानें मैत्रेयीचे पाय धुऊन टाकले. तिची ती नम्रावस्था

पाहून मैत्रेयीनें तिला उठवून आपल्या पोटाशीं धरलें. सीमंतिनीचें हृदय धडधडत होतें. मैत्रेयीनें तिचें मुख कुरवाळून तिच्या डोळ्याचें पाणी पुसलें आणि तिला धीर देऊन तिच्या दुःखाचें कारण विचारिलें.

मैत्रेयीच्या दयाभूत वर्तनानें सीमंतिनीस जास्तच गहिंवर दाटला. तिनें सद्गदित होऊन आपला सर्व वृत्तांत तिला कथन केला आणि आपलें सौभाग्य संरक्षण करण्याबद्दलचा उपाय विचारिला. मग सीमंतिनीची हकीगत समजल्यानंतर तिनें तिच्या प्रश्नास काय उत्तर दिलें बरें? तिनें तिला पुनर्विवाहाचा उपाय सांगितला काय? समान हक्कांचीं तत्वें प्रतिपादून तिनें तिला स्त्रीस्वातंत्र्याचें शास्त्र पढविलें काय? तिनें तिला मुळींच अविवाहित राहून वैधव्य चुकविण्याचा मार्ग दाखविला काय? चौदाव्या वर्षीं वैधव्य येणार असें पाहून तिनें तिला त्या कालानंतरच स्वेच्छेनें पति वरण्याचा सल्ला सांगितला काय? शास्त्रकर्त्या पुरुषांच्या पदरांत अप्पलपोटेपणा बांधून तिनें तिच्या अंतःकरणांत शास्त्राबद्दल द्वेष उत्पन्न केला काय? ऋषींच्या ठिकाणीं कठोरपणा स्थापून तिनें तिचें मन धर्माचाराविरुद्ध भारून टाकलें काय? स्त्रीपुरुषांच्या सुखदुःख भावनेवर व्याख्यान करून तिनें तिच्या डोक्यांत नसत्याच अभिमानाचें वेड उत्पन्न केलें काय? परलोक, परमार्थ, परमात्मा, मनुष्यजन्म याविषयींच्या उच्च कल्पना नष्ट करून तिनें तिला ऐहिक सौख्यांतील कीटक बनविण्याचाच उपदेश दिला काय? तिनें सीमंतिनीला यांतून कांहींएक सांगितलें नाहीं. वैधव्यपंकांत रुतलेल्या गाईचा उद्धार करण्याकरितां तयार केलेलें परोपकाराचें शास्त्र बाजूला ठेवून मैत्रेयीनें तिला सोमवारव्रत धरावयास सांगितलें. ती ह्मणाली, " सोमवारीं उपवास करून संध्याकाळ होतांच श्रीशंकराची षोडशोपचारें पूजा करावी. अकराशें दंपत्यांचीं वस्त्रालंकारानें पूजा

करावी. अतिथींना अन्नदान द्यावें. रात्रभर जागरण करून शंकराचें सप्रेम भजन करावें. एका परमेश्वराच्या ठिकाणीं अनन्यभावानें प्रेम ठेवावें. शंकराला अभिषेक केला असतां पापसंहार होतो. शंकराला गंधाक्षता, पुष्पमाला अर्पण करण्यानें सौभाग्य वाढतें. शिवाच्या मंदिरांत नंदादीप चालविणाराचा वंशविस्तार होतो. नैवेद्याच्या योगानें लक्ष्मीची वाढ होते. तांबूलदान, नमस्कार, प्रदक्षिणा यांच्या योगानें आरोग्यप्राप्ति होऊन चारी पुरुषार्थ सिद्ध होतात. जपाच्या योगानें महासिद्धि साध्य होतात. होमहवनामुळें धनवृद्धि होते. कीर्तनश्रवण केलें असतां आधिव्याधि हरण होतात. ध्यानानें महाज्ञान प्राप्त होतें. तात्पर्य हें व्रत करून, सदासर्वकाळ ईश्वरभजनाचा अंगिकार करून सत्ववृत्तीनें राहणारांच्या आपत्ति नाहींशा करण्याबद्दल परमेश्वर जबाबदार आहे. ''

अशाप्रकारें व्रत सांगून तिनें तिला शंकराचा मंत्र सांगितला. मैत्रेयीच्या बोलण्यावर भरंवसा ठेवून सीमंतिनी आपल्या घरीं गेली. श्रीशंकराकडे मन लावून त्याचें भजन करीत बसलें असतां आपलें संकट नाहींसें होईल असा सीमंतिनीला विश्वास वाटत होता. मैत्रेयीनें सांगितल्यापेक्षांही जास्त सावधगिरी राखून तिनें व्रतनियम चालविला. दुःखाचे डोंगर कोसळले तरीं व्रतापासून भ्रष्ट व्हावयाचें नाहीं असा सीमंतिनीच्या मनाचा पूर्ण निश्चय झाला होता.

सीमंतिनी उपवर होतांच चित्रवर्मा तिच्या विवाहाकरितां सुलक्षणी अशा वराचा शोध करूं लागला. नळराजाचा नातू चित्रांगद हा सीमंतिनीकरितां वर पसंत करण्यांत आला. चित्रांगद हा मदनासारखा देखणा होता. तो शुभ लक्षणांनीं मंडित होता. त्यानें चौसष्ट कलांचें आकलन केलें होतें. त्याचें आणि सीमंतिनीचें

टिंपण जमलें. सार्‍या पृथ्वीमध्यें चित्रांगदाच्या तोडीचा दुसरा राजपुत्र नव्हता. चित्रवर्म्यानें चित्रांगदालाच सीमंतिनी द्यावयाची असा निश्चय ठरवून तो त्या राजपुत्रास आपल्या नगरींत घेऊन आला. त्यानें सीमंतिनी त्याला अर्पण केली. चार दिवस अद्भुत सोहळा झाला. राजानें जामातास वरदक्षिणा ह्मणून अपरिमित संपत्ति दिली. उंचीं उंचीं वस्त्रें, नानाप्रकारचे अलंकार, अनेक रत्नें वगैरे जांवयाला आंदण देऊन चित्रवर्म्यानें आपल्या मनाचें समाधान व्यक्त केलें. हत्ती, घोडे, दासी, रत्नखचित् पालख्या, मेणे वगैरे वाहनेंही चित्रांगदाला सासर्‍याकडून मिळालीं. त्यावेळीं चित्रवर्म्यानें ब्राह्मणांनाही मोठमोठ्या दक्षिणा दिल्या. त्यानें आपल्या सामर्थ्यानें चारी वर्णांतील लोकांना तृप्त केलें. सर्व याचक संतोष पावून त्यांच्या तोंडांतून शुभप्रद आशिर्वाद निघूं लागले. राजानें आपल्या औदार्यरूपीं अग्नीनें याचकांचें दरिद्ररूपीं रान जाळून टाकलें. दीन याचकांचा दारिद्य धुराळा आकाशांत उडत होता तो राजाच्या औदार्य-मेघ-वर्षावानें खालीं बसला. याचकांचा संतोष-रूपीं तृणांकुर टवटवीत दिसूं लागला. साडे पूर्ण होऊन वर्‍हाडी मंडळी जिकडल्या तिकडे गेली. चित्रवर्म्याचा व्याही ह्मणजे चित्रां-गदाचा पिता इंद्रसेन हा समारंभासह आपल्या नैषधदेशास परत गेला. चित्रवर्म्यानें चित्रांगदाला मात्र नैषधदेशास पाठविलें नाहीं. दसरा, दीपवाळी होईपर्यंत त्यानें जावयाला तेथेंच ठेवून घेतलें.

चित्रांगद कित्येक दिवस श्वशुरगृहीं राहिला. चित्रवर्म्यानें त्याचा यथायोग्य आदर ठेविला. सीमंतिनी आणि चित्रांगद हा जोडा लक्ष्मीनारायणाप्रमाणेंच दिसतो असें पाहून चित्रवर्म्याच्या मनाला अतिशय हर्ष होई. पण ऋषीचें भविष्य त्याचा सर्व हर्ष एका क्षणांत नाहींसा करून टाकी.

कांहीं दिवस गेल्यानंतर एकदां तो चित्रांगद मृगयेकरितां अरण्यांत निघाला. त्यानें आपल्यांबरोबर पुष्कळ सेवक व सैन्य घेतलें. वनामध्यें शिकार करीत असतां तो फार श्रमला. शरीर तप्त होऊन त्याच्या अंगाला घाम सुटला. तेव्हां शरीराला विशेष गारवा येऊन मनाला आराम व्हावा ह्मणून त्यानें सेवकांना नौका तयार करून यमुनेच्या डोहांत घालण्यास सांगितलें. मुख्य मुख्य सेवकांना बरोबर घेऊन चित्रांगद त्या नौकेंत बसला. खलाशी वल्हीं मारूं लागले. चित्रांगद सेवकजनांबरोबर कौतुकानें गप्पा मारूं लागला.

यमुनानदी ह्मणजे साक्षात् यमधर्माची बहीण होय. तिचें पाणी काळेभोर व भयानक दिसत होतें. तिच्या डोहाचा कोणालाही अंत लागलेला नव्हता. ती नाव त्या डोहाच्या मध्यभागीं गेली तोंच सोसाट्याचा भयंकर वारा सुटला. मोठेंच तुफान होऊन नौका डळमळूं लागली. खलाशांनीं वल्हीं मारण्याची शिकस्त केली; पण त्यांचा निरुपाय होऊन नाव बुडूं लागली. आतां आपण खास जगत नाहीं असें जाणून नावेंतील सर्व लोक आरोळ्या मारूं लागले. सर्व लोक भयानें गांगरून गेले. प्राण वांचविण्याकरितां पोहत जाण्यावांचून मार्ग नाहीं असें जाणून कांहींजण पाण्यांत उड्या टाकणार तोंच ती नाव एकदम बुडाली. नौकेसकट सर्वजण बुडालेले पाहतांच नदीतीरावर राहिलेले सैनिक लोक दुःखानें विलाप करूं लागले. चित्रांगदाच्या पाठिराख्या वीरांनीं तर आकांत मांडिला. कित्येक सेवक किंकाळ्या फोडीत नगराकडे धावत गेले. चित्रवर्म्याला ती बातमी समजतांच तो तसाच ऊर बडवीत यमुनानदीकडे धावला. सीमंतिनी आपल्या आईसह मोठ्या धांदलीनें तेथें येऊन पोंचली. तेथील देखावा पाहतांच सर्वजण दुःखसागरांत गटंगळ्या खाऊं लागले. सीमंतिनीनें धाडदिशी आपलें अंग धरणीवर टाकिलें. तें पाहतांच तिच्या आईनें तिच्या

गळ्याला मिठी मारली. दोघीजणींनीं पराकाष्ठेचा शोक आरंभिला. सर्वत्र हाहाकार उडाला.सीमंतिनीच्या विलापध्वनीनें पृथ्वी थरथर कांपावयास लागली. समुद्राचें पाणी कढत झालें. सीमंतिनीचा शोक ऐकून वनांतील पशुपक्षीही दुःखाकुल झाले. इतकेंच नव्हे तर वृक्ष, लता, वेली, दगड इत्यादि निर्जीव वस्तूंही सीमंतिनीचें दुःख पाहून अश्रुपात करूं लागल्या. दुःखाग्नीचे चटके बसतां बसतां सीमंतिनीच्या डोळ्यांतील अश्रु करपून गेले. तिला मूर्च्छा येऊन ती निचेष्टित पडली. इतक्यांत त्या ठिकाणीं इंद्रसेन आपल्या भार्येसह येऊन पोंचला. सीमंतिनीला पाहतांच इंद्रसेन शोकाग्नीनें जळूं लागला. चित्रांगदाची आई लावण्यवती हिनें सुनेच्या मुखाकडे पाहतांच आपला देह पृथ्वीवर टाकिला. बरोबरच्या स्त्रियांनीं लावण्यवतीस सावरून धरिलें. त्या तिची हरेकप्रकारें समजूत करूं लागल्या; पण व्यर्थ. स्वतःचा एकुलता एक सद्गुणी मुलगा पाण्यांत बुडून मेलेला, त्याचीच सद्गुणी भार्या ह्मणजे आपली सून वैधव्यानें होरपळून नदीतीरावर धुळींत लोळत पडलेली; अशा स्थितींत त्या लावण्यवतीचें सांत्वन नुसत्या शब्दांनीं कसे होणार ? तिच्या अंतःकरणांत प्रेमाचा कढ येऊन तिनें आपल्या अश्रूंनीं धरणीदेवीला स्नान घातलें. ती आपलें कपाळ फोडून घेऊं लागली. ती आपल्या तोंडांत माती घालूं लागली. कालिंदीनदीनें आपल्या भावाचें ह्मणजे यमाचें रूप घेऊन आपल्या लाडक्यास गट्ट केलें याबद्दल ती त्या नदीवर अतिशय क्रुद्ध झाली. बलरामासारखा कोणी आपला कैवार घेणारा असतां तर त्यानें त्या यमुनेच्या मुसक्या बांधून तिला आपला पुत्र बाहेर टाकून द्यावयास लाविलें असतें असें वाटून ती महासामर्थ्यवान् अशा परमेश्वराचा धावा करूं लागली. आपल्या सहाय्याला कोणीच धावून येत नाहीं असें पाहून ती भ्रमित होऊन

बोलूं लागली, " माझी आंधळ्याची काठी कोणीं हिसकावून नेली हो ? माझें अनाथाचें गाठोडें कोणीं निर्दयानें डोहांत टाकिलें हो? माझें चित्रांगद नांवाचें पाडस कोणीं चोरून नेलें हो ? माझा लाडका राजहंस मला कोणीतरी दाखवाल काय ? परमेश्वरा ! मीं पूर्वीं काय पातक केलें होतें म्हणून तूं मला हें त्याचें फळ दिलेंस ? मीं प्रदोषव्रत मध्येंच टाकलें नाहीं. मीं कधींही हरिहरांत भेद केला नाहीं. मीं केव्हांही हरिकीर्तनाचा अव्हेर केला नाहीं. पंक्तिभेद, साधुनिंदा, परधनाचा अभिलाष यांतून कोणतेंही पातक माझ्याकडून घडल्याचें मला आठवत नाहीं. मग हें माझ्या पूर्व प्राक्तनाचें फल आहे काय? पूर्वजन्मीं जर मीं कोणाच्या अन्नांत माती कालविली असेल, कोणाच्या स्वार्थाच्या आड आलें असेन, कोणाचा वृत्तिछेद केलाअसेल, पात्रा-वर बसलेल्या ब्राह्मणाला उठवून लाविलें असेल, हरिणी आणि तिचे बालक यांचा विरह घडवून आणिलें असेल, मजकडून गुरुद्रोह घडला असेल तर त्याबद्दल आज मला हें यथायोग्यच प्रायश्चित्त मिळालें म्हणावयाचें. "

असें बोलून ती आपलें समाधान करून घेऊं लागली. पण आईचेंच अंतःकरण तें ! अशानें तिचें मन शांत कोठून होणार ? तिनें पुन्हां हंबरडा फोडला. ती आपल्या आरोळ्यांनीं आकाशपाताळ एक करूं लागली. तिच्या विहिणीनें तिला मिठी मारली. त्या दोन्ही पुण्य नद्यांचा संगम होतांच त्यांच्या डोळ्यांतून एक तिसरीच नदी उत्पन्न होऊन तिचा जलप्रवाह धरणीवरून वाहूं लागला. सीमंतिनी बेशुद्ध स्थितींतच पडली होती. तो एकंदर देखावा पाहून चित्रवर्मा व इंद्र-सेन हे दोघेही भूपती वेडे झाले. त्यांना कांहींच सुचेना. ते जातीनें पुरुष होते. ते दोघेही शूर व पराक्रमी होते. ते दोघेही वैभवसंपन्न व राज्यकार्यधुरंधर होते. सीमंतिनी दोघांनाही प्रिय होती; पण आधि-

दैवी संकटापुढें त्यांचें वैभव, चातुर्य, पराक्रम यांचें काय सामर्थ्य चालणार ? परमेश्वराच्या अचिंत्य शक्तीपुढें कोणालाही नम्रच व्हावें लागणार. त्या दोघांच्याही मनाचा धीर सुटून ते अबला बनले. त्यांचें अंतःकरण भांबावून जाऊन तेही आपापल्या भार्याप्रमाणेंच शोकाश्रू टाकीत बसले.

अशानें आतां कांहीं निभावयाचें नाहीं असें जाणून त्यांच्या प्रधान मंडळींनीं कशीतरी त्यांची समजूत पाडून त्यांना सावध करून पालखींत घातलें. सीमंतिनी, चित्रवर्मा वगैरे मंडळींना घरीं नेण्यांत आलें. इंद्रसेन व लावण्यवती यांना त्यांच्या आप्तजनांनीं नैषधपुरास नेलें तों त्यांच्यावर तेथें भलतेंच संकट कोसळलें. त्यांच्यावर गुदरलेला प्रसंग साधून त्यांच्या भाऊबंदांनीं त्यांचें राज्य हरण करून त्यांना कैद करून टाकिलें.

सीमंतिनी आपल्या नगरास पोंचल्यानंतर निराशेनें व्यापून राहिली. पण तिनें आपलें व्रत सोडलें नाहीं. मैत्रेयीचा उपदेश घट्ट पोटाशीं धरून ती मनामध्यें एकसारखें शिवनाम जपूं लागली. तिनें सर्व भोग वर्ज केले. तिच्या मुख्य अलंकारावरच काळाची उडी पडली असल्यानें तिला कोणत्याही प्रकारचा विलास सुखकर वाटेना. तिला अन्नपाणीही गोड लागेना. ज्याच्या अस्तित्वामुळेंच आपल्याला जगतामध्यें अस्तित्व आहे अशी ज्या साध्वींची कल्पना त्यांना पतीच्या पश्चात् कोणतीही गोष्ट रुचणें संभवनीयच नाहीं. सीमंतिनी ही तसलीच सती असल्या कारणानें एका पतिप्राप्तिवांचून तिला अन्य कशाचीही जरूर नव्हती. तिच्यापुढें अक्षय्य तिच्या पतीचीच मूर्ति दिसे. त्याला शिवस्वरूप समजून त्याचें ध्यान करण्यांतच ती सदोदित गढलेली असे.

आतां आपण चित्रांगदाकडे वळूं. वादळामुळें नौकेचा नाश होऊन

चित्रांगद यमुनेच्या डोहांत बुडाला; पण नाकातोंडांत पाणी जाऊन तो सामान्य माणसाप्रमाणें मेला नाहीं. त्याच्यावर परमेश्वराची कृपा होती. त्याच्या अर्धांगीनें जी शिवभक्ति चालविली होती तिच्यामुळें त्याच्या संरक्षणाची जबाबदारी परमेश्वरावर पडली होती. जे अनन्य होऊन परमेश्वरास शरण गेले त्यांचा नाश करण्यास कोणीही समर्थ नाहीं. भगवद्भक्तांच्या एका केंसासही धक्का लावण्यास प्रत्यक्ष कृतांतही बलसंपन्न नाहीं. भगवद्भक्तांचा नाश करण्यास प्रवृत्त होणाऱ्यांना परमेश्वर आपले शत्रु समजतो. ज्यानें काया, वाचा, मनें करून भगवंताच्या भक्तीचा आश्रय केला त्याला नसलेलें पुरविणें आणि त्याचें असलेलें रक्षण करणें हें परमेश्वराचें ब्रीदच आहे. सीमंतिनीला हा गुह्यसिद्धांत मैत्रेयीकडून कळला असल्या कारणानें ती आपल्या कंठांत शिवमंत्र धारण करून पतिप्राप्तीकरितां अनन्यभावानें तप करीत असतां तिच्या पतीच्या जिवाला अपाय करण्यास कोण प्रवृत्त होणार ? तिचा पति चित्रांगद यमुनेच्या डोहांत पडतांच त्याला नागकन्यांनीं सावरून धरिलें. त्यांच्याबरोबर तो पाताळांत गेला.

तेथील नागभुवनाची लीला पाहून चित्रांगद तटस्थ झाला. त्या ठिकाणीं पद्मिणी वगैरे चारी प्रकारच्या दिव्य नारी होत्या. त्यांच्या-अंगाच्या सुवासानें तें नागभुवन सुगंधित झालें होतें. त्यांच्या पायांच्या नखांच्या शोभेनें मोह पावून त्या ठिकाणीं भ्रमरांचा सदोदित गुंजारव चालत असे. त्यांचा वदनचंद्र पाहून कित्येक तपस्वी त्या ठिकाणीं चकोर होऊन बसले होते. त्या ठिकाणीं चोहोंकडे नवरत्नांचे खडे पसरले होते. स्वर्गापेक्षांही त्या लोकाची शोभा जास्त वर्णनीय होती.

अशा त्या पाताळलोकाचा स्वामी नागराज तक्षक हा त्यावेळीं आपल्या सिंहासनावर विराजमान झालेला होता. नागकन्यांनीं

चित्रांगदाला त्याच्यापुढें नेतांच त्यानें सद्गदित होऊन नागराजाची स्तुति केल्यानंतर नागराजाच्या आज्ञेवरून त्यानें आपलें सर्व चरित्र कथन केलें. चित्रांगदाच्या चरित्रवर्णनानें दयायुक्त होऊन नागराजानें त्याला प्रश्न केला, “ भूलोकीं वास्तव्य करून तुम्ही कोणत्या दैवताची भक्ति करितां बरें ? ”

तक्षकाच्या या प्रश्नावर राजपुत्रानें निर्भय होऊन उत्तर केलें कीं, “ ज्याच्या इच्छामात्रेंकरून प्रकृतिपुरुषाचा जन्म झाला, ज्याच्या संकल्पमात्रेंकरून अनंत ब्रह्मांडांची रचना झाली; ज्याच्या इच्छेनें उलट खालीं असतां पंचतत्वांसह अनंत ब्रह्मांडांचा लय होऊन प्रकृति आणि पुरुष हे दोघेही ज्याच्यामध्यें लीन होऊन जातात त्या आदिदेव सदाशिवाची आह्मी भक्ति करितों. ज्याच्या मायेपासून सत्व, रज, तम हे तीन गुण उत्पन्न झाले; सत्वगुणाच्या अंशानें ज्यानें विष्णूची उत्पत्ति केली, रजाच्या अंशानें ज्यानें ब्रह्मदेव निर्माण केला, तमांशेंकरून ज्यानें तामसी रुद्र उत्पन्न केला त्या पुराणपुरुष सदाशिवाचेच आम्ही दास आहों. पातालादि सर्व लोक, दाहीदिशा, पृथिव्यादि पांचीं तत्वें,—सर्व चराचर व्यापूनही जो शिलक राहिला आहे अशा श्रीशिवाचे आह्मी उपासक आहों. ज्याच्या नेत्रांच्या ठिकाणीं सूर्यनारायण वास्तव्य करतो, रोहिणीरमण चंद्र हाच ज्याचें मन आहे, रमारमण भगवान् विष्णु हाच ज्याचें अंतःकरण आहे, ब्रह्मदेव हाच ज्याची बुद्धि आहे, रुद्र हा ज्याचा अहंकार आहे, इंद्र हाच ज्याचे हात आहेत, यम हाच ज्याच्या तीव्र दाढा आहेत, तात्पर्य, अकरा रुद्र, बारा सूर्य इत्यादि सर्व देवता ज्याचीं अवयवें आहेत त्या विराटपुरुषाच्या दासाचेही आह्मी दास आहों. अशा त्या भक्तवत्सल परमेश्वराचेंच नाम आह्मी गात असतों.”

राजपुत्राच्या तोंडून निघालेलें हें ईशवर्णन ऐकतांच तो नागराज

अतिशय संतोष पावला. त्यानें सिंहासनावरून खालीं उतरून त्या भगवद्भक्ताला क्षेमालिंगन दिलें. त्यानें त्याला आपल्या भुवनांतील नानाप्रकारचें कौतुक दाखविलें. त्याच्याविषयीं अंतःकरणांत भारी आवड उत्पन्न होऊन त्याला तेथेंच राहून घेण्याच्या बुद्धीनें तो राजपुत्रास ह्मणाला, " राजपुत्रा; तुला येथें कांहीं कमी पडणार नाहीं. देवांनाही ज्या वस्तूंची प्राप्ति होणें कठीण आहे अशा अनेक वस्तूंनीं माझें भांडार भरलेलें आहे. अनेक तऱ्हेचे विलास भोगून तूं येथें स्वस्थचित्तानें वास्तव्य कर. तूं शिवभक्त असल्यामुळें मला फार आवडत आहेस. तूं अक्षय्य माझ्या जवळ रहा. "

तक्षकाचा आग्रह पाहून चित्रांगदानें त्याला सांगितलें, " हे नागराजा; तूं महासामर्थ्यसंपन्न व दयाळू आहेस. तूं सर्व कांहीं जाणणारा आहेस. ज्या शिवाचें आम्ही ध्यान करितों त्याच्या कानांतील कुंडलांना तुझ्यामुळेंच अपूर्व शोभा आलेली आहे. तुझ्या इच्छेप्रमाणें मी येथें राहणें मला कसें बरें रुचेल ? मी आपल्या आईबापांचा एकुलताएकच मुलगा आहें. माझ्या आईबापांना माझ्या भेटीची उत्कंठा लागली असेल. माझ्या वियोगानें माझें आईबाप तप्त झाले असतील. सर्व गुणांचें निधान, लावण्याची केवळ खाणच अशी चौदा वर्षांची माझी एकनिष्ठ पत्नी सीमंतिनी माझ्या विरहव्यथेमुळें प्राणही सोडील. हे नागराजा; आईबापाच्या चरणांचें दर्शन घेण्यास मी उत्सुक झालों आहें. माझ्या प्राप्तीकडे लक्ष लावून माझ्या मातापित्याचे प्राण डोळ्यांत आले असतील. माझी कांता केवळ माझ्या प्राप्तीच्या आशेनेंच जीव धरून राहिली असेल. तूं सर्वज्ञ व कृपाळू आहेस. मी हरिदासांचा दास चित्रांगद तुला शरण आहें. तूं उदार मन करून मला माझ्या घरीं नेऊन पोंचविशील तर तुझ्या प्रसादानेंच आह्मांला शिवभक्ति फलद्रूप झाली असें होईल. "

असें बोलत असतां राजपुत्राच्या डोळ्यांतून घळघळ अश्रु वाहूं लागले. तो मोठ्या आशेनें श्रीशंकराचें स्मरण करीत तक्षकाच्या मुखाकडे पाहूं लागला. त्याची ती नम्रावस्था जाणून नागराजा प्रसन्न झाला. त्यानें त्याची विनंति मान्य करून असें सांगितलें कीं, " तुझ्या भगवद्भक्तीमुळें मी तुझा दास झालों आहें. आजपासून मीं तुला बारा हजार नागांचें बळ दिलें आहे. तूं जेव्हां जेव्हां माझें स्मरण करशील त्यावेळीं मी तुझ्या सहाय्यार्थ धावून येईन. "

इतकें सांगून त्या नागराजानें लागलीच आपल्या सेवकांकडून एक चपल घोडा आणविला. त्यानें अनेक दुर्लभ रत्नें व एक चिंतामणी राजपुत्रास अर्पण केला. नागलोकांतील दुसऱ्या कित्येक अपूर्व वस्तूंच्या मोटा बांधवून त्या त्यानें राक्षसांच्या डोक्यावर दिल्या. त्यानें आपल्या हातांनीं राजपुत्राच्या अंगावर दिव्य अलंकार व दिव्य वस्त्रें घालून त्याला घोड्यावर बसविलें. एका बलसंपन्न नागाला हाक मारून त्याला चित्रांगदाबरोबर भूलोकीं जाण्याची त्यानें आज्ञा केली. सर्व तयारी होतांच तक्षकाच्या अनुज्ञेनें चित्रांगद त्या फणिवरास बरोबर घेऊन आपल्या नगरीस जाण्याकरितां तयार झाला. त्यानें नागराजाला वंदन केलें. राजानें त्याला शुभ आशिर्वाद देऊन त्याची त्याच्या आईबापाकडे रवानगी केली.

नागराजानें चित्रांगदास पाताळलोकीं एकंदर तीन वर्षें ठेवून घेतलें होतें. तीन संवत्सरानंतर त्याच्या परवानगीनें चित्रांगद यमुनेच्या डोहांतून बाहेर निघून तीरावर आला. त्याचवेळीं सीमंतिनी यमुनेच्या स्नानाकरितां तेथें प्राप्त झाली होती. तिच्याबरोबर तिच्या दासीही होत्या. चित्रांगद तीरावर येतांच त्याची व सीमंतिनीची दृष्टादृष्ट झाली. त्यांनीं एकमेकांकडे पाहिलें. दोघांनाही परस्परांच्या

दर्शनानें मोठें आश्चर्य वाटलें. दोघांनीं एकमेकांस ओळखलें; पण त्यावेळीं कोणीं कोणास ओळख दिली नाहीं.

यावेळीं चित्रांगदानें नागलोकांतील मोत्यांचे कंठे धारण केले होते. त्याच्या मस्तकांतील दिव्य मोत्यांचा तुरा त्याच्या भुजेपर्यंत डोलत होता. त्याच्या कमरेंतील मेखलेवर पांचू जडलेल्या होत्या. त्यांच्या रंगानें धरणीमाता हिरवीगार दिसत होती. त्यामुळें तेथें नवीन हिरवेंगार गवतच उगवलें आहे असें वाटून त्या जागेकडे मृगपशू धावून येऊं लागले. त्याच्या गळ्यांतील दिव्य मोती पाहून राजहंस त्याच्या छातीवर येऊन बसूं लागले. त्याच्या अलंकारांतील लाल माणिकांचें आरक्ततेज पाहून त्याच्यावर राघू येऊन बसून त्यांना चोंचा मारूं लागले. त्यानें आपल्या अंगास दिव्य चंदनाची जी उटी लावली होती तिच्या सुवासास मोहून त्याच्या अंगाभोंवतीं भुंगे घिरट्या घालूं लागले. त्याचें तें अद्भुत वैभव पाहून सीमंतिनी विस्मित झाली. तिच्या मनांत अनेक विचार उत्पन्न होऊन ती भ्रमांत पडली. आपण ज्याचें नित्य ध्यान करितो, ज्याच्या प्राप्तीकरितां आपण सदैव शिवमंत्राचा जप करतों तोच हा चित्रांगद असावा अशा संशयांत गुरफटून ती वरचेवर त्याच्याकडे न्याहाळून पाहूं लागली.

चित्रंगदही सीमंतिनीला पाहून तटस्थ झाला. तिच्या गळ्यांत स्त्रियांच्या कंठांतील मुख्य दागिना जें मंगळसूत्र तें नव्हतें. तिच्या कपाळीं कुंकू नसल्यानें तिचा चेहरा निस्तेज दिसत होता. डोळ्यांमध्यें काजळ नसल्यानें ते फटफटीत दिसत होते. स्वभावतः ती तप्त सुवर्णासारख्या रंगानें युक्त होती. रंभा, उर्वशी यांसारख्या अप्सरा तिच्या दासी शोभण्यासारख्या होत्या. पण यावेळीं चिंताग्नीनें तिची कांति करपून गेली होती. ती अतिशय कृश झाली होती. ग्रहणकाळच्या चंद्रकलेप्रमाणें तिची अवस्था झाली होती. तिच्या

एकंदर चिन्हांवरून ती सीमंतिनीच असावी अशी खात्री वाटून चित्रांगद तिच्याजवळ गेला आणि कळकळीनें त्यानें तिला तिची माहिती विचारली.

राजपुत्राचा शुद्ध हेतु जाणून सीमंतिनी आपला वृत्तांत सांगूं लागली. पण चार शब्द बोलतांच तिचे डोळे पाण्यानें भरून आले. अश्रुबिंदु भुईवर गळूं लागले. तिचा कंठ दाटून येऊन तिच्या तोंडांतून शब्द निघण्याची पंचाईत पडूं लागली. तिची ती अनुकंपनीय अवस्था पाहून तिच्या चतुर सख्यांनीं राजपुत्रास सांगितलें, " तीन वर्षांपूर्वी याच यमुनेच्या डोहांत हिचा भ्रतार बुडाला. हिच्या सासुसासऱ्यासही त्यांच्या शत्रूंनीं बंदिखान्यांत ठेवलें आहे. " अशा प्रकारच्या ओळखीच्या गोष्टी सांगून त्या चतुर दासींनीं राजपुत्रास तिचें सर्व चरित्र समजावून दिलें. आपलें वृत्त ऐकतांच राजपुत्र सद्गदित होऊन डोळे टिपूं लागला आहे असें पाहून सीमंतिनीनें आपल्या दासींना कांहीं खूण केली. तिच्या खुणेचा अर्थ जाणून त्यांनीं राजपुत्रास त्याचा वृत्तांत विचारला. दासींचा प्रश्न ऐकून चित्रांगदानें सांगितलें, " आम्ही सिद्ध पुरुष आहों. मनास वाटेल त्या ठिकाणीं गमन करण्याचें आमच्या अंगीं सामर्थ्य आहे. तिन्ही लोकांत आम्ही स्वेच्छेनें संचार करतों. आम्हांला भूत-भविष्य-वर्तमानही सांगतां येतें. "

इतकें बोलून राजपुत्रानें सीमंतिनीचा हात धरून तिला जरा बाजूला नेलें आणि त्यानें तिच्या कानांत असें सांगितलें कीं, " तुझा डोहांत बुडालेला भ्रतार अद्याप जीवंत आहे. आजपासून तीन दिवसांत मी तुझी व त्याची भेट करवीन. आतां तुझी सौभाग्यगंगा भरून चालेल. तुझा अभ्युदय होईल. तुझें ऐश्वर्य वाढेल. तीन दिवस मात्र तूं ही गोष्ट अगदीं गुप्त ठेव. "

असें बजावून राजपुत्र आपल्या आईबापांची गांठ घेण्यास म्हणून

तेथून निघून गेला. त्यानें कानांत सांगितलेलें स्नेहपूर्ण वचन ऐकून तिच्या मनाचा संशय फिटल्यासारखाच झाला. तो राजपुत्र खरोखर आपला भ्रतार चित्रांगदच असावा अशी तिची खात्री झाली. पण त्या गोष्टीच्या शक्याशक्यतेविषयीं विचार उत्पन्न होऊन ती ह्मणूं लागली, " ही गोष्ट खरी असेल काय ? मृत्यु पावलेला मनुष्य पुन्हां जिवंत होणें संभवनीय आहे काय ? यमुनेच्या डोहामध्यें जो बुडून मेला तो अमृतपान करून पुन्हां सजीव होऊन आला काय ? काळानें त्याला आपल्या पोटांतून पुन्हां बाहेर टाकून दिलें काय ? "

अशा प्रकारचे शेंकडों प्रश्न विचारून तिनें आपल्या मनाची स्थिति प्रगट करून दाखविली. आपल्या कल्पनेप्रमाणें अशक्य गोष्टी शक्य होऊन तो राजपुत्र चित्रांगदच ठरावा याबद्दल तिनें ईश्वराला अनेक नवस केले. अकरालक्ष वाती लावून शंकराला तितकींच बिल्वदळें वाहण्याविषयीं तिनें मनाचा निश्चय ठरविला. तिच्या मनाची शंका जाऊन तिचें मन स्वस्थ व्हावें ह्मणून तिच्या दासी तो पुरुष चित्रांगदच असल्याबद्दल तिला निश्चयपूर्वक सांगूं लागल्या. चित्रांगद नदीतीरावर दृष्टीस पडल्यापासून त्यानें जी कांहीं कृति केली त्याचा विचार करीत असतां त्यानें आपल्या हातास धरून आपल्या कानांत जें अमृतवचन सांगितलें त्यावरून तिचा संशय पूर्णपणें नष्ट झाला होता. तो राजपुत्र चित्रांगद नसून कोणी परका पुरुष असतां तर त्यानें आपल्या हातास स्पर्श केलाच नसता, असें ध्यानांत येऊन सीमंतिनीचें मुख प्रफुल्लित दिसूं लागलें. आपल्याला श्रीशंकराची भक्ति लवकरच फलद्रूप होणार अशा भरंवशानें ती सखीजनांसह शंकराचें नामस्मरण करीत आपल्या घरीं जाऊन पोंचली.

चित्रांगद आपल्या बरोबरच्या नागासह नदी तीर सोडून निघाला. तो नैषधदेशास जाऊन नगराबाहेरील एका उपवनांत उतरला. नागानें मनुष्यवेष धरून व त्याच्या शत्रूकडे जाऊन त्यांना चित्रांगद जिवंत होऊन आला असल्याचें अद्भुत वर्तमान सांगितलें. त्याचें भाषण खरें आहे की नाहीं याविषयीं त्यांनीं आपली खात्री करून घेतली. त्याच्या म्हणण्याप्रमाणें बारा हजार नागांचें सामर्थ्य संपादन करून चित्रांगद आला आहे हें समजतांच ते भयभीत झाले. त्यांनीं लागलीच इंद्रसेन व लावण्यवती यांना बंधमुक्त करून त्यांचें राज्य त्यांस परत दिलें. आपला पुत्र जीवंत होऊन आला आहे हें वर्तमान कळतांच तो पुण्यश्लोकनलराजाचा पुत्र भाविक इंद्रसेन आपल्या सैन्यासह नगराबाहेरील उपवनांत गेला. आईबाप दृष्टीस पडतांच चित्रांगदानें धांवत जाऊन त्यांच्या पायावर लोळण मारली. इंद्रसेनानें चित्रांगदाला पोटाशीं धरिलें. लावण्यवतीनें चित्रांगदाच्या गळ्याला घट्ट मिठी मारिली. चौदा वर्षें वनवास केल्यानंतर ज्याप्रमाणें श्रीरामचंद्र कौसल्येला भेटला त्याचप्रमाणें तीन वर्षें पाताळलोकीं वास करून आल्यावर चित्रांगद लावण्यवतीला भेटला. जन्मांधाला डोळे यावेत, गळ्यामध्यें यमाचे पाश पडले असतां मुखामध्यें अमृताचा थेंब पडावा त्याचप्रमाणें लावण्यवतीची स्थिति झाली. पौरजनांच्या झुंडीच्याझुंडी राजदर्शनास धावूं लागल्या. देशोदेशींचे राजेरजवाडे चित्रांगदास पाहण्याकरितां अनेक नजराणे घेऊन आले. अनेक तऱ्हेचा जयघोष सुरू झाला. वाद्यनादामुळें भूगोल डळमळावयास लागला. लक्ष्मणाला शक्ति लागून तो मूर्च्छित होऊन पडला असतां मारुतीनें द्रोणागिरी आणतांच जसा सर्वत्र आनंद झाला त्याप्रमाणेंच चित्रांगद, इंद्रसेन व लावण्यवती यांची भेट होतांच त्रिभुवन आनंदयुक्त झालें. मोठ्या

समारंभानें ते सर्वजण नैषधपुरांत गेले. इंद्रसेनानें सर्वत्रांना मोठमोठ्या देणग्या वाटल्या. ज्याच्या प्रसादानें आपला मेलेला पुत्र काळाचें उदर फोडून पुन्हां जिवंत होऊन आला त्या परमात्म्याच्या नांवाचा सर्वांनीं एकच गजर उसळून दिला.

चित्रांगद जिवंत होऊन आल्याचें वर्तमान इंद्रसेनाच्या दूतांकडून चित्रवर्म्याला समजतांच तो भूपति क्षणभर भानच विसरला. आनंदाश्रूंनीं त्याचे नेत्र सजल झाले. त्याचा कंठ दाटून आला. त्याच्या सर्व अंगावर रोमांच उभे राहिले. समाचार घेऊन येणारावर त्यानें रत्नांचा वर्षाव केला. त्यानें कित्येक रथ भरून नगरामध्यें साखर वाटली. राजधानींत मंगळवाद्यांचा घडघडाट सुरू झाला. राजानें आपलें भांडार उघडें करून ते गोरगरिबांस लुटून नेण्यास सांगितलें. चित्रवर्म्यासह सर्व मंडळी श्रीशंकराच्या नांवाचा गजर करून उड्या मारूं लागली. त्यांनीं सीमंतिनीला सर्व समाजांत उभी करून तिच्या अंगावर अमूल्य अलंकार घातले. शंकराच्या नांवाचा जयजयकार करून तिच्या गळ्यांत पुन्हां मंगळसूत्र बांधिलें. कांहीं दासींनीं तिच्या कपाळावर कुंकुमाचा टळटळीत टिळा लावून तिच्या डोळ्यांत अंजन घातलें. नगरांतील सर्व स्त्रिया सीमंतिनीच्या दर्शनाकरितां धावून आल्या. तिची आई सद्गदित होऊन तिला मिठी मारून बसली. सीमंतिनीचा सौभाग्यपर्वत आकाशाला जाऊन टेकला. तिचा ऐश्वर्यवृक्ष फोंफावून गगनाचें चुंबन करूं लागला. हा सर्व प्रसाद सोमवारव्रताचा आहे असें जाणून सर्वजण शंकराच्या नांवाचा घोष करूं लागले.

त्या सर्व समारंभासह चित्रवर्मा नैषधदेशास निघाला तों इंद्रसेनासहवर्तमान चित्रांगद आल्याचें वर्तमान त्याला विदित झालें. तें आनंददायक वृत्त कळतांच चित्रवर्मा जांवयाला सामोरा गेला.

चित्रांगदाचें दर्शन होतांच चित्रवर्म्यानें त्याच्या गळ्याला मिठी मारली. सर्व सृष्टि ब्रह्मानंदानें भरून गेली. देवगणांनीं त्यांच्यावर पुष्पवृष्टि केली.

नंतर त्यांना मिरवत मिरवत राजधानींत आणून चित्रवर्म्यानें सीमंतिनी व चित्रांगद यांचा पुन्हां अद्भुत लग्नसोहळा केला. चित्रांगदानें आपल्याबरोबर आणलेले पाताळलोकांतील अलंकार सीमंतिनीच्या अंगावर घातले. त्यानें त्या ठिकाणच्या कित्येक दिव्य वस्तु चित्रवर्म्याला अर्पण केल्या. सीमंतिनीनें सासुसासऱ्याच्या चरणावर मस्तक ठेविलें. त्यांनीं तिला मंगलदायक आशिर्वाद दिला. सर्व मंगलप्रद अशा मंगलकारक शिवनामाचा मंगल ध्वनी करून सर्वत्रांनीं सीमंतिनीच्या मंगलसूत्राचा महिमा गायला. चोहोंकडे आनंदीआनंद होऊन इंद्रसेन आपला पुत्र व स्नुषा यांसमवेत नैषधपुरास परत निघून गेला. अनेक राजांचा विचार घेऊन इंद्रसेनानें चित्रांगदाला राज्याधिकार समर्पण केला आणि तो तपोवनांत चालता झाला.

चित्रांगदानें बापाच्या पश्चात् दहाहजार वर्षें राज्य केलें. त्याला एकंदर आठ पुत्र झाले. ते सर्वजण आपल्या पित्याप्रमाणेंच पवित्र निपजले. ज्या एका भगवंताच्या आज्ञेनेंच जगतांतील सर्व व्यापार चालतात, ज्याची कृपा झाली असतां अशक्य गोष्टी शक्य होतात, ज्याच्या भक्तीचा आश्रय केला असतां भक्तजन काळासही अजिंक्य होतात, त्या सर्व सामर्थ्यसंपन्न, दयाळू, भक्तजनकैवारी अशा परमात्म्याच्या भक्तिरसांत गढून चित्रांगद आणि सीमंतिनी यांनीं अपूर्व यश जोडिलें, आणि आपलें नांव अजरामर करून ठेविलें.

---

# २ सावित्री.



अश्वपती या नांवाचा राजा मद्रदेशावर राज्य करीत होता. तो ज्ञानसंपन्न, नीतिमान व वेदविहित मार्गानें आचरण करणारा होता. त्याला पुत्रसंतान नव्हतें ह्मणून त्यानें सावित्रीदेवीची आराधना केली. तो नित्य दहा लक्ष जप करी. दररोज एक लक्ष संख्या हवन करी. दहा दिवसांनीं एकदां दूध पीत असे. याप्रमाणें त्यानें अठरा वर्षें तपश्चर्या केल्यानंतर त्याला सावित्रीदेवी प्रसन्न झाली. त्याच्या कपाळीं पुत्रसंतान मुळींच लिहिलेलें नसल्यामुळें सावित्रीदेवीनें त्याला एक कन्या होण्याविषयीं वरप्रदान दिलें. प्रसाद देऊन सूर्यकन्या सावित्रीदेवी गुप्त झाली. देवीच्या प्रसादामुळें राजा हर्षही पावला आणि त्याला दुःखही वाटलें. आपल्याला पुत्रसौख्य भोगावयास सांपडणार नाहीं असें देवीनें निक्षून सांगितल्यामुळें तो कष्टी झाला; पण देवीच्या वरदानानें आपल्याला एक कन्या तरी होणार आहे याबद्दल तो त्यांतल्यात्यांतच आनंदीतही झाला.

कांहीं काल गेल्यानंतर अश्वपतीच्या पत्नीला डोहाळे लागले. नवमास पूर्ण होतांच तिच्या पोटीं एक कन्यारत्न उपजलें. ती साक्षात् सावित्रीदेवीच अंशरूपानें अवतीर्ण झाली आहे असें समजून राजानें त्या मुलीचें नांव सावित्री असेंच ठेविलें.

हीं अश्वपतीची कन्या सावित्री स्वरूपानें फार सुंदर होती. सर्व अप्सरांचें सौंदर्य तिच्यावरून ओवाळून टाकावें अशा अनुपम रूपगुणानें ती संपन्न होती. तिचें तेज पाहून मदनही आनंदानें

नाचूं लागे. ती लावण्यरूपीं अमृताची केवळ नदीच होती. हरिणीच्या बालकाप्रमाणें तिचें नेत्र शोभायमान दिसत. तिचें नेहमीं हास्यमुख असे. तिचे ओंठ प्रवालाच्या रंगानें युक्त होते. तिचा स्वर कोकिलेसारखा मंजुळ व गोड होता. तिच्या अंगाच्या सुवासानें अश्वपतीचें गृह नेहमीं सुगंधयुक्त झालेलें असे. अशा प्रकारची ती सुकुमार कन्या दिवसानुदिवस वाढत चालली. ती आपल्या वयांत येऊन उपवर झाली तेव्हां अश्वपती तिच्या अनुरूप असा वर शोधूं लागला. त्यानें पुष्कळ ठिकाणीं जाऊन तेथील राजपुत्रांच्या समक्ष गांठी घेतल्या; पण त्यांतून कोणीही त्याच्या पसंतीस येईना. त्यामुळें तो स्वतः मोठ्या काळजींत पडला.

सावित्री तर दिवसेंदिवस जास्तच मोठी होत चालली. तिच्या अनुपम सौंदर्यास मोहून आपण होऊनही तिला कोणीं योग्य राजपुत्र मागणी घालीना. अखेर अश्वपतीनें आपल्या मनांत कांहीं विचार ठरवून सावित्रीला स्वेच्छेनेंच वर पसंत करून त्यास वरून येण्याकरितां पाठविलें. राजाचे सचीव, मंत्री, प्रधान यांना बरोबर घेऊन सावित्री देशांतरावर हिंडतां हिंडतां तिनें आपल्या अनुरूप असा एक राजपुत्र पसंत केला आणि त्यास मनानें वरून ती आपल्या बापाच्या राजधानीस परत आली.

यावेळीं अश्वपतीच्या घरीं नारदमुनींची स्वारी आलेली होती. राजाच्या व नारदाच्या गप्पा चालल्या होत्या. नारद आले असल्याचें वृत्त समजतांच सावित्री त्यांच्या पाया पडण्याकरतां राजाच्या महालांत गेली. तिनें राजाला व देवर्षि नारदाला नमस्कार केला. अश्वपतीनें नारदाला तिची सर्व हकीगत सांगून तिला विचारिलें, "मुली; तुला ज्या कार्याकरितां पाठविलें होतें तें सफल झालें असल्यास येथल्यायेथेंच सर्व मजकूर सांग; म्हणजे मी चिंतारहित

होईन. हे नारदमुनि कोणी परके नाहींत. त्यांच्या देखत बोलण्यास लाजण्याचें कांहींएक कारण नाहीं. ”

बापाची सूचना ध्यानांत घेऊन सावित्री ह्मणाली, “ शाल्व-देशाचा द्युमत्सेन राजा सर्वांना माहीतच असेल. तो स्वतः अंधळा, ह्मातारा असून राज्यभ्रष्ट आहे. हल्लीं तो वनवास भोगीत आहे. त्याच्या शत्रूंनीं त्याचें राज्य हरण केल्यामुळें तो सांप्रत मोठ्या आपत्तींत आहे. तरी पण तो कुल-शील-संपन्न असून त्यानें कामक्रोधादि शत्रूंना जिंकलें आहे. त्याची भार्या आणि गुणसंपन्न असा एक पुत्र एवढाच कायतो त्याचा परिवार आहे. तो राजा द्युमत्सेनच माझा सासरा होण्यास योग्य आहे. ”

सावित्रीनें द्युमत्सेनाचा पुत्र आपल्याला वर पसंत केला आहे असें कळतांच नारदमुनींनीं तोंड वाईट करून त्याबद्दल आपली नापसंती दर्शविली. नारदानें कपाळाला आठ्या घातल्या असें पाहून अश्वपतीनें त्यास विचारिलें, “ आपल्याला द्युमत्सेनाचें स्थळ योग्य वाटत नाहींसें दिसतें. ”

यावर नारदानें सांगितलें, “ पसंत आहे आणि नाहीं; पण मी ह्मणतों द्युमत्सेनाचा पुत्र सत्यवान याच्यावांचून दुसरे अविवाहित राजपुत्र सांपडण्यासारखेच नाहींत कीं काय ? ”

नारदाची नापसंती जाणून अश्वपती बोलला, “ नारदमुने ! आपण सत्यवानाला नाक कां मुरडतां हें मला उघड सांगा. सत्यवान हा गुणवंत, तरुण, कुलशीलसंपन्न आहे; या बातमींत कांहीं खोटे-पणा नसेल तर आपण त्याला नापसंत कां करिता ? तो राज्यरहित असून वनवासी असेल, त्याच्यावर दारिद्र्यानें हल्ला केला असल्यामुळें तो अन्नालाही महाग झाला असेल तरी त्याच्या सद्गुणांकडे लक्ष देऊन सावित्रीनें त्याला माळ घालण्यास काय अडचण आहे ?

एखादें कमल विहिरींत उत्पन्न झालें असलें तरी भ्रमरानें त्यांतील मध प्राशन करण्यास काय हरकत आहे ?"

अलीकडे आपल्यामध्यें लग्नासंबंधानें काय घोटाळा झाला आहे पहा ! शास्त्रानें आठपासून दहावर्षांचे आंत वधूचा विवाहकाल ठरविला आहे. परंतु, ही गोष्ट आमच्यांतील कित्येक विद्वानांना रुचेनाशी झाली आहे. कांहीं तरी दिसण्यामध्यें सयुक्तिक असा कार्यकारणभाव जडवून देऊन आमच्या सामाजिक सुधारकांनीं बाल-विवाहाचा निषेध चालविला आहे. प्रौढविवाहाचें तत्व लोकमान्य करण्याकरितां पुष्कळांची खटपट चालली आहे. ज्यांना प्रौढविवा-हाचा मुद्दा स्थापित करावयाचा आहे त्यांच्याकडून सावित्री-सारख्या राजकन्यांचीं उदाहरणें प्रतिपादन करण्यांत येतात. अश्व-पतीनें ज्याप्रमाणें सावित्रीला प्रौढ होऊं देऊन स्वेच्छेनें वर पसंत करून येण्यास सांगितलें त्याचप्रमाणें आमच्या लोकांनीं आपापल्या मुली चौदा पंधरा वर्षांपर्यंत अविवाहित राखाव्या आणि पुढें त्यांचा त्यांनींच आपणाकरितां वर शोधून काढावा असें आमच्यांतील स्त्री-सुधारणा करणारांचें मत आहे. हें मत स्वीकारून शास्त्राची पाय-मल्ली करण्यास तयार होण्यापूर्वीं आपण ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, सावित्रीचें उदाहरण सर्व ठिकाणीं ग्राह्य होण्यासारखें नाहीं. सावित्री ही क्षत्रियकन्या होती. आठपासून दहा वर्षांपर्यंत जो विवाहकाल शास्त्रसंमत आहे, तो ब्राह्मणकन्यांकरितां आहे. क्षत्रियांचें उदाहरण ब्राह्मणजातीस कसें लागू करितां येईल ? क्षत्रि-यांचें अनुकरण करावयाचें ठरलें ह्मणजे मग ब्राह्मणवर्णांतील मुलांचा व्रतबंधही क्षत्रियांप्रमाणेंच करावा लागेल. ब्राह्मणांच्या मुलांचा व्रत-बंध क्षत्रियांना विहित अशा कालीं होऊं लागला ह्मणजे मोठीच आपत्ति ओढवण्याचा संभव आहे. तात्पर्य, ज्या त्या वर्णानें आपा-

पत्या आश्रमधर्मानें वागणेंच उचित् होय. या मुद्याचें महत्व जाणू-नच श्रीकृष्णांनीं गीतेमध्यें ' परधर्मो भयावहः ' हें तत्व प्रतिपादन केलें आहे. दुसऱ्याचा धर्म फार चांगला किंवा जास्त सोईचा असला तरीही तो स्वीकारणें भयप्रद आहे असें जें भगवा-नांनीं सांगितलें आहे त्याची व्याप्ति फार विस्तृत आहे. हिंदु-धर्मांतील लोकांनीं मुसलमानांचा धर्म स्वीकारूं नये; ब्राह्मणवर्णांतील लोकांनीं पार्शी धर्माची दीक्षा घेऊं नये एवढ्यानेंच भागण्यासारखें नाहीं. ब्राह्मणादि चारीवर्गांनीं सनातनधर्मांतील वर्णाश्रमपद्धतींतही आपणास अविहित अशा मार्गाचें अवलंबन करूं नये; ह्मणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे जरी एका धर्मांतीलच भेद आहेत तरी त्यांनीं स्वतःचा धर्म सोडून आपापसांतील एकमेकांच्या धर्मांचाही स्वीकार करणें धोक्याचें आहे असाच या गीतावचनाचा इत्यर्थ दिसतो. स्त्रीसुधारकांना गीतावचनांचा अर्थ समजत नाहीं असें नाहीं. त्यांना शास्त्राचा खरा अर्थ व्यवस्थित समजतो; पण त्यांना तो अर्थ ग्राह्य नसतो. असें करण्यांत त्या शास्त्राचा पाडाव करावा असाच कांहीं केवळ त्यांचा हेतु नसतो. सांप्रतची परिस्थिति जाणून त्यांचें चित्त स्त्रीजातीच्या दुःखाबद्दल कळवळत असतें. त्यांच्या अंतःकरणांत दयेचें स्फुरण होऊन स्त्रियांच्या हिताकरितांच ते शास्त्रावर उठलेले असतात. त्यांच्या मनांतील हेतु पाहिला ह्मणजे तो स्तुत्य आहे असें ह्मणणें भाग आहे. वावडिंगापेक्षां केशराचें महत्व जास्त आहे असें धरून चाललें तरी पोटांतील कृमींची पीडा कमी करण्याच्या कामीं वावडिंगेंच केशरापेक्षां जास्त हितकर आहेत असें ह्मणण्यावांचून गत्यंतरच नाहीं. कस्तुरी किती तरी सुवासिक असते, पण दाढेला ठणका लागला किंवा कानठळी उठली ह्मणजे हिंग किंवा लसूणच जास्त श्रेयस्कर ठरणार नाहीं काय ? धर्माज्ञा बिकट असल्या तरी त्या परिणामीं अत्यंत हितकर

आहेत हें ध्यानांत घेऊन त्यांचाच स्वीकार करणें इष्ट नाहीं काय ? अलीकडे आमच्या देशांत जें वैधव्य जास्त वाढलें आहे त्याचा बंदोबस्त होण्याकरितांच समाजहितवादी बालविवाहाचें तत्व झुगारून देऊन प्रौढ-विवाहाचें तत्व रूढ करूं पहात आहेत; पण वैधव्यप्रतिबंधाचा हा खरा उपाय नव्हे. विवाहावांचून वैधव्यदशाच संभवनीय नाहीं हें जाणून उद्यां आमची मंडळी विवाहपराङ्मुख होण्याचा देखील मुद्दा पुढें आणतील; पण अशानें आमचा निभाव कसा लागेल ? अशानें आपली आपत्ति दूर होणार नाहीं. वैधव्यहरण करण्याचा खरा उपाय शास्त्रानें सांगितला आहे. कोणत्याही प्रकारच्या आपत्तींतून उद्धार करण्याबद्दल धर्मानें दीक्षा धारण केलेलीच आहे. आपण सर्वांनीं आपापल्या धर्माची यथोपचार सेवा चालविली आणि धर्मसंमत सदाचाराला मिठी मारिली ह्मणजे आपणापुढें आपत्तींचें कांहींच चालणार नाहीं. सावित्रीनें हेंच केलें. ब्राम्हण, क्षत्रिय हा भेद सोडून देऊनही सावित्रीचें वर्तन पाहिलें तरी हाच मुद्दा स्थापित होतो. प्रौढविवाह करावा, मुलगी चांगली मोठी झाली ह्मणजे तिला कोणातरी धनसंपन्न माणसाच्या पदरीं बांधून आपण श्रीमंत होण्याचा योग साधावा अशा भावनेनें अश्वपतीनें सावित्रीला प्रौढ केलें नव्हतें. तिच्या अनुरूप असा वर लवकर सांपडेना ह्मणून तिला प्रौढ होईपर्यंत अविवाहित रहावें लागलें. या कामीं अश्वपतीनें शास्त्राचें यथायोग्य संरक्षण केलें होतें. मुलगी मोठी झाली ह्मणून त्यानें ती वाटेल त्याला दिली नाहीं. त्याला तिच्या मोठेपणाची सबब पुढें करून आपला अंतस्थ कावा साधावयाचा नव्हता. मुलगी चांगली दानयोग्य झाली तरी तिला सद्गुणी अशा वराला देणेंच शास्त्रसंमत आहे. सद्गुणसंपन्न असा शुद्ध व पवित्र वर प्राप्त होईपर्यंत मुलींचा विवाह कितीही लांबला तरी हरकत नाहीं असेंच शास्त्राचें ह्मणणें आहे. मुलगी

अगदीं गळ्याला लागली तरी तिला शास्त्रनिषिद्ध अशा वराला देतां कामा नये. शास्त्रसंमत असाच आचारशुद्ध वर मिळेपर्यंत थांबलें पाहिजे, हा शास्त्राचा मुद्दा फार विचार करण्यासारखा नाहीं काय ?

असो; अश्वपति हा धन, वैभव, विलास, सुख, चैन यांपेक्षां सद्गुणासच विशेष किंमत देणारा आहे असें जाणून नारदाला संतोष वाटला. राजाचा प्रश्न ऐकून त्यानें सांगितलें, " राजा; तुझें भाषण यथार्थ आहे. सद्गुणाच्या मानानें मी द्युमत्सेनाचा पुत्र सत्यवान याच्याबद्दल कधींही नापसंती दर्शविली नसती; पण त्या सत्यवाना-बद्दलचा कांहीं गुप्त वृत्तांत मला माहीत आहे. मी त्याची भवितव्यता जाणतों. आजपासून एक वर्षानें त्या राजपुत्रास मृत्यु प्राप्त होणार आहे. याकरितां तूं त्याला जामात करूं नको. या सावित्रीनें जरी आपल्या मनानें तोच राजपुत्र वरिला असला तरी तिनेंही आपलें मन बदलण्यास हरकत नाहीं. शुक्राचार्यांची कन्या देवयानी हिनेंही कचाला सोडून देऊन ययातीला माळ घातली ही गोष्ट तुह्मांला ठाऊक असेलच. "

नारदाचें हें ह्मणणें अश्वपतीला अर्थात्‌च पसंत पडलें. सावित्रीनेंही तें ऐकलेंच होतें. तिचें मन पालटून तिनें दुसऱ्या राजपुत्राचा शोध करावा या हेतूनें तिचा बाप तिला ह्मणाला, " कन्यके ! श्रीमंती-पेक्षां सद्गुणास मान देणें इष्ट होय. कुलशील, सत्व, गुण यांच्या मानानें पाहिलें असतां सत्यवानच योग्य आहे असें माझें व नारद-मुनींचेंही मत आहे; पण तो राजपुत्र जर अल्पायुषी आहे तर त्याचा स्वीकार करणें अनिष्ट नाहीं काय ? गंधयुक्त, शीतल, मंदमंद वाह-णारा असा वायु श्रेयस्कर खरा; पण तो जर विषमिश्रित असेल तर त्याचा त्याग करावयास नको का ? "

अश्वपतीचें ह्मणणें सावित्रीला कसें रुचणार ? तिच्या मनाचा

निर्धार होऊन तिनें आपल्या मनानें सत्यवानाला माळ घातली होती. तिचा विवाहविधीच कायतो व्हावयाचा होता; पण तिनें आपल्या मनानें त्याला पति मानिलें होतें त्यामुळें ती त्याची विहित पत्नी झाली होती. तिनें ज्या पुरुषाला एकदां पति मानलें त्याची भवितव्यता समजली असूनही तिनें आपलें मन पालटलें नाहीं; त्या अर्थीं तिनें आपल्या हातांनींच आपल्या पायावर दगड पाडण्याचा उद्योग केला असें समजून कित्येक ज्ञानसंपन्न ह्मणविणारे सूज्ञ जन सावित्रीला महामूर्खांत काढतील. ते तिला अप्रबुद्ध, अजाण, अशिक्षित ठरवूं पाहतील. पण यांत सावित्रीचा कांहीं एक दोष नव्हता. ती अप्रबुद्ध किंवा महामूर्ख, आत्मघातकी नव्हती. ती हट्टी होती; पण तिचा हट्ट कोणत्या कार्याकरितां होता बरें ? आर्य पतिव्रतांचा विहिताचार पाळण्यांतच तिनें आपल्या हट्टाचा उपयोग केला ! तिचा निश्चय पालटला नाहीं. आर्यस्त्रियांच्या मनांतील एकपतिव्रताच्या कल्पनेची मजल कोठपर्यंत असते ही गोष्ट सावित्रीनें आपल्या उदाहरणानें जगाच्या प्रत्ययाला आणून दिली. एक पति मृत झाल्यानंतर दुसरा पति करण्याची कल्पना तर बाजूसच राहिली; पण विहितविधीनें जो पति मानलेला पुरुष पति व्हावयाचा होता त्याचा मृत्यु कळून चुकला तरी देखील जी पतिपत्नी यांच्या कर्तव्यापासून तिळमात्र ढळली नाहीं त्या सतीपुढें शहाण्यासुरत्या सर्व जनांनीं साष्टांग नमस्कार घालावयास नको काय ?

पातिव्रत्याचें मर्म जाणणाऱ्या त्या बुद्धिमान साध्वीनें आपल्या पित्यास उत्तर दिलें, " बाबा; आपलें ह्मणणें सयुक्तिक दिसतें; पण समुद्राला सोडून नदीचा ओघ पुन्हां कधीं परत फिरल्याचें कोणीं ऐकलें आहे काय ? रत्न हें दिव्यापेक्षां कितीतरी उज्वल असतें; दिव्याच्या ठिकाणीं रत्नाचा नुसता भास होतो; असें आहे तरी

दिव्याचा त्याग करून पतंगाचें मन रत्नाच्या ठिकाणीं एक क्षणभर तरी रममाण होईल काय ? जगतामध्यें आणखी दुसरे कित्येक राजपुत्र श्रेष्ठगुणांनीं संपन्न व पूर्णायुषी असतील; पण आतां मला त्यांच्याशीं कांहींच कर्तव्य नाहीं ! मीं ज्याला एकदां वरिलें त्याला वरिलेंच. आतां माझ्या या देहावर अन्य कोणाचीही सत्ता चालणार नाहीं. या माझ्या आग्रही स्वभावाबद्दल तुम्ही कोणी कांहीं म्हटलें तरी कुलीन, सदाचारी, पातिव्रत्याचें मर्म जाणणाऱ्या साध्वी स्त्रिया माझी स्तुतीच करतील. तुम्ही कोणीही माझें मन बदलण्याचा यत्न करूं नका. मीं ज्याला स्वमनानें माळ घातली आहे त्याची आयुष्यमर्यादा कितीही अल्प असली तरी आतां मागून त्याचा विचारच कर्तव्य नाहीं. त्या राजपुत्रावांचून जगांतील सर्व पुरुष मला पित्यासमान आहेत ! हा माझा दृढनिश्चय आहे. प्रत्यक्ष यमधर्म माझा गळा चिरण्यास आला तरी मी आपल्या निश्चयापासून काडीमात्र ढळणार नाहीं ! "

सावित्रीचा निर्धार पाहून नारदमुनींनीं अश्वपतीला सांगितलें, " राजा; ही तुझी कन्या साध्वीच्या आचरणानें संपन्न आहे. तिला भलताच उपदेश करून भागावयाचें नाहीं. तिच्या मनामध्यें पातिव्रत्यासंबंधानें जी भावना वसत आहे, स्त्रीधर्म पूर्णपणें पाळण्याबद्दल तिचा जो शुभ निश्चय झाला आहे तोच तिला यशदायक होईल. ज्याचे प्राण निघून गेले आहेत अशाचें तारण करण्याच्या कामीं अमृतापेक्षांही तुझ्या कन्येनें केलेल्या शुभ निश्चयाचें महत्व अधिक आहे. ज्यांनीं सद्धर्माची कास बळकट धरिली त्यांचें अखेर कल्याणच व्हावयाचें. "

इतकें बोलून देवर्षि नारद निघून गेले. अश्वपती सावित्रीला बरोबर घेऊन द्युमत्सेनाकडे गेला. द्युमत्सेनानें आपली विपत्ति वर्णन करून आपलें स्थळ अयोग्य आहे असें दर्शविलें. अश्वपतीनें

आपल्या कन्येचा निर्धार काय आहे तो द्युमत्सेनास कळविला. तेव्हां द्युमत्सेनानें त्याचें ह्मणणें मान्य केलें. अश्वपतीनें सर्व तयारी करून सावित्री व सत्यवान यांचें लग्न लाविलें. सावित्रीला सासरीं ठेवून अश्वपती आपल्या नगरास गेला.

द्युमत्सेन अगदीं हीन स्थितींत असल्यामुळें त्याचा मुलगा सत्यवान याला धड वस्त्रही नेसावयास नव्हतें. अर्थातच सावित्रीही वल्कलें परिधान करून त्या तपोवनांत तापसी बनली. पतीबरोबर वनवास कंठण्यांत तिला मुळींच दुःख वाटलें नाहीं. इतकेंच नव्हें तर सत्यवानाची शोकप्रद भवितव्यता तिच्या मनांत घोळत राहिलेली नसती तर पतीबरोबर त्याहीपेक्षां जास्त विपन्नावस्थेंत ती अधिक आनंदानें काळ कंठीत राहिली असती. पण आतां लवकरच आपल्या पतीवर भयंकर प्रसंग गुदरणार या चिंतेनें ती व्यापलेली होती. तशा अवस्थेंतही ती सासुसासऱ्याची सेवा करण्यांत अंतर पडूं देत नसे. आपल्या भ्रताराला देव समजून ती अनन्यभावानें त्याची सेवा करी.

नारदस्वामींनीं सांगितलेला भयंकर दिवस अगदीं जवळ येऊन ठेपला. त्या प्रलयकाळाला फक्त चार दिवसांचाच अवकाश राहिला. तेव्हां त्या साध्वीनें पतिप्राणांचें संरक्षण होण्याकरितां व्रताचा आरंभ केला. तिनें तीन दिवस उपवास केला. त्या तीन दिवसांत तिच्या व्रताचरणांत अत्यंत तीव्रता दिसून आली. तशी तीव्रता श्रीशुकमुनींच्या तपश्चर्येंतही रंभेला आढळून आली नाहीं. व्रताचे तीन दिवस पार पडल्यानंतर तिच्या सासऱ्यानें तिला पारणा करण्यास सांगितलें. व्रताची पारणा संध्याकाळीं करावयाची असें सांगून तिनें सासुसासऱ्यास वंदन केलें.

व्रताचे तीन दिवस पार पडून तो महाप्रलयाचा दिवस उगवला. भवितव्यतेप्रमाणें सत्यवानास बुद्धि होऊन फळें, मुळें, लांकडें

आणण्याकरितां तो वनांत जाण्यास निघाला. तें पाहून सावित्री त्याला नम्रतेनें म्हणाली, " आज मलाही आपणाबरोबर वनांत न्यावें. ही माझी आग्रहाची पहिलीच विनंति आहे. माझी एवढी विनंति आज मान्य करावी. "

त्यावर सत्यवान तिला म्हणाला, " तुला बरोबर नेण्यास हरकत नाहीं, पण वनांतील मार्ग कोमल असतो अशी कां तुझी समजूत आहे ? वनांतील मार्ग खडतर असतो. पालखींत बसून जाणाऱ्या स्त्रियांनाही वनपथांतील मार्गक्रमण तापदायक होतें. तुला तर मजबरोबर पायीं चालावें लागणार. तुझे पाय लोण्याप्रमाणें मऊ आहेत. तशांत तीन दिवसांच्या उपवासानें तूं थकली आहेस. तुला मार्ग चालतांना क्लेश होतील. तुझी व्यथा मला कशी बरें पाहवेल. स्त्रियांच्या नाजुक अंतःकरणाला वनवासाच्या कथा ऐकूनसुद्धां पीडा होते. मग तूं स्वतः रानांतील खडतर मार्ग चालूं लागलीस ह्मणजे किती बरें व्याकुळ होशील ? ह्मणून ह्मणतों तूं येथेंच आश्रमांत रहावेंस हें बरें. "

याप्रमाणें त्यानें तिची पुष्कळ समजूत केली; पण ती ऐकेना. तिचा विशेष आग्रह पाहून त्यानें तिला सासुसासऱ्याची परवानगी घेऊन मग आपल्याबरोबर येण्यास मोकळीक दिली. वडिलांची आज्ञा ह्मणजे गयादि पुण्यक्षेत्रांच्या यात्रेपेक्षां अधिक आहे हें तत्व त्यांना ठाऊक होतें. सावित्रीनें सासुसासऱ्याची परवानगी मिळविली; आणि ते दोघे अरण्यांत गेले.

तें अरण्य फार भयंकर होतें. सत्यवान आपल्या हातांत फरशी घेऊन लांकडें तोडूं लागला. तो अस्तमानाचा समय होता. सकाळपासून संध्याकाळपर्यंत झालेल्या श्रमानें तो फार थकला असेल असें जाणून सावित्री त्यास आश्रमाकडे परत चलण्याविषयीं विनवूं

लागली; पण तेथून जाण्याची त्याला बुद्धि होईना. त्याचा मृत्युकाळ जवळ येऊन ठेपला होता. सावित्रीची विनंति ऐकत ऐकत त्यानें लांकडें तोडण्याचें काम चालविलेंच होतें. तिच्या विनंतीस कांहीं उत्तर करावें असें सत्यवानाच्या मनांत येतें तोंच त्याच्या डोक्यावर तो मोडीत असलेल्याच एका लांकडाचा सपाटा बसला. त्या तडाक्यानें तो अगदीं बेजार झाला. डोक्यावर पाषाणप्रहार झाला असतां जशा वेदना होतात त्याप्रमाणें त्याच्या मस्तकांत कळा निघूं लागल्या. लांकडाचा सपाटा वर्मावर बसल्यामुळें त्याचें मस्तक भण-भणावयास लागून तो भ्रममाण होऊं लागला. पतीची ती दुःखित अवस्था पाहतांच सावित्रीनें आपली मांडी दिली व सत्यावान त्यावर डोकें ठेवून पडला. सावित्री आपल्या मऊ हातांनीं त्याचें डोकें चेपूं लागली. तो चांगला सावध व्हावा या हेतूनें तिनें केलेले सर्व उपाय निष्फळ झाले. त्यास जास्त जास्त मूर्च्छा येऊं लागली. अखेर तो पूर्ण बेशुद्ध झाला.

या वेळीं एक प्रहर रात्र झाली होती. आकाशांत तारांगणें चमकत होतीं. अशा समयीं ती बिचारी सावित्री आपल्या पतीचें डोकें आपल्या मांडीवर धारण करून बसली असतां तिचा पति बेशुद्ध झाला. पतीची ती अवस्था पाहून ती अतिशय घाबरली. नारदस्वामींनीं सांगितल्याप्रमाणेंच प्रसंग प्राप्त होणार अशा भावनेनें तिचा कंठ दाटून आला. तिची स्वतःची बुद्धीही भ्रम पावूं लागली. पति सावध व्हावा म्हणून ती त्याला आपल्या पदरानें वरचेवर वारा घाली; पण त्याचा कांहीं उपयोग होत नसे. कांहीं वेळ जातांच सत्यवानाचा श्वासोच्छ्वासही बंद झाला. तें पाहतांच त्या साध्वीच्या डोळ्यांतून अश्रूंचे पाट वाहूं लागले. तिचें सर्व शरीर थरथर कांपा-वयास लागलें. ती मोठमोठ्यानें हुंदके देऊन विलाप करूं लागली.

आपल्या प्राणाचा धनी अखेर आपणास सोडून गेला हें जाणून तिचा प्राण बाहेर पडण्याच्या बेतास आला. मनामध्यें सर्व विचारांची कालवाकालव होऊन ती आपल्या प्रिय पतीला उद्देशून ह्मणूं लागली, "हे प्राणनाथ; आतां येथें कोठवर पडून राहणार? आश्रमामध्यें मामंजी आपली वाट पाहून कंटाळले असतील. आपण मला टाकून दूर निघून गेला हें ऐकतांच आपला अंध पिता व थकलेली माता दोघे प्राण सोडतील. आपण माझ्याशीं एक शब्द तरी बोला हो! माझे सर्व अन्याय क्षमा करून मजवरचा राग टाका. हे प्रियकांत! आपल्याला भूक लागली असेल. उठा उठा! लौकर उठा! या दीन कांतेचा त्याग करणें आपल्याला उचित् आहे काय? हायरे कर्मा! तुझी गती किती विचित्र आहे ही! हे प्रभो, हे करुणाकर वैकुंठाधिपते! माझ्या सौभाग्याचा नाश करण्यांत तुला काय आनंद वाटला! तुझ्या संहारशक्तीनें माझा प्राण हरण केला असता तर मी उलट तिचे उपकारच मानले असते. माझ्या पतीच्या जिवास अपाय करून तुझी संहारशक्ति दुसरी हत्या विनाकारण आपल्या माथ्यावर घेत आहे. कारण पतीच्या पश्चात् मीं पतिव्रतेनें देह ठेवणें शक्य नाहीं! हे दीनदयाळ प्रभो! तुला मी अन्यायी तरी कसें ह्मणूं? तूं न्यायी आहेस असा तुझा सर्वत्र लौकिक आहे. त्याचप्रमाणें तूं भक्तकाजकैवारी आहेस अशीही तुझी ख्याती आहे हें मात्र तूं विसरलास वाटतें? मी अनन्य होऊन तुझें नाम जपीत असतांना तुझी संहारशक्ति माझ्या पतीच्या जिवास अपाय करते ही गोष्ट तुला कलंक लावणारी नाहीं काय? हे प्रभो यमधर्मा! पतीचा प्राण रक्षण करण्याकरितां जिनें तीव्र तप केलें आहे, पतिसेवेमध्यें जिनें कधींही हयगय केली नाहीं; सासूसासऱ्याच्या चरणसेवेला सदा दक्ष राहून जिनें पतीलाच दैवत मानलें आहे, तिन्ही लोकांवर

ज्याची सत्ता चालते अशा प्रभूला जी सदोदित् शरण गेलेली आहे त्या या शरणागत सावित्रीच्या पतीच्या गळ्याभोंवतीं फास टाकण्यास तुला भीति कशी वाटली नाहीं ! तुझ्या हातून घडणाऱ्या अन्यायाबद्दल तुला कोणीच जाब विचारणारा नाहीं काय ? "

याप्रकारें शोक करून ती अनाथ अबला उदासीनतेनें चारी दिशेस पाहूं लागली. यावेळीं प्रभु यमधर्म सत्यवानाचा लिंगदेह घेऊन दक्षिणदिशेला चालला होता. त्या पतिव्रतेच्या मुखांतील उद्गार त्याच्या कानावर पडतांच त्याचें पाऊल तेथेंच घोटाळून तो तिच्या दृष्टीस पडला. ज्यानें आपल्या हातांत पाश धारण केले आहेत अशा त्या कालपुरुषास पाहतांच सावित्रीनें आपल्या पतीच्या डोक्याखालून आपली मांडी काढून घेतली. त्याचें शिर अलगत धरणीवर ठेऊन ती लागलीच उभी राहिली. मोठ्या विनयानें त्या पुरुषापुढें हात जोडून ती त्यास म्हणाली, " आपण खरोखर कोणी तरी देव आहां. माझा विलाप ऐकूनच आपण येथें धावून आला आहां. आपल्या दर्शनानें मीं धन्य झालें. आपलें नांव ऐकून माझे कान तृप्त व्हावेत अशी माझी प्रार्थना आहे. "

तिची विनंति ऐकून त्या पुरुषानें सांगितलें, " मला यमधर्म ह्मणतात. मी तुझ्या पतीला नेण्याकरितां आलों आहे. "

यमाचें भाषण ऐकून सावित्री ह्मणाली, " हें काम करण्यास आपण स्वतःच कां श्रम घेतले. वस्तुतः हें आपल्या दूतांचें काम आहे. " यावर यमानें तिला सांगितलें, " तुझा पति सत्यवान हा सद्गुणी, पुण्यवान् असल्यानें हा दूतांनीं नेण्यास योग्य नाहीं. सेवकांनीं करावयाचीं कृत्यें वेगळीं असतात. अशा पुण्यपुरुषाचे प्राण हरण करण्यास आह्माला स्वतःलाच यावें लागतें. "

असें सांगून यमधर्म पुढें चालूं लागला. सावित्रीही त्याच्यामागें

जाऊं लागली. ती नम्र होऊन आपल्या मागोमाग येत आहेसें पाहून यम बोलला, " बाई, तूं कां म्हणून माझ्यामागें येत आहेस ? तूं थोर पतिव्रता आहेस हें जाणून या ठिकाणीं मी स्वतः प्रकट झालों. तुला फार श्रम झाले आहेत. पति जिवंत होता तोंपावेतों त्याचीं एकनिष्ठ सेवा केल्यामुळें तूं पतिऋणांतून मुक्त झाली आहेस. आतां तूं परत जा. पतीची उत्तरक्रिया करून त्याचें ध्यान करीत आयुष्याचा काल काढ."

सती सावित्री प्रखर पातिव्रत्यानें संपन्न नसती तर यमाचें सयुक्तिक भाषण ऐकून ती परत गेली असती; पण पतिव्रतेनें ज्याच्याकरितां स्वतःच्या देहावर प्रेम करावयाचें तोच जर यमाच्या पाशांत होता तर ती तेथून परत कशी जाईल बरें ? तिनें यमाला खडखडीत जाब केला कीं, " हे प्रभो ! मी तुझी कन्या आहें. मी तुझे पाय कधींही सोडणार नाहीं. मी साध्वीव्रतानें संपन्न आहें. तूं जिकडे माझ्या पतीला नेशील तिकडे मलाही घेऊन जा. जिकडे पतीचा प्राण तिकडेच पत्नीचा प्राण ! हाच आम्हां पतिव्रतांचा मुख्य धर्म आहे ना ? मी येथपर्यंत तुझ्याबरोबर आलें आहें. सज्जनाबरोबर सात पावलें चालण्याचा सहवास घडला तरी त्यांच्या स्नेहाचा लाभ होतो, असें संतवचन आहे. तूं सज्जन आहेस. मीं येथपर्यंत तुझ्याबरोबर येऊन तुझा स्नेह जोडला आहे. तुझ्यासारख्याचा संवगडी संकटांत राहणें शक्यच नाहीं. तूं पितृपति आहेस, समदृष्टि आहेस; तुला धर्मराज म्हणतात. तुझें यश सत्य आहे. तूं या कन्येवरही दया कर. "

सावित्रीचें हें चातुर्यपूर्ण भाषण ऐकून यमधर्म संतोष पावला. पूर्णचंद्रामुळें जशी सागराला भरती येते त्याप्रमाणें सावित्रीच्या मुखांतील या अर्थपूर्ण शब्दांमुळें तो यमधर्म प्रेमानें गहिंवरून गेला. त्याच्या अंतःकरणांत दयेचे पाझर फुटून तो तिला म्हणाला, " जन्ममृत्यूनें कोणासही सोडलें नाहीं. तेव्हां या सत्यवानाला घेऊन जाणें भागच आहे;

तरी पण तुझें शुद्ध पातिव्रत्य पाहून मी तुला प्रसन्न झालों आहें. एका पतिप्राणाखेरीज तूं मजजवळ वाटेल तो वर माग. ”

वास्तविक पाहतां एका पतिप्राणावांचून सावित्रीला अन्य कशा-चीच जरूर नव्हती. ही गोष्ट यमधर्म जाणत होता, पण तिला कसें तरी चकवावें आणि तिचें कसें तरी समाधान करून आपणास निसटून जातां यावें म्हणूनच त्यानें तिला अशी अट घातली. पण ती चतुर साध्वी अशी कोठली फसावयास? आपला पति परत मिळेपर्यंत धर्माचा पिच्छा सोडावयाचा नाहीं असा तिचा निर्धार होता. त्यानें घातलेली अट चांगली ध्यानांत ठेवून तिनें वरदान मागितलें कीं, “ माझा सासरा अंधळा असल्यामुळें त्याला जे क्लेश होतात ते मला पाहवत नाहींत. तेव्हां आपल्या प्रसादानें त्यांना दृष्टि यावी. ” यावर यमधर्मानें ‘ तथास्तु ’ असें ह्मणून त्यानें तिला परत जाण्याचा आग्रह केला. तेव्हां ती साध्वी यमाला ह्मणाली, “ मी आपली कन्या आहें. तुमच्यासारख्या पित्याला सोडून मी कोणीकडे बरें जावें. आपण मला आपल्याबरोबरच माहेरीं न्यावें. माझें मन जर पतिचरणीं गुंतून राहिलें असेल, मीं जर शुद्धभाव धरून संत-साधूंना वदंन केलें असेल तर आपण मजवर पूर्ण दया कराल यांत संशयच नाहीं. ”

तिनें परत जावें या हेतूनें यमानें तिला दुसरा वर मागण्यास सांगितलें. या खेपेस तिनें आपल्या सासऱ्याचें राज्य मागून घेतलें. दुसरा वर पूर्ण करून तो प्रेतनाथ यम तिला परत जाण्याचा आग्रह करूं लागला. तेव्हां पुन्हां ती ह्मणाली, “ हे दयाळू धर्मराजा; मीं परत जाऊं तरी कोणीकडे? तूं मला माझ्या पतीबरोबर घेऊन जा. तूं आह्मां चक्रवाकांच्या वियोगास कारण होणें बरोबर नाहीं. मीं जर व्रत, तप, दान केलें असेन, माझ्या हातून जर सासुसासऱ्याची

सेवा घडली असेल, अनाथ प्रेताचें दहन व दरिद्र्याचें लग्न करण्याची पुण्याई जर मीं जोडली असेन, मी जर भावार्थ धरून सच्छास्त्र व सत्समागमाबद्दल प्रेम राखलें असेन, परमेश्वरस्वरूप अशा सद्गुरूला जर मी शरण गेलें असेन तर तुझें मन मजबद्दलच्या दयेनें व्यापून गेलेंच पाहिजे." सावित्रीची पुण्याई जाणून यमधर्मानें तिला तिसरा वर मागण्यास सांगितलें. यावेळीं तिनें आपल्या बापाला शंभर पुत्र होण्याविषयीं वरदान मागून घेतलें. यमानें तिची इच्छा पूर्ण करून व तिला परत जाण्याचा विशेष आग्रह करून तो पुढें चालूं लागला. तरीही ती त्याच्याच मागें जाऊं लागली. यमधर्माकडून तीन वर प्राप्त झाले तरी तिचा मुख्य कार्यभाग अद्याप साधला नव्हता. ती अद्याप आपल्यामागें येत आहेसें पाहून यमधर्म तिला ह्मणाला, "हे साध्वी, तूं आतां मात्र खरेंच परत जा. मला तुझी फार भीड पडली ह्मणून मीं तुला तीन वर दिले. आतां तूं खुशाल परत जा, आपल्या पतीच्या शवास अग्नि दे आणि त्याचेंच नामस्मरण करीत रहा."

हें भाषण सावित्रीला कसें गोड वाटणार? यमानें तिला सत्यवानाखेरीज कांहींही दिलें असतें तरी तिचें शांतवन होणें शक्यच नव्हतें. ती महान् पुण्यशील होती. तिनें आपल्या पुण्यप्रभावानें यमधर्माला बांधून टाकलें होतें. तिची समजूत पटून ती परत गेल्यावांचून यमधर्माला भीड तोडून जातां येईना. तिनें परत जाण्याकरितां काय निराळी युक्ति योजावी या विचारांत यमधर्म गुंग झाला आहे तोंच ती साध्वी पुन्हां ह्मणाली, "माझ्या हातून जर दुष्काळांत अन्नदान घडलें असेल, तृषित माणसांना मीं जर पाणी पाजिलें असेल, रोगपीडित माणसांचें मीं जर रक्षण केलें असेल, अनाथ, दुबळ्यांना मी जर साहाय्य केलें असेन; ब्राह्मणांना ईश्वररूप मानून मीं जर त्यांची पूजा केली असेन; हरिहरांत मीं जर कधींही भेद मानला नसेल, पुराण-श्रवण

करून भगवंताचें भजन करण्यांत मीं जर कधींही आळस केला नसेल तर माझा इच्छित वाटा भाग उरकल्याखेरीज तुला येथून जाण्याची बुद्धीच होणार नाहीं."

सावित्रीनें ज्या पुण्यक्रियांचा उच्चार केला त्या सर्वांचें फल तिच्या एका पतिचरणसेवेंतच होतें, ही गोष्ट यमधर्म जाणत होता. आणखी एकवार तिच्यावर प्रसन्न व्हावयाचें असा संकल्प करून तो तिला म्हणाला, "प्रिय कन्ये ! पतिसेवेच्या योगानें तूं जें महत्पुण्य जोडलें आहेस त्यामुळें मी तुला आणखी एक वर देण्यास तयार झालों आहें. यापुढें मी तुला वर देणार नाहीं. सत्यवानाचा प्राण परत मागण्यावांचून तुला पाहिजे तो चौथा वर मागून घे आणि मुकाट्यानें परत जा."

यमाचें हें भाषण ऐकून ती जरा घोटाळ्यांत पडली. तो निर्वाणीचाच प्रसंग होता. तेवढें वरदान देऊन यमधर्म निघून जाणार असें त्यानें तिला निक्षून सांगितलें होतें. या खेपेसही त्यानें तिला पतिप्राण न मागण्याची अट घातलीच होती. मग तिनें काय वर मागावयाचा ?

यमधर्मासारखा उदार व समर्थ महात्मा तिन्हीं जगांचें राज्य देण्यासही तयार असतांना त्या सत्वसंपन्न साध्वीनें त्याची अट ध्यानांत आणून त्याला विनवून सांगितलें, "हे प्रभो; तूं जर खरोखरीच मजवर प्रसन्न झाला असशील तर तुझ्या प्रसादानें मला स्वतःला शंभर पुत्र व्हावेत असें वरदान दे. एवढा वर पूर्ण करून यश संपादन कर."

यमधर्माला तिच्या मागण्यांतील भावार्थ समजला नाहींसें नाहीं. स्वतःला शंभर पुत्र व्हावेंत असा वर मागण्यांत तिनें अप्रत्यक्षरीतीनें सत्यवानाचा प्राणच परत मागितला ही गोष्ट यमधर्माच्या लक्षांत आली. तो तिच्या सात्विक धैर्याला भुलला होता. तिच्या स्तुतीनें

तो वेडा झाला होता. तिच्या पतिसेवेनें त्याचें मन मोह पावलें होतें. तिच्या व्रताचरणामुळें व वर मागण्याच्या चातुर्यामुळें जास्तच प्रेमभरित होऊन तो तिला म्हणाला, " हे पवित्र, गुणसंपन्न कन्ये; तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व गोष्टी घडून येतील. तुझ्या पतीला तुझा स्पर्श होतांच तो सजीव होईल. तो चारशें वर्षे तुजसमवेत राज्य करील. त्याच्यापासून तुला शंभर पुत्र होतील. यावच्चंद्र दिवाकरौ तुझी कीर्ति कायम राहील. सर्व पतिव्रता अक्षय्य तुझा महिमा गातील. रविप्रभा या न्यायानें तूं सदैव आपल्या पतिसन्निधच राहशील. "

इतकें सांगून तो श्राद्धदेव यमधर्म अंतर्धान पावला. त्याच्या बोलण्यावर पूर्ण भरंवसा ठेवून सावित्री तेथून परत गेली. आपल्या पतीचें शिर मांडीवर घेऊन पूर्वीप्रमाणेंच ती त्याचें कपाळ दाबीत बसली. सत्यवानाला तिच्या हस्ताचा स्पर्श होतांच तो चैतन्ययुक्त झाला. त्यानें झोपेंतून जागे झाल्याप्रमाणें आपले डोळे उघडले. आपल्या प्रिय भार्येचें मुखकमल दृष्टीस पडतांच त्याला मोठा आनंद वाटला. आपल्या डोक्यांत वेदना उत्पन्न होऊन आपण आपल्या पत्नीच्या मांडीवर डोकें ठेवून निजलों होतों येवढी मात्र त्याला आठवण होती. मध्यंतरीं काय प्रकार घडला तो त्याला कांहींच ठाऊक नव्हता. आपणास जागे होण्यास फारच उशीर लागला अशा समजुतीनें तो सावित्रीला म्हणाला, " लाडके; मला झोप लागल्यामुळें आपल्याला कितीतरी उशीर झाला; पण झोपेमध्यें असतांना मला कोणीतरी काळपुरुष ओढीत होता असें मला आठवतें. त्याची प्रतिमा डोळ्यापुढें येऊन मला अद्यापही त्याचें भय वाटत आहे. तो काळपुरुष मला काय म्हणून ओढीत होता बरें ? " असें म्हणून तो भ्यालेला राजपुत्र आपल्या आईबापांची आठवण करून रडूं लागला. त्याची ती स्थिति जाणून सावित्रीनें त्याचे नेत्र

पुसले. तो अगदीं गलित झाला असल्यानें सावित्रीनें त्याची कुऱ्हाड, फळांची टोपली आपल्या हातांत घेतली आणि ती त्याला हातीं धरून सासुसासऱ्याच्या दर्शनाकरितां आपल्या आश्रमाकडे निघाली. वास्तविक पाहतां सत्यवान हा पति व सावित्री ही त्याची पत्नी असल्यानें त्यानेंच तिचें संरक्षण करावयास पाहिजे होतें. पति या नात्यानें त्यानेंच तिला धीर देऊन हातीं धरावयास पाहिजे होतें. पण या ठिकाणीं सर्वप्रकार उलटा झाला. एखाद्या नाजुक केळीच्या झाडानें हत्तीला सांवरून धरावें असाच हा प्रकार घडला.

यमानें सावित्रीला वरदान दिल्याप्रमाणें तिकडे आश्रमामध्यें द्युमत्सेनाला दृष्टि प्राप्त झाली. पुत्र व स्नुषा अरण्यांत गेल्याला बराच वेळ झाला यामुळें द्युमत्सेन मोठ्या विवंचनेंत पडला. आपल्या नेत्रांना अकस्मात् दृष्टि प्राप्त झाल्याबद्दल त्याला आनंद वाटून तो आश्चर्यचकित् झाला; पण सत्यवान व सावित्री यांच्यावर कांहीं दुर्धर प्रसंग गुदरला असावा अशी कल्पना करून द्युमत्सेन अतिशय घाबरला. गौतम, धौम्य इत्यादि ऋषि त्याचें सांत्वन करूं लागले. अशा समयास सत्यवान व सावित्री आश्रमांत येऊन पोंचली त्यांना पाहून राजाला मोठा आनंद वाटला. सावित्रीनें अरण्यांतील सर्व वृत्त कथन केलें. तें ऐकतांच द्युमत्सेनानें पुत्र व स्नुषा यांना आपल्या मांडीवर घेतलें. ऋषिवर्यांनीं त्या सर्वांना शुभप्रद आशिर्वाद दिले. सावित्रीच्या पातिव्रत्याचा प्रभाव जाणून सर्वांच्याच हृदयांत प्रेमाचे पाझर फुटले. जो तो सती सावित्रीचें महात्म्य गाऊं लागला.

द्युमत्सेनाचे मंत्रीमंडळ त्याचें राज्य परत मिळविण्याच्या खटपटींत होतें. यमधर्माच्या आशिर्वादानें त्यांची खटपट याच सुमारास यशस्वी झाली. द्युमत्सेनाला पुन्हां राज्याभिषेक झाला. सावित्रीयुक्त-सदन म्हणजे पुण्यप्रद तपोवनच आहे असें समजून द्युमत्सेन धर्म-

नीतीनें राज्य चालवीत राहिला. द्युमत्सेनाच्या पश्चात् सत्यवानानें चारशेंवर्षे यशवंत राज्य केलें. हा सर्व प्रभाव सति सावित्रीच्या पुण्य-व्रताचरणाचाच होय असें जाणून सर्वांच्या अंतःकरणांत तिच्याबद्दल आदर उत्पन्न झाला. सर्व लोक तिला देवता समजून तिची पूजा करूं लागले. अशाप्रकारची ती उभयकुलोद्धारिणी मंगलकारक माहे-श्वरीच होय यांत काय शंका आहे ? जी शुभलक्षण व उच्च सद्गुणांनीं संपन्न होती, जी आपल्या पतीला ईश्वर समजून त्याच्या चरणभक्तीं-तच आपल्या जन्माचें सार्थक मानीत होती; जिचें सदाचरण पाहून प्रत्यक्ष कल्याणदेवता जिची दासी बनली होती तिचें यश वर्णन करण्यास कोण समर्थ असणार ? तिची पतिनिष्ठा पाहून आचारसंपन्न ऋषिपत्न्या तिची सारखी वाखाणणी करीत. तिचें साध्वीव्रत ध्यानांत आणून कल्पलतांनींही माना खालीं घातल्या. जिनें आपल्या पाति-व्रत्याच्या सामर्थ्यानें प्रत्यक्ष यमधर्माला आपल्यापुढें प्रगट व्हाव-यास लाविलें, आपल्या शुद्ध व पवित्र आचाराच्या बलानें जिनें यमधर्माला वश करून घेतलें; आपल्या पतिभक्तीमुळें जिनें यमधर्माचा प्रसाद करून घेऊन आपला पिता, सासरा यांना ऐश्वर्यसंपन्न करून आपल्या पतीला यमाच्या पाशांतून सोडवून आणलें. तिच्या पाति-व्रत्याचें समग्र वर्णन करण्यास विद्यादाता गणपतीही समर्थ नाहीं ! अशा त्या साध्वी सावित्रीचें नाम उच्चारिलें व निष्ठा धरून तिचें महात्म्य गात राहिलें तर सकलसौभाग्याची प्राप्ति होईल यांत काय आश्चर्य आहे !

---

# ३ महानंदा.



काश्मीर देशांत नंदिग्राम या गांवाचें एक पट्टण होतें त्या ठिकाणीं महानंदा नांवाची एक श्रीमंत स्त्री वास्तव्य करीत असे. ती जातीनें वारांगना होती. आईबापांच्या संस्कारांमुळें ती वेश्याजातींत मोडत होती, त्यास तिचा इलाज नव्हता. तिच्या स्वतःच्या गुणांचा विचार केला असतां ती फार श्रेष्ठ होती. स्वतःच्या अंगांत उत्तम प्रकारचे गुण वसत नसतील तर श्रेष्ठपणा प्राप्त होण्याच्या कामीं वंश, कुल किंवा वाडवडील यांचा लौकिक कांहींएक उपयोगी पडत नाहीं, हा जसा सिद्धांत आहे त्याचप्रमाणें ज्याच्या स्वतःच्या अंगांत सद्गुणांचें वास्तव्य आहे तो हीन कुळांतील असला, त्याला मातापित्याचा अशुद्ध संस्कार जडला असला तरी त्याला थोरपणा प्राप्त होण्यास नीचकुलोत्पत्ति किंवा अनुवंशिक पेशा हीं प्रतिबंधक होत नाहींत, हा देखील एक सिद्धांतच होय. गारेच्या पोटांतून रत्न निर्माण होतें. कावळ्याच्या विष्ठेंतूनच पवित्र पिंपळाचा वृक्ष जन्म पावतो. देवदैत्यांनीं समुद्रमंथन केलें त्यावेळीं चंद्र व उच्चैश्रवा या नांवाचा अश्व हे दोघेही एकाच स्थानापासून निर्माण झाले, पण त्या दोघांची वाट कशी निरनिराळ्या प्रकारानें लागली पहा! उच्चैश्रवा हा इंद्राचें भारवाहक वाहन झाला. भगवान् चंद्रमा हा श्रीशंकरा-च्या शिरावर जाऊन बसला. हा सर्व प्रभाव ज्याच्या त्याच्या अंगांतील सद्गुणांचाच होय. सज्जन कसाई हा मांसाचा धंदा करणा-राच्या पोटीं आल्यानें त्याची जात हीन होती व त्याला अनुवंशिक संस्कारांमुळें धंदाही नीचपणाचाच करावा लागला. पण त्यानें आपल्या

अंगच्या सद्गुणानें श्रीकृष्णपरमात्म्याला मांस विकण्यास बसविलें. प्रत्यक्ष परब्रह्म विठोबा त्याची सेवा करूं लागला. यापेक्षां जास्त काय पाहिजे ? तात्पर्य काय कीं, सद्गुण, सदाचार, हरिभक्ति यांच्याशीं उच्चनीच जातीचा किंवा पोट भरण्याकरितां राजरोसपणें स्वीकारलेल्या निरुपद्रवी नीच धंद्याचा कांहीं एक संबंध नाहीं. ज्यांनीं ईश्वरावर निष्ठा ठेविली व आपल्या विहित धर्माची बरोबर सेवा केली त्यांच्या उच्चनीच जातीचा प्रश्न बाजूस राहून त्यांच्यावर परमात्म्याची कृपा हीं व्हावयाचीच. रोहिदास चांभार, सेना न्हावी, चोख्या महार इत्यादि भाग्यवान् महात्मे उद्धरून गेले पण आपल्या उच्च वर्णाचा अभिमान धरून जे त्या नीच जातीय भक्तजनांची निंदा करण्यांतच मोठेपणा मानून राहिले त्यांना मात्र प्रपंचकाबाडांतच रडत बसावें लागलें.

महानंदा ही अशाच योग्यतेची भगवद्भक्त होती. त्या नंदिग्रामाची ती मालकीणच होती. ती सौंदर्यसंपन्न असून तिच्या तेजानें दशदिशा उजळ झालेल्या दिसत. तिचे हावभाव पाहून मदनही नाचावयास लागे. ती छत्रचामराची अधिकारीण असून तिच्या संग्रहांत अनेक प्रकारचीं रत्नखचित वाहनें होतीं. तिच्या पादुका देखील रत्नखचित असत. ती नेहमीं दिव्य अलंकारांनीं मंडित असे. हत्ती, घोडे, गाई, म्हशी, दास, दासी यांचीं तिच्या गृहीं कांहींच कमतरता नसे. ती सर्व भाग्यानें संपन्न होती. तिचें हें सर्व भाग्य पाहण्यास तिची आई हयात होती.

तिचा कंठ मधुर होता. तिचे सुस्वर आलाप ऐकून कोकिळाही मौन धरीत. तिच्या नाचण्याची कुशलता पाहून मोठमोठे राजे लोक तटस्थ होत. ती वेश्या असून बहुगुणसंपन्न होती. ती धर्मशील व उदार असल्यानें तिनें अक्षय्य अन्नसत्र चालू ठेविलें होतें. महानंदेचें

दर्शन घडलें असतां आपणास विमुख होऊन परत जावें लागणार नाहीं अशी अतीत अभ्यागतांची बालंबाल खात्री असे. ती जातीची वेश्याधर्मातील स्त्री असून तिनें आपल्या औदार्यानें यज्ञकंकण बांधून दीक्षित होऊं पाहणाऱ्या जनांना लाजविलें होतें. ती सोमवार, प्रदोष वगैरे व्रतें करी. शिवरात्र करण्याचा तिचा नित्यक्रमच असे. आपण स्वतः वेश्या आहों हें जाणून ती सत्पात्र ब्राह्मणांकडून शंकराला नेहमीं अभिषेक करवी. याचकांच्या सर्व इच्छा तृप्त करून ती नेहमीं ईश्वराचें नामस्मरण करी. ती श्रीशंकराला आपलें दैवत मानी. आपलें दैवत संतुष्ट व्हावें या हेतूनें ती श्रावण महिन्यांत ब्राह्मणांकडून कोटिलिंगार्चन करवीत असे.

एकेसमयीं महानंदेचा भक्तिनिर्धार व सत्वपरीक्षा पाहण्याकरितां शंकरांनीं कांहीं लाघव केलें. परमेश्वरानें वैश्याचा वेष धारण केला आणि तो वैश्य आपल्याबरोबर जवाहीर घेऊन ते विकण्याकरितां महानंदेकडे गेला. त्या वैश्याचें स्वरूप पाहून महानंदा मोह पावली. तिनें त्याचा सत्कार करून त्याला आपल्या घरीं राहून घेतलें. यावेळीं त्या वैश्यानें आपल्या हातांत एक रत्नजडित कंकण घातलें होतें. तें महानंदा विकत मागूं लागली. महानंदा ही स्वरूपानें लावण्यसंपन्न होती. तिच्या सौंदर्यावर आपणही भाळलों आहों असें त्या वैश्यानेंही महानंदेला जाणविलें. तिचें मन त्याच्याजवळच्या कंकणानें वेधलें होतें. तें जाणून त्यानें तें पृथ्वीच्या मोलाचें कंकण तिला भाल केलें. त्याचें औदार्य पाहून महानंदेला त्याच्याशीं लग्न करावें अशी इच्छा उत्पन्न झाली. तिनें जास्तच नादीं लागावें या हेतूनें त्या वैश्यानें आपल्या गळ्यांतील दिव्य शिवलिंग तिला दाखविलें. तें अस्सल हिऱ्याचें लिंग स्वयंप्रकाश होतें. सूर्याच्या तेजाहूनही तें लिंग जास्त लखलखीत होतें. त्या शंकराच्या लिंगास भावनेनें नमस्कार करून महानंदा

आपला स्वीकार करण्याविषयीं मोठ्या भावनेनें त्या वैश्याची प्रार्थना करूं लागली. ती हीन जातींतील असल्यामुळें वैश्यानें प्रथमतः तिचा अव्हेर केला. आपणास तीन दिवसापेक्षां जास्त दिवस येथें राहण्यास सवड नाहीं व आपणास त्यापेक्षां अधिक काळ पत्नीसह रहावयाचें नाहीं असा त्यानें आपला निश्चय सांगितला. महानंदेनें त्याच्या सर्व अटी पतकरल्या. आपण जातीनें नीच वेश्या आहों तरी आपण तीन दिवस त्याची विवाहित व पातिव्रत्यसंपन्न पत्नी होऊन राहण्यास कबूल आहों असें तिनें प्रतिज्ञापूर्वक सांगितलें. तिची निष्ठा पाहून वैश्यानेंही तिची विनंति मान्य केली. श्रीशंकराला साक्ष ठेवून वैश्यानें महानंदेचा हस्त स्वीकारिला. तीही त्याची धर्मांगना झाली. तो वैश्य आपला पति झाल्या कारणानें ती त्यालाच ईश्वर मानूं लागली. त्या वैश्यानें तें शंकराचें लिंग तिच्या स्वाधीन करून तिला सांगितलें, "हें शिवलिंग ह्मणजे माझा प्राण आहे. हें नीट जपून ठेव. या लिंगाचा कोणत्याही कारणानें नाश झाला तर मी आपला प्राण ठेवणार नाहीं."

त्याची प्रतिज्ञा ऐकून महानंदेनें तें शिवलिंग घेतलें आणि आपल्या नृत्यागारांत नेऊन विशेष जपून ठेविलें. त्या ठिकाणीं दोघांचा एक दिवस सुखानें गेला. दुसऱ्या दिवशीं शयन मंदिरांत ते दोघेजण गप्पा मारीत बसले होते. प्रेमाच्या गोष्टी बोलतां बोलतां दोघांनाही झोंप आली. दोघेही निद्रानंदांत गढून गेले. अशा समयास एकाएकीं महानंदेच्या नृत्यशाळेस आग लागली. त्याच सुमारास भयंकर वारा सुटून अग्नि जास्तच प्रज्वलित झाला. सेवकमंडळी जागी होऊन आरोळ्या मारूं लागली. त्यामुळें तो वैश्य व महानंदा हे दोघेजण खडबडून जागे झाले. गांवांतील लोकांच्याही झुंडीच्या झुंडी नृत्यशाळेकडे धावूं लागल्या. सर्व लोकांनीं आग विझवि-

त्यांची पराकाष्ठा केली; पण अग्निनारायण शांत न होतां अधिकच चौताळला. त्यानें प्रलयकालचें रूप धारण करून ती नृत्यशाळा भस्म करून टाकली आणि नंतर तो शांत झाला.

आगीमुळें महानंदेचें मोठें नुकसान झालें; पण ती त्याकरितां तळमळणारी नव्हती. भाग्याभाग्य किंवा लाभहानी यांचा काळ स्वभावेंकरून येत असतो ही गोष्ट तिला समजली होती. पण त्या सौदागाराची वृत्ति मात्र बावरली. महानंदेनें आपलें दिव्य शिवलिंग नृत्यशाळेंतच ठेविलें होतें याची त्याला आठवण झाली. तो धावरून जाऊन महानंदेला शिवलिंगाची हवाला विचारूं लागला. त्याचें बोलणें ऐकतांच महानंदाही मनामध्यें दचकली. नृत्यशाळेच्या नाशाबरोबर शिवलिंगाचाही नाश झाला असें जाणून महानंदा डोकें आपटावयास लागली. तिनें त्याबद्दल अतिशय शोक आरंभला. गांवांतील भले लोक तिचें सांत्वन करूं लागले. तिच्या मनाचें कांहिसें समाधान होऊन तिचा विलाप कमी झाला. इतक्यांत तो सौदागार त्या शिवलिंगाबद्दल अतिशयच तळमळ करूं लागला. लोकांनीं त्याचें हरप्रकारें शांतवन केलें पण तो मुळींच ऐकेना. आपलें प्राणलिंग अग्नीमध्यें जळून गेलें त्या अर्थी आपणास आतां प्राण ठेवणें नाहीं असें त्यानें सर्व लोकांसमक्ष निक्षून सांगितलें. त्यानें प्राणघात करण्याचा निश्चय केला. त्यानें एक मोठें अग्निकुंड तयार केलें. आपल्या हातांनींच त्यानें कुंडामध्यें अग्नि पेटविला. आकाशांत अग्निज्वाळा भडकूं लागल्या. तो अग्नीसमोर हात जोडून उभा राहिला. कांहीं वेळ ईश्वराचें मनोमय ध्यान करून त्यानें श्रीशंकराच्या नांवाचा जयजयकार केला आणि निःशंकपणें त्या अग्निकुंडांत उडी टाकली.

सौदागारानें आपल्याला अग्नीमध्यें जाळून घेतलें तो काळ ह्मणजे त्या दोघांमधील नियमाचा दुसरा दिवस होता. आपण त्या सौदागाराची

विहित पत्नी आहों ही गोष्ट महानंदा जाणत होती. सौदागारास आत-लाथी समजून लोक त्याला दूषणें देत होते. कोणी कोणी त्याच्या नियम-निश्चयाची वाहवा करीत होते. कसेंही असलें तरी एक वैश्यजातीचा मनुष्य अग्निप्रवेश करून मेला या पलीकडे लोकांच्या मनांत दुसरा कांहीं विशेष विचार येण्याचें कारण नव्हतें. पण महानंदेच्या अंतःकरणाची स्थिति कांहीं चमत्कारिक झाली. तिनें त्याला पति ह्मणून वरलें होतें. तीन दिवसपर्यंत आपण त्याची पातिव्रत्यसंपन्न धर्मभार्या आहों ही गोष्ट तिच्या मनांत दृढ झालेली होती. ती जातीची वेश्या खरी; पण सांप्रत आपण कोण आहों हें ती जाणून होती. पतिव्रता स्त्रीचें सर्व धर्म तिला ज्ञात होते. त्या वैश्यपतीच्या मरणाबद्दल ती साध्वीव्रतपर स्त्रीप्रमाणें विव्हळ झाली. पतिव्रतेचा सर्व आचार तिच्या डोळ्यापुढें मूर्तिमंत दिसूं लागला. वैधव्यदशेच्या डोंगरानें तिचें हृदय दडपून गेलें. ती मोठमोठ्यानें विलाप करूं लागली. लोकांना तिच्या कृतीचें आश्चर्य वाटूं लागलें. नानाप्रकारांनीं लोक तिची समजूत घालूं लागले. ती जातीची वारांगना असल्याबद्दल लोक तिला आठवण देऊं लागले. पण अशानें तिची कशी समजूत होणार? लोकांना ती नीच वेश्या वाटत होती; पण त्या वेश्येचें शील काय होतें याची त्यांना कल्पना नव्हती. आपण नीच कुलांत उत्पन्न झालों असलों तरी सांप्रत आपण त्या वैश्याची धर्मांगना आहों अशी तिची ठाम समजूत असल्यानें तिला लोकांचें ह्मणणें कसें रुचणार? आपला पतीच मृत झाला आहे अशी तिची भावना होती. आपल्या नियमानुसार आपण पातिव्रत्यसंपन्न आहों असा तिला अभिमान होता. पतीच्या पश्चात् आपण काय केलें पाहिजे हें तिला ज्ञात होतें. ती भाग्यवान महानंदा साध्वीच्या कर्तव्यास उद्युक्त झाली. पतीच्या पश्चात् देह ठेवावयाचा नाहीं असा तिनें मनाचा निर्धार केला. तिनें गांवांतील ब्राह्मणांना बोलावून आणिलें व त्यांच्या-

करून आपली सर्व संपत्ति लुटविली. तिनें आपली सर्व चीजवस्त याचकांना दान करून टाकली. तिनें स्नान करून आपल्या अंगाला भस्म लाविलें. सर्वांगावर रुद्राक्ष धारण केले. मनामध्यें पतीचें ध्यान करीत करीत ती त्या अग्निकुंडासमोर येऊन उभी राहिली. आपल्या शिवस्वरूप पतीची मूर्ति हृदयांत स्थापून तिनें 'हरहर' शब्दाचा उच्चार केला; आणि निशंक मन करून कुंडामध्यें उडी टाकली.

महानंदेसारख्या स्त्रीनें पातिव्रत्यधर्मास अनुसरून अग्नीमध्यें आपला देह पतिचरणीं म्हणून अर्पण करतांच त्या अग्निकुंडांतून श्रीशंकराची मूर्ति अकस्मात् प्रगट झाली. ज्याला पांच मुखें आहेत, ज्यानें आपल्या मस्तकावर चंद्र धारण केला आहे, ज्याच्या माथ्यावर जटांचा भार असून भागीरथी वास्तव्य करीत आहे, ज्याचा कंठ निळा असून ज्यानें व्याघ्रचर्म परिधान केलें आहे, गळयामध्यें मनुष्यांच्या मुंडांचा हार घातला आहे, सर्व अंगावर नागांचीं भूषणें धारण केलीं आहेत अशा प्रकारचें रूप धारण केलेल्या परमात्म्यानें आपल्या दहा हातांनीं महानंदेला चेंडूप्रमाणें वरच्यावर झेलून धरिलें. शंकराच्या कृपेनें तिला दिव्यरूप प्राप्त झालें. तिचें सत्व, शुद्ध भाव, हरिभक्ति व पतिनिष्ठा पाहून शंकरांना प्रेमाचें भरतें आलें. तिची इच्छा जाणून शंकरांनीं तिला शिवलोक प्राप्त करून दिला.

महानंदेसारखी वेश्याकुळांतील स्त्रीदेखील परमेश्वरभक्ति आणि एकपतिनिष्ठा यांच्या योगानें सज्जनांना वंद्य होऊन अक्षय्य अशा शिवपदास जाऊन पोंचते तर उच्च जातींतील व उच्च कुलांतील धर्मांगना आपल्या विहिताचारास स्मरून पतिभक्ति करतील तर त्यांची एकनिष्ठा पाहून परमात्मा त्यांचा दास होऊन राहील यांत नवल नाहीं. उच्च कुलांतील कुलांगार, धर्मभ्रष्ट, भक्तिविहीन मनुष्यापेक्षां नीच कुलांतील भक्तिसंपन्न, धर्मशील असा मनुष्य लाखपटीनें श्रेष्ठ होय.

# ४ द्रौपदी.



अहिक्षेत्रामध्यें द्रुपद या नांवाचा राजा राज्य करीत होता. द्रुपदाच्या बापाचें नांव पृषद असें होतें. पृषदाच्या कारकीर्दींत त्याचा पुत्र द्रुपद हा अग्निवेश नांवाच्या गुरूजवळ विद्या शिकण्यास राहिला होता. त्याच अग्निवेशाजवळ भारद्वाजाचा मुलगा द्रोण हाही त्याचवेळीं विद्या पढत होता. द्रुपद व द्रोण हे अग्निवेशाचे शिष्य असल्यामुळें त्या दोघांत गुरुबंधूचें नातें होतें. दोघांची विद्या पूर्ण होऊन दोघेही आपापल्या गृहीं निघून गेले.

कालेंकरून पृषदाच्या मागून त्याचा पुत्र द्रुपद हा अहिक्षेत्राचा राज्याधिकारी झाला. द्रोण हा स्थितीनें अगदींच गरीब होता. त्याला अश्वत्थामा या नांवाचा पुत्र झाला. अश्वत्थामा लहान असतांना तो दूध प्यावयास मागे. द्रोणाची स्थिति गरिबीची असल्यामुळें त्याची बायको कृपी हीं पाण्यामध्यें पीठ कालवून तें अश्वत्थाम्याला दूध ह्मणून प्यावयास देई. या दरिद्राबद्दल द्रोणाला अतिशय खेद झाला. आपला गुरुबंधु द्रुपद हा हल्लीं राजा झाला आहे हें जाणून द्रोण त्याच्याकडे गेला. द्रुपदराजाशीं गुरुबंधुत्वाचें नातें लावून तो त्याच्याजवळ मुलाला दूध पाजण्याकरितां एका गाईची याचना करूं लागला. द्रुपदानें द्रोणाला ओळखलें; पण तो संपत्तीमदानें बेफाम झाला असल्यानें त्यानें आपल्या गुरुबंधूस गाय तर दिली नाहींच; पण त्याच्याशीं आपलें असलेलें नातें नाकबूल करून त्यानें द्रोणाचा धिःकार केला. त्यानें उलट त्याची निंदा करून त्याला त्याच्या दरिद्रावस्थेबद्दल हीन समजून हाकून दिलें.

अग्निवेश गुरूजवळून विद्या प्राप्त करून घेतल्यानंतर द्रोणानें भार्गवरामाजवळून संपूर्ण अस्त्रविद्या प्राप्त करून घेतली होती. त्याच्या अंगांतील शौर्य, तप, तेज, विद्या इत्यादि गुणांच्या मानानें द्रुपद ह्मणजे केवळ मुंगुरटें होता. द्रुपदासारख्या मशकानें आपला अपमान केला हें न साहून द्रोणाचार्यानें कौरववंशांतील राजपुत्रांना विद्यादान केलें आणि त्यांच्या हस्तें द्रुपदावर स्वारी केली. द्रुपदानें त्यावेळीं पुष्कळ पराक्रम केला; पण अखेर तो हतवीर्य झाला. द्रोणाचार्यांच्या शिष्यांनीं त्याला बांधून आपल्या गुरुजीपुढें नेऊन उभें केलें. द्रोणाचार्यांनीं त्याला मागील सर्व गोष्टीची ओळख देऊन लाजविलें. त्याच्याप्रमाणें आपण नीच नाहीं असें दाखविण्याकरितां द्रोणाचार्यांनीं त्याचें सर्व राज्य हरण केलें नाहीं. त्यांनीं त्याला त्याचें अर्धें राज्य परत दिलें; पण तेवढ्यानें तो शांत झाला नाहीं. त्याच्या मनांत पराभवाचें शल्य बोचत राहिलें. तो द्रोणाचार्यांचा पक्का वैरी बनून राहिला. द्रोणाचार्यांनीं अगाध सामर्थ्य मिळविलें आहे असें जाणून तो मोठ्या विचारांत पडला. त्याचें चित्त अस्वस्थ होऊन तो वनामध्यें हिंडूं लागला. कांहीं काळानें तो गंगातीरावर येऊन पोंचला. त्या ठिकाणीं अनेक ऋषि तप करीत होते. त्या तपोधनांमध्यें याज व उपयाज असे दोघे बंधु अगाध तपस्तेजानें संपन्न होते. त्यांना शरण जाऊन पदानें एक वर्षभर त्या बंधूंची सेवा केली. ते ऋषिवर्य प्रसन्न होतांच त्यांनीं द्रुपदाला त्याची इच्छा विचारिली. त्यावेळीं द्रुपदानें त्यांना सांगितलें, " द्रोणाचार्यानें माझा बहुत छळ केला आहे. त्यानें माझी अर्धू घेतली आहे. तरी त्याला ठार मारील अशा तऱ्हेचा मला एक पुत्र प्राप्त करून द्यावा. त्याचप्रमाणें माझ्या मनांत अर्जुनाला जावई करावें

अशी जबरदस्त भावना झाली आहे, याकरितां लक्ष्मी किंवा पार्वती यांच्याहूनही श्रेष्ठ अशी एक कन्या मला आपण प्राप्त करून द्या."

द्रुपदाची इच्छा पुरविण्याकरितां याज व उपयाज या दोघांनीं सर्व सामग्री जमवून हवनकर्म आरंभिलें. पूर्णाहुती होतांच अग्नीमधून धृष्टद्युम्न या नांवाचा एक पुत्र उत्पन्न झाला. तो किरीटकुंडलांनीं भूषित झालेला असून रथासह अग्नींतून बाहेर आला. त्याचसमयीं वेदीमधून एक कन्या प्रगट झाली. नीलकमलाप्रमाणें त्या कन्येची कांति होती. इंद्रनीलमणी गाळूनच तिची मूर्ति ओतली असावेसें वाटत होतें.

दिव्य प्रभेनें युक्त अशी ती कन्या प्रगट होतांच त्या ठिकाणीं अशी आकाशवाणी झाली कीं, " ही कन्या सर्व स्त्रियांची स्वामिनी आहे. भवानी आणि शची यांनींच आपापल्या अंशानें या कन्येचा अवतार धारण केला आहे. श्रीकृष्णपरमात्मा हिला आपली भगिनी मानील. ही महान् पातिव्रत्यसंपन्न होऊन मोठी भगवद्भक्त होईल. या भाग्यवान कन्येमुळेंच शेंकडो दुष्टांचा नाश होऊन पृथ्वीचा पापभार हरण होईल."

अशा प्रकारची आकाशवाणी ऐकून द्रुपदराजाला हर्षातिरेक झाला. त्यानें याज व उपयाज या ऋषींचा बहुत गौरव केला. त्यानें त्यांना अपरिमित दक्षणा देऊन संतुष्ट केलें. त्यांच्या प्रसादानें प्राप्त झालेली कन्या व पुत्र घेऊन द्रुपदराजा आपल्या राजधानीस गेला. अशाप्रकारें द्रोणाचार्यांचा वध इच्छून त्यानें जो मुलगा प्राप्त करून घेतला तोच धृष्टद्युम्न होय; व त्याचसमयीं अग्नीमधून जी कन्या उत्पन्न झाली तीच द्रुपदसुता द्रौपदी होय.

द्रौपदी हलके हलके मोठी होऊन उपवर झाली. तिचें अप्रतिम सौंदर्य पाहून शेंकडो राजपुत्रांनीं तिला मागणी घातली. द्रुपदाच्या

मनांत आपली कन्या अर्जुनास द्यावयाची होती. त्यानें पांडवांचा शोध चालविला. त्यावेळीं कौरवांनीं द्रोहबुद्धि धारण करून पांडवांना लाक्षागृहांत जाळून टाकल्याचा बोभाटा पसरला होता. पांडव लाक्षागृहांत जळून मेले नसून कोठेंतरी गुप्तवेषानें हिंडत आहेत अशीही जनवार्ता होती. तात्पर्य, पांडवांबद्दल निश्चयात्मक अशी कांहींच वार्ता समजत नव्हती. त्यांची स्थिति कशीही असली तरी त्यांचा पत्ता नव्हता एवढी गोष्ट मात्र निश्चित् होती. या कारणानें द्रुपदराजा मोठ्या विवंचनेंत पडला. द्रौपदीचा स्वयंवर असल्याबद्दल चोहोंकडे पुकारा केला असतां पांडव जिवंत असतील तर प्रगट होऊन स्वयंवराकरितां धावून येतील अशी कल्पना करून द्रुपदानें सर्व पृथ्वीभर स्वयंवराची द्वाही फिरविली. त्यानें आपलें पांचालनगर सुशोभित केलें. स्वयंवराची बातमी लागून हजारो राजे धावून येऊं लागले. असंख्य ऋषीश्वर स्वयंवर साजरा करण्याकरितां अहिक्षेत्रांत जमले. दुर्योधनप्रभृति कौरव व अंगराजा कर्ण हेही द्रौपदीच्या इच्छेनें तेथें आले. छप्पन्न कोटि यादवांसहित श्रीकृष्ण व बलराम हेही तेथें प्राप्त झाले. द्रुपदानें ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें सर्वांचें आदरातिथ्य केलें.

फाल्गुन शुद्ध सप्तमी हा स्वयंवराचा दिवस निश्चित् झाला होता. द्रुपदराजानें त्यावेळीं एक नलिकायंत्र उभारिलें होतें. वरच्या अंगास एक मत्स्य टांगला होता. खालीं पाहून चक्ररंध्रांतून बाण सोडून जो त्या मत्स्याचा डोळा उडवील त्यालाच द्रौपदी माळ घालील असा द्रुपदानें पण लावला होता. अर्जुनावांचून आपला पण कोणासच जिंकता येऊं नये म्हणूनच इतका अवघड पण करण्याची त्यानें योजना केली होती. अनेक भूपति, असंख्य ऋषि, अपरिमित याचक यांच्या योगानें गजबजलेली ती सभा अवलोकन करून द्रुपदराजा पांडवांचा शोध करूं लागला. स्वयंवराकरितां गोळा





झालेल्या मंडळींत पांडव नाहींत असें जाणून तो कष्टी झाला; पण आतां इलाज काय ? प्रसिद्ध केल्याप्रमाणें स्वयंवराचा समारंभ करणें भागच होतें. आपल्या मनाचें कसेंतरी समाधान करून घेऊन त्यानें द्रौपदीला सभेमध्यें आणण्याविषयीं धृष्टद्युम्नास सूचना दिली. बापाची इच्छा जाणून धृष्टद्युम्नानें त्या लावण्यखनी द्रौपदीस हत्तिणीवर बसवून सभास्थानीं आणिलें. द्रौपदीनें सर्व सभा अवलोकन केली धृष्टद्युम्नानें स्वयंवरास आलेल्या राजपुत्राचें सामर्थ्य वर्णन करून स्वयंवरासंबंधानें केलेल्या पणाची हकीगत सांगितली. पण ऐकतांच बहुतेक राजे द्रौपदीच्या प्राप्तीविषयीं निराश झाले. पण जिंकण्याकरितां एकटा कर्णमात्र सरसावला. त्यानें शिवकोदंडासारख्या चापास हात घातला; पण तें त्याला मुळींच हालेना. तेव्हां त्यानें आपलें सर्व बळ खर्च करून कसें तरी तें धनुष्य उचललें; पण त्याच्या भारानें तो कासावीस झाला. त्यानें मत्स्यभेद करण्याच्या हेतूनें चापास बाण लाविला न लाविला तोंच तो एखाद्या वृक्षाप्रमाणें भूमीवर पडला. त्याची ती अवस्था पाहून सर्व कौरव दुःख करूं लागले. इतर राजेही भयानें व्याप्त झाले. धनुष्य उचलण्यास कोणीच धजत नाहीं असें पाहून द्रुपदराजा ओरडून म्हणाला, " या ठिकाणीं जमलेल्या राजपुत्रांतून माझा पण जिंकून द्रौपदी प्राप्त करून घेण्यास कोणीही समर्थ नाहीं त्या अर्थीं सर्व पृथ्वी निःक्षत्रीय झाली आहे असेंच मी समजतों."

द्रुपदानें इतके शब्द उच्चारले तोंच त्या ठिकाणीं जमलेल्या विप्रमंडळींतून दोन विप्र सरसावून उठले, आणि पण जिंकण्याकरितां धनुष्याकडे गेले. त्या दोघांतून जो लहान होता त्यानें एकदम तें अवजड चाप उचललें आणि पहिल्याच बाणानें मत्स्यनयन उडाविला. तें पाहतांच सर्वत्र जयजयकार झाला. वाद्यांचा कडकडाट सुरूं झाला, सर्व सभा चकित् झाली. दुर्योधन, कर्ण इत्यादि कौरव

क्रोधयुक्त झाले. द्रौपदीनें पण जिंकणाऱ्या ब्राह्मणास माळ घातली. द्रौपदीनें आपणांतून कोणास तरी वरावें अशी इच्छा धारण करणारे सर्व राजे एकवटले. ते सर्वजण द्रौपदीस जिंकलेल्या ब्राम्हणावर बाण टाकून द्रौपदीला पळवून नेण्याच्या प्रयत्नास लागले. मत्स्यभेद करणारे ब्राह्मण क्षत्रियकन्या जिंकून नेत आहेत हें पाहून सर्व नृप लज्जायमान झाले. त्यांना पराकाष्ठेची ईर्षा चढली. ते सर्वजण कोपाविष्ट होऊन त्यांनीं द्रौपदी व ते दोन्ही विप्र यांना बाणांनीं आच्छादून टाकिलें. बाकीचे सर्व ब्राम्हण, द्रुपदराजा वगैरे मंडळी गांगरून गेली. इतक्यांत त्या विप्रांनीं आपला पराक्रम दाखवून सर्व राजांचे चाप आणि शर तोडून टाकिले. त्या दोघांचा अद्भुत पराक्रम पाहून द्रुपदाला ते भीमार्जुनच असावेत असें वाटूं लागले. पण जिंकणाऱ्या वीराचें शर-संधान पाहून श्रीकृष्णानें त्याला ओळखलें. त्यानें बलरामास सांगितलें, " लाक्षागृहामधून पांडव वाचले ही गोष्ट सत्यच दिसते. कारण सर्व नृपतींना पळवून लावणारा हा विप्र अर्जुनच आहे हें खास. "

श्रीकृष्णाचें भाषण बलरामासही पटलें. त्यानें त्या विप्रांचा शोध केला आणि ते पांडव आहेत अशी पूर्ण खात्री करून घेतली. दुर्यो-धनादि सर्वत्रांचा पराभव करून ते विप्ररूपी भीमार्जुन द्रौपदीसहव र्तमान आपल्या मातेकडे निघून गेले.

ज्या वीरांनीं द्रौपदी जिंकली ते भीमार्जुनच होते. त्यावेळीं नकुल, सहदेव हे देखील त्यांच्याबरोबर होते. त्या सर्वांनींच ब्राह्मणवेष धारण केला होता. लाक्षागृह दग्ध झालें त्यासमयीं गुप्त विवराच्या मार्गानें सुरक्षित बाहेर पडल्यानंतर कांहीं काळ ते सर्वजण या गुप्त-वेषानें हिंडत होते. यावेळीं त्यांचा मुक्काम एका कुंभाराच्या घरीं पडला होता. तेथें त्यांची माता कुंती होती. ते पांचीजण द्रौपदीला घेऊन आपल्या मुक्कामीं आले त्यावेळीं त्यांची आई घरामध्यें कांहीं

काम करीत होती. त्यांनीं बाहेरील अंगास बसून आईला सांगितलें, " आह्मीं आज अपूर्व भिक्षा मिळवून आणली आहे. " भिक्षेचें धन काय आहे तें न पाहतां कुंतीनें आंतूनच उत्तर केलें, " तुह्मीं आणलेली अपूर्व भिक्षा पांचामध्यें वाटून घ्या. " त्यांनीं आईची आज्ञा प्रमाण मानली. पुत्रांची भिक्षा पाहण्याकरितां कुंती घरांतून बाहेर आली तों ती द्रौपदीस पाहून आश्चर्यचकित् झाली. द्रौपदीरूपीं धन पांची भावांत वाटावयाचें कसें याबद्दल ती साशंक झाली. इतक्यांत त्या ठिकाणीं द्रुपदपुत्र धृष्टद्युम्न प्राप्त झाला. आपल्या भगिनीला जिंकणारे विप्ररूपीं वीर कोण आहेत याचा पक्का शोध काढण्याकरितांच त्याला द्रुपदानें त्या ठिकाणीं पाठविलें होतें. ते पांची विप्र पांडव आहेत असें धृष्टद्युम्नास समजून आलें. त्यानें ती हकीगत आपल्या बापास कळविली. आपल्या कन्येस जिंकून नेणारा वीर अर्जुनच आहे हें कळतांच द्रुपदाला अत्यानंद झाला. त्यानें मोठ्या थाटानें पांडवांना आपल्या गृहीं आणलें. त्यांचा यथायोग्य सत्कार करून अर्जुन व द्रौपदी यांचा विवाह लावण्याकरितां द्रुपदानें मुहूर्त धरिला. त्याची सर्व तयारी पाहून धर्मराजानें द्रुपदास सांगितलें, " राजा, तूं लग्नसमारंभ आरंभला आहेस; पण तूं द्रौपदीचें लग्न कोणाशीं लावणार ? ती आह्मां पांची भावांची भार्या आहे. "

धर्माचें भाषण ऐकून द्रुपदराजा मोठ्या विचारांत पडला. पांची भावांत एकच कन्या वाटून देण्याबद्दल तो शंकित झाला. इतक्यांत त्या ठिकाणीं श्रीकृष्ण आणि श्रीव्यासदेव प्राप्त झाले. त्या दोन्ही महात्म्यांचे चरणास नमस्कार करून द्रुपदानें त्यांना धर्मप्रभृति पांडवांचें ह्मणणें सांगितलें. त्यावर व्यासमुनि ह्मणाले, " तुझी कन्या द्रौपदी ही पांची पांडवांची भार्या होणेंच इष्ट आहे. लोकव्यवहाराच्या मानानें ही गोष्ट अघटित दिसणारी आहे; पण ही कन्या

सामान्य नव्हे. अरे, ही साक्षात् भवानीच्या अंशानें अवतीर्ण झाली आहे. हिचा जन्मवृत्तांतही तूं जाणतोसच. इतर सामान्य कन्येप्रमाणें ती उत्पन्न झालेलीच नाहीं. ती अग्नींतून उत्पन्न झाली आहे. कौरवादि दैत्यगणांचा नाश करण्याकरितांच ही द्रौपदी भूलोकावर आली आहे. खेरीज हिचा पूर्ववृत्तांत चमत्कारिक आहे. हिनें पूर्वी तप करून शंकराला प्रसन्न करून घेतलें. आपल्याला उत्तम वर मिळावा ह्मणून हिनें शंकराजवळ पांच वेळ मागणें मागितलें. शंकरानेंही तिला पांचवेळ तथास्तु ह्मटलें. त्या शिववरदानाप्रमाणें हिला पंच भ्रतार प्राप्त होणें इष्टच आहे. तेव्हां तूं निःशंक मनानें ही दिव्य कन्या पांची पांडवांना अर्पण कर. ”

व्यासांच्या या भाषणास भगवानानेंही पुष्टि दिली. तेव्हां द्रुपदानें पांची पांडवांशीं द्रौपदीचा विवाह लाविला. चार दिवस अपूर्व सोहळा होऊन द्रुपदानें पांडवांची बोळवण केली. पांची पांडव, कुंती व द्रौपदी यांसहवर्तमान हस्तिनापुरास निघून गेले.

पांडवांना द्रौपदीरत्न प्राप्त झालें हें पाहून त्यांचे भाऊ दुर्योधनादि कौरव खवळले. त्यांनीं त्यांच्याशीं वैर धरिलें. ते सर्वजण कपट लढवून त्यांचा नाश करण्यास प्रवृत्त झाले. त्यांची व पांडवांची सारखीं भांडणें सुरू झालीं. हें पाहून त्यांचा चुलता धृतराष्ट्र यानें भीष्म, द्रोण, कृप, विदुर इत्यादिकांचा सल्ला घेऊन आपल्या राज्याचे दोन भाग केले. एक भाग पांडवांना देऊन त्यानें त्यांस आपल्या पुत्रांपासून अलग केलें. पांडवांनीं आपली राजधानी इंद्रप्रस्थास केली. श्रीव्यासांनीं धर्मराजाला राज्याभिषेक करून इंद्रप्रस्थाच्या गादीवर स्थापिलें. पांडवांमध्यें तंटा होऊं नये ह्मणून नारदमुनींनीं त्या पांचामध्यें द्रौपदीची वाटणी करून दिली. धर्मप्रभृति पांडवांनीं प्रत्येकीं दोन महिने आणि बारा दिवस द्रौपदीला आपली

भार्या मानावें, याप्रमाणें दर वर्षाची वाटणी झाली. पाळीप्रमाणें द्रौपदी ज्याची भार्या असेल त्यावांचून इतर चौघांनीं त्याकालीं तिला आपली भार्या समजूं नये. इतकेंच काय पण त्या काळीं जर त्यांतून कोणी त्या पतिपत्नीचा एकांत पाहील तर त्यानें एक तप गृहत्याग करून तीर्थाटनास जावें असा नारदानें दंड ठरवून दिला. त्या महात्म्यांनीं नारदाची आज्ञा वंद्य मानिली. द्रौपदीनेंही नारदाचें वचन मस्तकीं धारण केलें, आणि ती आपल्या पंचभ्रतारास ईश्वर-तुल्य समजून राहिली.

पुढें कांहीं दिवसांनीं पांडवांनीं राजसूययज्ञ केला या यज्ञाच्या प्रसंगीं पृथ्वींतील सर्व राजांनीं धर्मराजाला अपूर्व वस्तु अर्पण केल्या. पांड-वांना अद्भुत वैभव प्राप्त झालें. साऱ्या पृथ्वींत त्यांचा लौकिक वाढला. ते सर्वजण भगवद्भक्त होते. त्यांची पत्नी द्रौपदी ही देखील श्रीकृष्णाची अनन्य भक्त होती. ती आपल्या भ्रतारांना आपलें दैवत समजून त्यांची एकनिष्ठेनें सेवा करी. तिची पतिभक्ति पाहून श्रीकृष्णानें तिला आपली बहीण मानिलें होतें. श्रीकृष्णाचें द्रौपदीवर सुभद्रे-पेक्षांही जास्त प्रेम असे.

द्रौपदीसारख्या साध्वीसहवर्तमान पांडव वैभवांत लोळत आहेत हें पाहून कौरवादि दुर्जनांचें पित्त खवळलें. ते त्यांच्या अन्नूवर उठले. चैद्य, शाल्व, मागध वगैरे दुष्टजन कौरवांना सहाय्य झाले. राजसूययज्ञाच्या वेळीं सर्व नृपति भोजनास बसले असतां साध्वी द्रौपदी त्यांच्या पंक्तींत वाढीत होती. तिच्याकडे पाहून त्या सर्व दुष्टांना मोठें वैषम्य वाटे. पण भगवद्भक्ताबद्दल वैषम्य धरून आप-लाच नाश होतो हें तत्व त्या दुर्जनांना माहीत नव्हतें. द्रौपदीची फजीति होऊन पांडवांचें उणें कसें पडेल याविषयीं ते नानाप्रयत्न योजूं लागले. भगवद्भक्तांचें सामर्थ्य पाहून तरी त्या दुष्टांनीं सद्बुद्धि

धारण करावी ह्मणून श्रीकृष्णानें त्या ठिकाणीं एक अपूर्व प्रकार घडवून आणिला. द्रौपदी वाढीत असतांना श्रीकृष्णानें तिच्या चातुर्याची व सद्गुणांची मोठी वाहवा केली. आपण ज्याचें सतत नामस्मरण करतों, ज्याच्या कृपेमुळेंच आपल्या पतींना वैभव प्राप्त झालें अशा श्रीकृष्णाकडे पाहतांच द्रौपदीच्या सर्व अंगांत प्रेमरस दाटून आला. तिचें सर्व अंग फुगून तिच्या कंचुकीची गांठ सुटली. तें पाहतांच कौरवांना अति आनंद वाटला. याज्ञसेनी हात आखडून वेड्यासारखी चोहोंकडे पाहूं लागली. शकुनी, दुर्योदन, कर्ण हे एकमेकांकडे पाहून विनोद करूं लागले. त्यांनीं अन्न वाढावयास आणण्याची मुद्दाम घाई केली. प्रत्येकजण निरनिराळा पदार्थ मागूं लागला. कोणी कोणी द्रौपदीला ‘ उभी कां ’ म्हणून विचारूं लागले. पांडवांची फजीती करण्याच्या हेतूनें कर्ण म्हणाला, “ आज अन्नाचा तोटा दिसत आहे, आतां आपण उठावें हें बरें. ” कर्णाप्रमाणेंच इतर दुर्जनांनीं द्रौपदी व पांडव यांची थट्टा आरंभून यज्ञाची निंदा चालविली. त्या खलजनांचीं मर्मभेदक भाषणें ऐकून द्रौपदी लज्जित झाली. तिचें मुखकमल कोमेजलें. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. अनेक व्याघ्रांच्या गर्जना ऐकून जसा हरणीचा जीव घाबरा होतो त्याप्रमाणें कौरवांच्या वल्गना ऐकून द्रौपदीचा जीव कासावीस झाला. पाळण्यामध्यें निजलेल्या बालकाला विंचवानें नांगी मारली ह्मणजे त्याची जशी अवस्था होते त्याप्रमाणें शकुनिकर्णादि दुष्टांच्या भेदक शब्दांनीं द्रौपदी विव्हळ झाली. त्यावेळीं आपलें संकट दूर होण्याकरितां तिनें श्रीकृष्णाची मनोमय प्रार्थना केली. ज्यांचीं अंतःकरणें पापानें माखलीं आहेत असे ते सर्व पापमती कौरव याज्ञसेनेची फजीती करण्यास सरसावले; पण भक्तवत्सल परमेश्वरास आपल्या भक्तांचें उणें कसें खपणार ? श्रीकृष्णानें त्या

साध्वीच्या हृदयांत प्रवेश करून तिच्या भुजांवर आणखी दोन हात निर्माण केले. त्या नवीन फुटलेल्या हातांनीं द्रौपदीनें आपल्या चोळीची गांठ मारली. जिची अब्रु घेण्याकरितां कौरवादि जन अगदीं टपून बसले होते. त्यांनीं ती महान् सती एकदम चतुर्भुज झालेली पाहून माना खालीं घातल्या. सूर्याचा उदय होतांच जसा अंधार नाहींसा होतो; विष्णुसहस्रनाम म्हणतांच जशीं पातकें नष्ट होतात, त्याप्रमाणें कृष्णकृपा होतांच याज्ञसेनेचें मुख टवटवीत दिसूं लागलें. शुंभनिशुंभांचा वध करून यशस्वी झालेल्या भवानीप्रमाणें कौरवादि दुष्टांचा गर्व हरण करून द्रौपदी विजयी झाली हें पाहून सर्व सज्जनांना मोठा आनंद वाटूं लागला.

पांडवांचा उत्कर्ष पाहून साधुजनांना हर्ष झाला. राजसूययज्ञ पार पडून सर्व राजेलोक आपापल्या देशास निघून गेले. दुर्योधनादि कौरवही हस्तनापुरास चालते झाले, पण पांडवांच्या अभ्युदयामुळें दुर्योधनाचें मन होरपळून गेलें. तो दीर्घ निश्वास सोडूं लागला. तो तापलेल्या लोखंडाप्रमाणें तप्त दिसूं लागला. तो नीच सर्पाप्रमाणें फूत्कार करून पांडवांचा चावा घेण्यास उद्युक्त झाला. तो ओंठ चावून करकरा दांत खाऊं लागला. पांडवांचें वैभव हिरावून घेऊन द्रौपदीच्या हातांत करटी देण्याची त्याला नुसती विवंचना लागली. त्यानें आपल्या शकुनिमामास एकांतांत बोलावून सांगितलें कीं, “ मामा, धर्मराजाची संपत्ति अवलोकन करून मला हींव भरलें आहे, पांडवांचा नाश झाल्याखेरीज माझें मन स्वस्थ व्हावयाचें नाहीं. ”

दुर्योधनाची चिंता समजतांच शकुनीनें त्याला आधार देऊन त्याची कांहींशी समजूत केली. त्या दोघांनीं खलबत करून पांडवांना देशोधडी लावण्याची मसलत ठरविली. शकुनी हा द्यूतयुद्धांत निपुण होता. त्याच्याजवळ कपटपाश होते. कपटयुक्त द्यूत खेळून

धर्मराजाचें सर्व वित्त हरण करावयाचें असा त्या दुष्टांनीं बेत ठरविला.

धृतराष्ट्राला तो सर्व वृत्तांत विदित झाला. आपल्या पुतण्यांच्या वैभवानें तो आंधळा धृतराष्ट्रही तळमळतच होता. त्याचें दुर्योधनावर अत्यंत प्रेम होतें. तो दुर्योधनाच्या अर्ध्या वचनांत होता. तोही आपल्या पुत्रांच्या दुष्ट बेतास अनुकूल झाला. धर्मराजादि पांडव आपल्याला मानतात ही गोष्ट धृतराष्ट्र जाणत होता. त्यानें पांडवांच्या सुजनतेचा फायदा घेऊन त्यांचा नाश करण्याकरितां विदुरास पाठवून त्यांना हस्तिनापुरास आणविलें. कौरवांच्या घरीं मोठा यज्ञसमारंभ आहे असें निमित्य दाखवून धृतराष्टानें पांडवास आपल्या घरीं आणल्यानंतर दुर्योधनादि दुर्जनांनीं धर्मराजास द्यूत खेळण्याचा आग्रह केला. धर्मानें द्यूत खेळूं नये म्हणून सज्जन विदुरानें त्यास बहुतप्रकारें शिकविलें; पण धृतराष्ट्राची आज्ञा पाळणें हें आपलें कर्तव्य आहे असें जाणून धर्मराजा द्यूत खेळला.

धर्मराजा द्यूतयुद्धांत निपुण होता. पण शकुनीनें कपटाचा अवलंब करून धर्माला फजित केलें. त्यानें धर्माला ईर्षेस चढवून त्याच्याकडून पण लावून द्यूतयुद्ध सुरूं केलें. शकुनी प्रत्येक डावांत विजयी झाला. धर्मराजा एकेक पण हरूं लागला. अखेर धर्मराजाचें सर्वस्व हरण होऊन त्यानें स्वतःसह आपले सर्व बंधू पणाला लाविले. शकुनीनें तेही पण जिंकून सर्व पांडवांना आपले दास बनविले. धर्मराजाला द्यूताची इतकी हाव चढली कीं, त्यानें भ्रमित होऊन आपली प्रिय पत्नी साध्वी द्रौपदी हिला देखील पणाला लाविलें. शकुनीनें आपल्या कपटपाशांच्या सामर्थ्यानें द्रौपदीचाही पण जिंकिला आणि तिलाही कौरवांची बटीक बनविली. पांडवांचें सर्व राज्य हरण होऊन त आपल्या भार्येसह कौरवांचे दास झाले, हें पाहतांच दुर्योधन-कर्णादिकांचा हर्ष गगनांत मावेना. पांडवांचें वैभव नाहींसें होऊन

आपल्या पुत्रांचा अभ्युदय झाला हें जाणून आंधळ्या धृतराष्ट्रालाही आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या.

यासमयीं पांडवाबरोबर साध्वी द्रौपदीही हस्तनापुरास आलेली होती. कौरवांनीं कपटद्यूत खेळून पांडवांचें सर्वस्व हरण केलें आहे ही बातमी ऐकतांच द्रौपदी चिंतातुर होऊन श्रीकृष्णाचा धावा करूं लागली.

द्रौपदीसह पांडव आपले दास झाले आहेत हें जाणून दुर्योधन अतिशंय गर्वानें विदुरास ह्मणाला, " पांडवांना आह्मीं जिंकलें आहे. द्रौपदी आमची दासी झाली आहे. तूं द्रौपदीला आतां सभारंगांत घेऊन ये ! सर्व सभेमध्यें तिचें पातिव्रत्य काय आहे तें जगाला दाखविल्यावांचून माझें समाधान होणार नाहीं. " दुर्योधनाचें भाषण विदुरास कसें रुचणार ? त्याचा धिःकार करण्याकरितां विदुर बोलला, " हे महादुर्जना, कपटी दुर्योधना ! अपवित्र वाणीचा उच्चार करून पापाचे पर्वत आपल्या डोक्यावर कां उभारतोस ? तुझा प्राणनाश जवळच ओढवला असावासें दिसतें. "

विदुर हा पांडवांचा पक्षपाती असून कौरवांचा हितशत्रु असल्यामुळें तो पांडवांचा कैवार घेत आहे असें जाणून दुर्योधनानें विदुराची निर्भर्त्सना केली. त्याच्या हातून आपलें कार्य भागणार नाहीं असें समजून त्यानें प्रातकामी नांवाच्या एका सेवकाला द्रौपदीस आणण्याकरितां पाठविलें. तें सारथ्याचें पोर द्रौपदीच्या मंदिरांत जाऊन तिला सांगूं लागले, " हे द्रुपदनंदिनी ! दुर्योधनमहाराजांनीं तुला सभेमध्यें बोलाविलें आहे. धर्मराजाचा द्यूतयुद्धामध्यें पराजय झाला आहे; दुर्योधनाच्या आज्ञेपुढें कोणाचाच इलाज नाहीं. "

हे शब्द ऐकतांच द्रौपदीचें काळीज चर्र झालें. एखाद्या कमळिणीवर वज्र पडावें त्याप्रमाणें त्या प्रातकामीच्या शब्दानें तिची दुर्धर अवस्था झाली. ती तसाच धीर धरून ह्मणाली, " तूं परत जाऊन

भीष्म-द्रोणादिकांना माझा निरोप सांग कीं, तुह्मी सर्व सभ्य सभे-मध्यें बसले असतांना दुर्योधन अशी विपरीत क्रिया करतो याचा अर्थ काय ? धर्मराजा पण हरला असेल तर तो तुमचा दास झाला असेल. नारदमुनींच्या वचनाप्रमाणें माझ्यावर सांप्रत धर्म-राजाचा अधिकार नाहीं. हल्लीं मी भीमाची भार्या आहें. दुर्योधनानें भीमाला जिंकलें असतें किंवा भीमानें मला पण लावला असतां तर मी कौरवांची दासी होणें रास्त होतें. धर्मराजाला यावेळीं द्रौपदीचा पण लावण्यास हक्कच पोंचत नाहीं. ”

त्या सूतपुत्रानें द्रौपदीचा निरोप भरसभेंत बोलून दाखविला. खेरीज यावेळीं द्रौपदी ऋतुस्नात असल्याचेंही वृत्त त्यानें उघड-पणें सांगितलें. त्याच्या कमकुवतपणाबद्दल त्याची निर्भर्त्सना करून दुर्योधन दुःशासनास ह्मणाला, “ दुःशासना, तुझ्यावांचून हें कार्य होणार नाहीं. द्रौपदी आपली दासी झाली आहे. दासीला सभेमध्यें आणण्यास काय हरकत आहे ! तूं असाच्या असा जा; आणि तिची भीड न धरितां तिचे केश धरून तिला फराफर ओढीत सभेमध्यें घेऊन ये !

दुर्योधनाचें भाषण दुःशासनास पसंत पडलें. भयंकर वाघ हरिणी-वर उडी घालण्यास मागेंपुढें पहात नाहीं; किंवा राजाच्या भांडारांत प्रवेश करण्यास चोर जसा संकोचित् होत नाहीं त्याप्रमाणें दुःशा-सन बेपर्वा होऊन द्रौपदीच्या मंदिराकडे धावला. सीतेला उचलून नेऊं पाहणाऱ्या रावणाप्रमाणें दुष्ट असा तो दुःशासन द्रौपदीला ह्मणाला, “ द्रौपदी तुझ्या पांची पतींना आह्मीं दास केलें आहे. तूं आमची दासी झाली आहेस. तुला राजा दुर्योधन आपण होऊन बोलावीत आहे, तुझें भाग्य उदयास आलेसें दिसतें. तूं आनंदानें सभेमध्यें चल आणि दुर्योधनाची भार्या हो. ”

दुःशासनाचें हें अभद्र भाषण ऐकतांच आपल्यापुढें तो यमदूतच उभा आहे असें द्रौपदीला वाटलें. तिचा कंठ दाटून येऊन ती दुःशासनास ह्मणाली, "भाउजी, तुह्मी बायकांना सभेमध्यें कसें नेतां? तुह्मां सर्वांचा ज्येष्ठ भ्राता जो धर्मराजा त्याची पत्नी ह्मणजे तुह्मांला तुमच्या गांधारी–मातेसारखीच आहे. भाउजी, यावेळीं तुह्मीं माझा कैवारच घेतला पाहिजे. तुह्मींच माझें रक्षण केलें पाहिजे. यासमयीं तुह्मीं द्रुपदराज होणें इष्ट आहे. हें जर तुमच्यानें करवत नसेल तर भाउजी; आपण शस्त्र धारण करून माझा शिरच्छेद तरी करून टाका."

द्रौपदीनें त्या दुष्टाची पुष्कळ करुणा भाकली. पण त्या निर्दयाला दया कोठून येणार? हिंसकाला कधीं तरी माया उत्पन्न झाली आहे काय? धनलुब्ध माणसाला धर्म कसा रुचेल? साधु-निंदकाला भजनमार्ग कधींच आवडणार नाहीं. निखारा आपला गुण केव्हांच सोडणार नाहीं. त्याचप्रमाणें पांचालीच्या उपदेशवाणीनें दुःशासनाचें मन द्रवलें नाहीं. तो तिची निंदा करून तिला ओढून नेण्यास सरसावला. त्याचा दुष्ट हेतु ओळखून द्रौपदी तेथून उठली आणि गांधारीकडे पळून जाऊं लागली. तिला घरांत जाऊं देणें इष्ट न वाटून दुःशासनही तसाच तिच्या पाठोपाठ धावला. त्यानें तिचे केश धरिले आणि निःशंकमनानें तो तिला ओढूं लागला. दुःशासनानें तिच्या केशाला जोरानें हिसका मारतांच पांचालीनें श्रीकृष्णाच्या नांवानें हंबरडा फोडून आपला देह धरणीवर टाकिला. त्या महापतिव्रतेचें शरीर पृथ्वीवर पडतांच सर्व ब्रह्मांड डळमळूं लागलें. सप्तसमुद्रांचें पाणी उसळूं लागलें. सूर्यचंद्र स्थानभ्रष्ट होऊन पृथ्वीवर पडण्याच्या बेतास आले. कैलास-वैकुंठादि-लोकही हादरून गेले!

त्या चांडाळानें तिचे केश ओढून तिला उठविलें. एखाद्या दीन हरिणीला तोंडांत धरून दुष्ट व्याघ्र पळून जातो तसा तो पाप-प्रवृत्त, दुरात्मा दुःशासन द्रौपदीला फरफरा ओढीत सभेकडे नेऊं लागला. द्रौपदीचे सर्व अलंकार विगलित झाले. तिच्या गळ्यांतील मोत्यें ठिकठिकाणीं पडूं लागलीं. तिनें अश्रुपात करून धरणीला भिजवून टाकिलें. मनामध्यें श्रीकृष्णाचें ध्यान करीत ती दुःशासनास ह्मणाली, " भाउजी, आपण मला अशी ओढूं तरी नका हो ! माझे केश थोडे तरी सैल सोडा हो ! माझ्या घशाला कोरड पडून माझे प्राण कासावीस झाले आहेत; आपण क्षणभर उभे तरी रहा हो ! तुह्मी जर माझी कुतरओढ करण्याचें बंद न कराल तर मी तुह्मांला द्रोणगुरूंची शपथ घालतें. गांधारी व धृतराष्ट्र यांना स्मरून तरी तुह्मी या दीन भावजयीला अशी वेणी धरून ओढूं नका हो ! "

तिच्या विनंतीस मुळींच न जुमानतां त्या पापात्म्यानें तिला तसेंच ओढीत ओढीत सभेंत नेलें. वीज चमकली असतां जसा आकाशांत प्रकाश पडतो त्याप्रमाणें द्रौपदी येतांच ती सभा प्रकाश-मान झाली. द्रौपदीची विटंबना पाहतांच सभेमधील सज्जन लोकांनीं आपले डोळे मिटले. दुर्जनांना मात्र आनंदाचें भरतें प्राप्त झालें. त्या सद्गुणसंपन्न पतिव्रतेचा महिमा न जाणतां अंगराज कर्ण तिला ह्मणाला. " द्रौपदी, तूं आतां पांडवांची आशा सोडून या दुर्यो-धनाच्या मांडीवर बैस. दुर्योधनाला प्रसन्न केलेंस ह्मणजे तुला अनु-पम वैभव प्राप्त होईल. "

त्या सभेमध्येंच पांडवही दीन होऊन बसले होते. कर्णाचें उन्मत्त भाषण ऐकतांच द्रौपदीनें आपल्या पांची भ्रतारांकडे केविलवाणी मुद्रा करून पाहिलें. तिची करुणास्पद स्थिति पाहतांच भीमाचा क्रोध अनावर झाला. त्यानें आपली गदा सरसावून भाषण केलें कीं,

" अभद्र क्रिया करण्यास तयार झालेल्या या सर्व कौरवांचा मी आतां येथल्या येथें शिरच्छेद करतों पहा ! पांचालीचा छल करणाऱ्या सर्व दुष्टांना मी या गदेच्या टोल्यानें भडभडा रक्त ओकावयास लावीन. "

भीमाचा क्रोध व सामर्थ्य धर्मराजा जाणत होता. क्रोधाच्या आवेशांत भीमाकडून अन्याय होऊं नये हें जाणून धर्मराजा भीमास उद्देशून बोलला, " बा भीमा, तुला क्रोध येणें रास्त आहे; पण या वेळीं तूं क्षमेचाच अवलंब करावयास पाहिजेस. कौरवांनीं आपणा सर्वांना पणामध्यें जिंकलें आहे. तुझा क्रोध जर अनावर झाला असेल तर तूं कौरवांच्या ऐवजीं माझ्या डोक्यावरच तुझ्या गदेचा प्रहार कर; पण स्वधर्म व सत्य यांची मर्यादा सोडूं नको. मेरूमंदारासारखे पर्वत चळतील; सूर्यही पश्चिमेस उगवेल; चंद्र उष्णता धारण करील; खडकावर कमळें उगवतील; परंतु भगवद्भक्त असत्य मार्गाचें सेवन कधींही करणार नाहींत. आपण सर्वजण कृष्णभक्त आहों हें तूं जाणतोसच."

धर्माच्या या भाषणानें भीमाचें मन शांत तर झालें नाहींच; पण द्रौपदीला दासीपणा आणण्यास कौरवांपेक्षां धर्मराजाच जास्त कारणीभूत झाला आहे असें वाटून भीमाची वृत्ति जास्तच बेफाम झाली. तो धर्मराजावरच दांत ओंठ खाऊन ह्मणाला, " धर्मराजा; तूं तोंडानें सर्व शास्त्रें सांगतोस पण या कामीं तूंच नीतीचें उल्लंघन केलें आहेस. व्यासनारदांनीं तुला द्यूत खेळूं नको ह्मणून बजाविलें असतांना तूंच द्यूत खेळून आह्मां सर्वांना दास बनविलें आहेस. थांब; ज्या हातांनीं तूं फासे टाकलेस ते तुझे हातच मी तोडून टाकतों. " असें बोलून रागाच्या आवेशांत भीमसेन आपली गदा उगारून धर्मावर धावला ! इतक्यांत विवेकसंपन्न पार्थ त्यास अडवून धरून म्हणाला, " भीमसेना, अरे, तूं हा केवढा अविचार करीत आहेस. अरे, या ब्रह्मांडा-

मध्येंही धर्माप्रमाणें शांत, सत्य, नीतिसंपन्न असा पुरुष सांपडणार नाहीं. धर्मराजा ह्मणजे भक्तिरूपीं तपोवनांतील तापसी आहे. सद्‍बुद्धिसरोवरांत पोहणारा तो राजहंस आहे. विवेकरूपीं रत्नांचा तो मुकुट आहे. अजातशत्रु धर्मराजा आपला वडील बंधु असल्यानें तो आपणांला पंडुसमानच होय. धर्मराजाची जी प्रतिज्ञा तीच आपणा सर्वांची प्रतिज्ञा ! त्याचा जो पराजय तोच आपला पराजय ! धर्मराजाचे हात तोडून अपकीर्तीचाच डाग लागेल. अरे, हा सर्व संसार व वैभव मिथ्या आहे. धर्मराजामुळें आपणांस हीन स्थिति प्राप्त झाली तरी बेहेत्तर आहे. धर्मराजाच्या शब्दाकरितां आपणा चारी बंधूस मृत्यूनें ओढून नेलें तरी आपण सर्वांनीं मरणासही तयार असलें पाहिजे. विपत्काल प्राप्त झाला तरी सज्जन लोक नीतीपासून ढळल्याचें कधीं कोणीं ऐकलें आहे का ? "

भीमाचा क्रोधाग्नि प्रज्वलित होऊन विचाररूपीं वन जाळींत चालला होता; पण पार्थाच्या वचनरूपीं मेघांनीं तो शांत झाला. भीमानें धर्मराजाच्या चरणांवर मस्तक ठेविलें; आणि आपल्या अपराधाबद्दल लज्जित होऊन तो स्वस्थ राहिला.

पांडवांचें आपापसांतील भाषण आटपतें तोंच दुःशासनानें द्रौपदीच्या वेणीस जोरानें हिसका मारिला. त्या हिसड्यानें दीनवदन होऊन द्रौपदी भीष्मद्रोणाकडे पाहून म्हणाली, " तुमच्यासारखे न्याय व नीति जाणणारे वृद्ध गृहस्थ या सभेंत बसले असतांना हे दुष्ट कौरव असा अन्याय करतात हें मोठेंच आश्चर्य आहे. तुह्मी वडील आहां. कौरवांनीं मला जिंकलें किंवा नाहीं याचें उत्तर तुह्मींच आपल्या मुखानें सांगा. "

यावर महाराज भीष्मानें सांगितलें, " पांचाळी, आह्मी कितीही न्याय जाणत असलों तरी आह्मांला येथें कोण जुमानणार ? प्रत्यक्ष

धर्मराजाच आपण पण हरल्याचें कबूल करीत आहे त्यास आमचा काय इलाज आहे बरें ?" नंतर द्रोणाचार्यही म्हणाले, " हा धर्मराजा सद्गुणसंपन्न व सत्य जाणणारा आहे. त्याच्या तोंडांतून विपरीत भाषण केव्हांही निघणार नाहीं. तो जें काय म्हणतो त्याच्याविरुद्ध आम्हांला कसें जातां येईल."

भीष्मद्रोणांनीं धर्मराजाच्या आड दडून कांहींतरी उडवाउडवीचीं उत्तरें दिलेलीं ऐकून द्रौपदी निराश झाली. तिची त्यांच्या न्यायबुद्धीवर मोठी भिस्त होती. परंतु तेही भिडेनेंच कांहींतरी बोलत आहेत हें जाणून ती सर्व सभेकडे दीनवदन करून पाहूं लागली. इतक्यांत विकर्ण पुढें होऊन ह्मणाला, " द्रौपदीला पणामध्यें जिंकलें असें जो कोणी ह्मणत असेल त्याच्या जिव्हेला किडे पडतील ! पांचाळी आमची दासी ठरत नाहीं असें मी प्रतिज्ञापूर्वक ओरडून सांगतों. या ठिकाणीं हा धडधडीत अन्याय होत आहे. ही सर्व सभा दुष्टांनीं भरलेली आहे. यामध्यें खरा साधु कोणीही दिसत नाहीं. धृतराष्ट्र हा पुत्रलोभानें बुद्धिभ्रष्ट होऊन अंतर्बाह्य आंधळा बनला आहे. भीष्मद्रोण भिडेनें मेले आहेत. हा शकुनि आणि हा दुष्ट कर्ण यांनींच दुर्योधनाचें चित्त मलीन करून आमचा कुलक्षय मांडला आहे. ज्यांनीं या साध्वीला सभेमध्यें उभें केलें आहे ते सर्व भुलले आहेत. ही द्रौपदी ह्मणजे प्रलयाग्नीची ज्वाळा आहे. कर्णासारखे चांडाल हे त्या ज्वालेमध्यें पुढें पतंगाप्रमाणें भस्म होऊन जाणार आहेत ! "

विकर्णाचें भाषण ऐकून कर्ण संतापला. तो चवताळून ह्मणाला, " विकर्णा; धर्मराजानें पण हरला यास आह्मीं काय करावें. तूं मूर्खाप्रमाणें बडबड करतोस त्याबद्दल मीं तुझी जीभच कापून टाकली असती; पण गांधारीकडे पाहूनच आह्मी गप्प आहों हें

ध्यानांत आणून तूं स्तब्ध बैस. तूं भीष्मद्रोणांनाही ज्ञान शिकवितोस याची तुला लाज वाटत नाहीं काय? दासी झालेल्या द्रौपदीला सभेंत ओढून आणलें यांत अन्याय तो काय झाला? अरे, एक स्त्री आणि पांच भ्रतार असें कोणत्या तरी शास्त्रांत आहे काय? अरे; ही द्रौपदी ह्मणजे पापिणी, जारिणी आहे! पांची पांडवांचीं वस्त्रें व भूषणें काढून घेऊन हिला देखील येथें नग्न करा असें मी ह्मणतों"

कर्णाचें भाषण ऐकतांच पांडवांनीं वस्त्रभूषणांचा त्याग करून वल्कलें धारण केलीं. दुर्योधन बेफामपणानें द्रौपदीला हाक मारून आपल्या मांडीवर बसण्याकरितां आज्ञा करूं लागला. त्याचें तें भ्रष्ट वाक्य ऐकून ती साध्वी ह्मणाली, "कौरवकुलाची होळी करण्याकरितां तुह्मी आपल्या हातांनींच अग्नी पेटवीत आहां याचें भान धरा. हे चांडाळा, कुलांगार दुर्योधना; मी तुझी भावजय असून तूं मजविषयीं पापवासना धरितोस आणि मला मांडीवर बसण्यास सांगतोस त्याअर्थीं गलितकुष्ट भरून तुझी जीभ अद्याप गळून कशी पडत नाहीं! तुझ्या मांडीवर मी तर बसणार नाहींच; पण भीमाची गदा मात्र तुझ्या मांडीवर बसून तुझे पंचप्राण हरण करील. भीमाची गदा हीच तुला योग्य नवरी आहे. तुझ्या घरांतील सर्व स्त्रिया हाहाःकार करून मुखानें वाद्यें वाजवीत असतांच तुझें या भीमसेनाच्या गदेशीं लग्न लागून तूं समरमंचकावर लोळत पडशील तेव्हां तुझे डोळे उघडतील. तूं आपल्या शंभर बंधूं-सह यमलोकीं जाशील तेव्हांच या धृतराष्ट्राचा आत्मा थंड होईल."

द्रौपदीच्या भाषणाची पर्वा न करितां दुर्योधन अधिकच उन्मत्त झाला. त्यानें आपली मांडी उघडी करून तो पुन्हां द्रौपदीस ह्मणाला, "हे प्राणप्रिये द्रौपदी; तूं माझ्या या मांडीवर निःशंकपणें येऊन बैस. तूं माझी अर्धांगी झालीस ह्मणजे मी तुला पट्टराणी करीन; ये, ये; त्वरित येऊन तुझ्या आलिंगनानें मला धन्य कर."

दुर्योधनाचे बेफामपणाचे उद्गार ऐकून भीमसेनाचे डोळे लाल झाले. त्रस्त झालेल्या भुजंगाप्रमाणें तो खवळला. मस्त झालेल्या हत्तीप्रमाणें भीमसेन चवताळला. चिडलेल्या वाघाप्रमाणें कोपायमान होऊन तो म्हणाला, " हे आंधळ्या धृतराष्ट्राच्या कुलांगार पोरा; इकडे पहा; अरे, तूं ज्या मांडीवर द्रौपदीला धारण करण्याची इच्छा करीत आहेस ती तुझी मांडी मी या गदेच्या टोल्यानें छिन्नभिन्न करीन, ही माझी प्रतिज्ञा ऐकून ठेव. माझी ही प्रतिज्ञा खोटी झाली तर आह्मां पांडवांचें कृष्णदास्यत्व व्यर्थ गेलें असें समज. "

भीम आणि द्रौपदी यांच्या शब्दशस्त्रानें विव्हळ होऊन दुर्योधन अधिकच खवळला. तो दुःशासनास हांक मारून म्हणाला, " दुःशासना; अरे, या द्रौपदीचे हात, पाय, नाक, कान, जीभ तोडून टाका. आधीं तिचें वस्त्रहरण करून तिला या भरसभेंत नग्न करा असें मी सांगतों. "

दुर्योधनाची आज्ञा होतांच त्या चांडाल दुःशासनानें आपल्या डाव्या हातानें तिची वेणी ओढून धरिली आणि उजवा हात तिच्या वस्त्रास घातला. द्रौपदी दीन होऊन आपल्या पांची भ्रतारांकडे पाहूं लागली. ते सर्वजण दास होऊन बसलेले पाहून ती निराश होऊन अश्रुपात करूं लागली. तिचा कंठ दाटून आला. सर्व अंग घर्मयुक्त झालें. तिच्या अंगाला थरकांप सुटला. आतां आपलें रक्षण करण्यास एका श्रीकृष्णावांचून कोणीही समर्थ नाहीं असें जाणून अनन्यभावानें ती पवित्र साध्वी कृष्णपरमात्म्याचा धावा करूं लागली. " हे करुणाकर, गोकुलवासी श्रीकृष्णा; माझा कैवार घेण्यास तूं त्वरित धावून ये. हे गोवर्धन उचलणाऱ्या कृष्णरूपीं जगदंबे; दुर्योधन, दुःशासन या शुंभनिशुंभांचा वध करून माझी लाज राख. हे कृष्णा; तूं वेदशास्त्रांना वंद्य आहेस. तूं सर्वसाक्षी असून तुला माझें

संकट दिसत नाहीं काय ? अरण्यामध्यें वणवा पेटला असून त्यामुळें जिचे प्राण व्याकुळ झाले आहेत अशा दीन गायीवर हजारों व्याघ्रांची उडी पडावी त्याप्रमाणें या कौरवांच्या सभेंत माझी स्थिति झाली आहे हें तुला समजत नाहीं काय ? हे भक्तवत्सल, दयाळु श्रीकृष्णा; यावेळीं तूं धावून न येशील तर तुझ्या ब्रीदास कमीपणा येईल ! श्रीकृष्णा, ही द्रौपदी तुझी बहीण आहे. तुझ्या बहिणीला दुष्ट कौरव गांजीत असतां तुझा अभिमान नष्ट कसा होईल ? हे कैटभारि ! या कौरवरूपीं कुबुद्धि—सागरांत बुडणाऱ्या या तुझ्या दीन दासीला तूंच हात दे. कौरवरूपीं पिशाचांनीं मला वेढलें आहे तेव्हां परमेश्वरा, तूंच यासमयीं पंचाक्षरी हो. तूं दयेचा सागर आहेस. तूं पराक्रमी लोकांतील नरसिंह आहेस. ही द्रौपदी तुझी कन्या आहे. सिंहाच्या बालकाला कौरवरूपीं मत्त गजांनीं वेढणें तुला बरें दिसतें काय ? दीन बंधो श्रीकृष्णा; मला तुझ्यावांचून कोठेंही थारा नाहीं. ईश्वरा, तूं त्वरित धावून ये; माझी लज्जा गेल्यानंतर तुझ्या धांवून येण्याचा काय उपयोग होईल ? गोपाळा, तुला इतका विलंब कां लागला आहे न कळे. या दुर्जनांच्या सभेंत तुझ्या द्रौपदीची अवकळा झाल्यानंतर तूं येथें येऊन काय करणार ? श्रीकृष्णा; तुला योगनिद्रा लागली आहे काय ? तुला हाका मारतां मारतां या तुझ्या बहिणीचा घसा कोरडा झाला तरी तूं जागा होत नाहींस काय ? ज्याला आपणच वाढविलें त्याला आपणच बुडाविणें प्रशस्त न वाटून पाणी लाकडाला बुडवीत नाहीं त्याप्रमाणें आम्ही तुझ्या कृपेनेंच वाढलों आहों. या कौरवरूपीं लांडग्यांचा कंठ विदीर्ण करण्याकरितां तूं धांवून येणार नाहींस; या दीन निराधार पतिव्रतेचें रक्षण करण्यास तुझ्याकडून हयगय होईल; या शरणागत द्रौपदीची अब्रू जाईल; या तुझ्या पांचालीची लज्जा संरक्षण होणार नाहीं; तुझ्या आश्रित जनांचीं दुष्ट कौरवांकडून

अवहेलनाच होत राहील; अनन्य होऊन तुला हांका मारणाऱ्या दीन, दुबळ्या द्रौपदीचें रक्षण करण्यास तूं धांवणार नाहींस तर तुझ्या दयागुणास कलंक लागून तुझें भक्तपालक हें नांव सर्वस्वी नष्ट होईल ! याची कांहीं तरी लाज धर. धाव, श्रीकृष्णा, धाव ! दीन-संरक्षणाकरितांच तुझें अस्तित्व आहे याचें स्मरण कर. ”

द्रौपदीच्या या करुणाशब्दरूपी भ्रमरांनीं श्रीकृष्णरूपी कमलावर गुंजारव मांडला. यासमयीं श्रीकृष्ण–परमात्मा स्वानंदरूपी मंचकावर पडला असून ज्ञानकळा रुक्मिणी ही त्याचे चरण चुरीत होती. द्रौपदीची हांक कानीं पडतांच श्रीकृष्ण–परमात्मा जागा झाला. तो घाबरेपणानें चोहोंकडे पाहूं लागला. पांडवांच्या खजिन्यांत सांठविलेल्या द्रौपदीच्या लज्जारूपी अपार संपत्तीवर कौरव चोरांची धाड पडत आहे ही गोष्ट ज्ञानदृष्टीनें समजून येतांच तो भक्तवत्सल श्रीकृष्ण थरथर कांपूं लागला. रुक्मिणीच्या नाजुक हातांतील आपले चरण काढून घेऊन तो एकदम धावत सुटला. त्याची अगदीं धांदल उडाली. पीतांबराचा सोगा खोंण्याचेंही त्याला भान राहिलें नाहीं. आपला मुकुट धारण करण्यासही तो विसरला. पतिव्रतेच्या संरक्षणाच्या कामीं वैकुंठाधिपतीला धीर कसा निघणार ? त्याचा कंठ सद्गदित झाला; त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या; तशाच स्थितींत तो उघडा बोडकाच पळत सुटला आणि सती द्रौपदीच्या पाठीशीं जाऊन उभा राहिला.

इकडे कौरवसभेंत दुष्ट दुःशासनानें तिच्या वस्त्रास हात घातला होता. तिच्या लज्जेचें संरक्षण होण्याकरितां श्रीकृष्णानें आपल्या दिव्य कृपावस्त्रानें द्रौपदीची काया झाकून टाकली. त्याच्या वस्त्राच्या तेजानें ती सर्व सभा प्रकाशमान झाली. आदिपुरुष श्रीकृष्ण पाठीशीं उभा आहे हें पाहतांच द्रौपदी आल्हाद पावून त्यास म्हणाली,

" श्रीकृष्णा; तूं माझ्या पाठीशीं नव्हतास तों पावेतों या कौरवांनीं मला नीच शब्दांनीं किती गांजलें ह्मणून सांगू ? " इतकें बोलून ती रडूं लागली. श्रीकृष्णानें तिचे अश्रु पुसून तिला सांगितलें, " द्रौपदी ! तूं आतां शोकाचा त्याग कर. या चांडाळ कौरवांनीं तुझ्या संबंधानें जे जे अभद्र उद्गार काढले ते सर्व माझ्या मातोश्री देवकीला लागले असें मी मानतों, यांत काय तें समज. "

इतका प्रकार होईपर्यंत दुःशासन स्वभावतःच द्रौपदीचें वस्त्र धरून उभा राहिला होता. तें पाहून दुर्योधन क्रोधयुक्त होऊन त्यास ह्मणाला, " दुःशासना, वाट कशाची पाहतोस; अरे; भीड कोणाची धरतोस ! त्या पापिणीचें—अवदसेचें वस्त्र-हरण करण्यास एकदम सुरुवात कर. "

आधींच उल्हास त्यांत फाल्गुन मास ! दुर्योधनाची आज्ञा होतांच दुःशासनानें त्या साध्वीचें नेसतें वस्त्र हिसकिलें. त्या अबलेची दशा मनांत आणून सज्जनांनीं डोळे मिटले. दुर्योधन, शकुनि, कर्ण इत्यादि चांडाळांना हर्षवायु होण्याचा प्रसंग आला; पांडवांना मोठेंच संकट वाटलें. पण तसें होण्याचें कारण नव्हतें. श्रीकृष्णानें जिच्या देहावर आपल्या वस्त्राचें पांघरूण घातलें तिचा देह उघडा होणें शक्य तरी आहे काय ? परमेश्वराच्या प्रसादपटानें झाकलेल्याचें एक नख उघडें करण्यास प्रत्यक्ष काळ देखील समर्थ नाहीं ! मग पापी दुःशासनाची किंमत ती काय ? त्यानें तिचा देह उघडा व्हावा या हेतूनें तिचें वस्त्र फेडलें पण त्याच्या आंतून दुसरें वस्त्र निघालें. द्रौपदी मोठी कपटी व धूर्त असल्यानें ती दुसरें वस्त्र नेसूनच आली असेल असें समजून दुःशासनानें तेंही फेडिलें. तों तिसरें वस्त्र निघालें. याप्रमाणें अनेक रंगाचीं, अनेक ठिकाणचीं व अनेकप्रकारचीं हजारों लुगडीं निघालीं. तीं फेडतां फेडतां

दु:शासन दमून गेला. सभेमधील दुर्जनांनीं हा सर्वप्रकार पाहिला तरी ते सावध झाले नाहींत. त्यांनीं दु:शासनास आपलें काम चालविण्याचा सारखा आग्रह केला. ईश्वरीसामर्थ्याच्या व पातिव्रत्य-प्रभावाच्या अद्भुत गोष्टी पाहून सावध न होतां आपली स्वत:ची बेपर्वाईच चालविणाऱ्या जनाप्रमाणें सर्व कौरव मूर्ख व अप्रबुद्ध आहेत असें जाणून श्रीकृष्णानें सरतेशेवटीं द्रौपदीला आपला स्वत:चा पीतांबर नेसविला. बेफाम झालेले दुष्ट कौरव त्या पीतांबरास हात घालण्यासही कमी करणार नाहींत असें जाणून श्रीकृष्णानें आपलें सुदर्शन धारण केलें आणि अदृश्य रूपानें मोठी गर्जना करून तो ह्मणाला, " दुष्ट, पापी, नष्ट, चांडाळ कौरवांनो ! सावध असा; महान पतिव्रता द्रौपदी हिचा छळ करण्याकरितां तुह्मी दांडगेपणानें या पीतांबरास हात लावाल तर या ठिकाणीं ही सर्व सभा दग्ध होऊन जाईल ! कृष्णभक्त पांडव आणि द्रौपदी यांच्यावांचून सर्व कौरवांचा मी येथल्यायेथेंच नि:पात करीन. माझ्या बहिणीला—सती द्रौपदीला, साध्वी पांचालीला—माझ्या दीन दासाला कष्ट देणाऱ्या सर्व दुर्जनांना मी आतांच्याआतांच कंठस्नान घालीन. "

हे शब्द ऐकतांच कौरवांचें अंत:करण दचकलें. भीष्म, द्रोण, विदुर यांना तो प्रलयकालच भासूं लागला. विदुरानें तो सर्व प्रकार धृतराष्ट्रास समजावून सांगितला. धृतराष्ट्रही मनामध्यें भेदरला. त्या कृतीनें आपले पुत्र मरतील असें जाणून त्यानें तो सर्व प्रकार बंद केला. त्यानें पांडवांना आलिंगन देऊन द्रौपदीची वाहवा केली. त्यानें द्रौपदीला वरप्रदान देऊन पांडवांना दासपणांतून मुक्त केलें. अनेक प्रकारें त्यांचें सांत्वन करून त्यानें त्या सर्वांना वस्त्रें, अलंकार देऊन इंद्रप्रस्थास त्यांची रवानगी करून दिली.

पांडवांना पुन्हां राज्यसुख प्राप्त झालें हें पाहून सर्व कौरव दु:खी

झाले. ते पांडवांच्या नाशाचा विचार योजूं लागले. आपल्याला द्रौपदीचा लाभ होत नाहीं यामुळें संतापून तिचा अतिशय छळ तरी व्हावा अशी त्या दुष्टांनीं मसलत आरंभिली. धर्मराजाशीं द्यूत-युद्ध सुरू करतेवेळीं जितके डाव खेळावयाचें ठरले होते त्यांतील दोन अद्याप तसेच शिल्लक होते. तेव्हा कौरवांनीं हट्ट धरून धृतराष्ट्राकडून पांडवांना बोलावून आणिलें; आणि धर्मराजाला द्यूतामध्यें जिकलें. त्या दोन्ही डावांतील अटीप्रमाणें धर्मराजा आपलें राज्य सोडून आपल्या बंधुवर्गासह अरण्यवासास निघून गेला. साध्वी द्रौपदी आपल्या पतिसमवेत वनवासास गेली हें निराळें सांगणें नकोच.

पांडव वनांत गेले त्यावेळीं शेंकडों ऋषिवर्य व इतर सज्जनही त्यांच्याबरोबर गेले. त्या विप्रवर्यांचें संरक्षण करितां यावें म्हणून धर्मराजानें मोठी तपश्चर्या आरंभिली. कित्येक दिवस कमरेइतक्या पाण्यांत उभे राहून धर्मानें सूर्याची आराधना केली. भगवान सूर्य नारायण त्याला प्रसन्न झाला. त्यानें त्यास एक थाली दिली. पांडवांना एकंदर बारावर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास करावयाचा होता. तेवढ्या अवधींत त्या थालींतून हवें तितकें अन्न उत्पन्न होण्याबद्दल सूर्यानें वरप्रदान दिलें होतें. थालींतून अन्न उत्पन्न होऊन द्रौपदीचें जेवण झालें आणि तिनें ती थाली धुऊन पालथी घातली म्हणजे मग मात्र दुसऱ्या दिवसावांचून त्यांतून अन्न निघावयाचें नाहीं अशी सूर्यानें अट सांगितली होती.

पांडवांनीं कांहीं दिवस वनवासांत काढल्यानंतर दुर्योधनानें दुर्वास नांवाचा अति उग्र ऋषि पांडवांचा नाश करण्यास पाठविला. आपले साठहजार शिष्य बरोबर घेऊन तो दुर्वास मध्यान्हरात्रीं पांडवांकडे जाऊन भोजन मागूं लागला. धर्मराजा व द्रौपदी आपणास अन्नदान न करतील तर आपण त्यास शाप देऊन भस्म करूं

असें त्यानें सांगितलें. याबेळीं पांडव द्वैतवनांत होते. अतिथींचें आदरातिथ्य करणें हा स्वधर्म आहे असें धर्मराजा जाणत असल्यानें त्यानें ऋषिमंडळीस स्नानें करून येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें मुनिजन नदीतीराकडे निघून गेला.

ऋषि परत आले ह्मणजे तशा रात्रीं त्यांना अन्न कोठून पुरवावयाचें या विचारामुळें धर्मराजा संकटांत पडला. वाटेल तितकें अन्न प्रसवणारी थाली पालथी घातली असल्यानें ती दुसऱ्या दिवसापर्यंत निकामी झाली होती. तेव्हां आतां आपलें सत्व जाणार या समजुतीनें धर्मासह सर्व पांडव दीन वदन करून सती द्रौपदीकडे पाहूं लागले. आपल्या पतींची अवस्था जाणून ती पतिनिष्ठ साध्वी द्वारकेकडे पाठ करून वृंदावनावर उभी राहून श्रीकृष्णाचें ध्यान करूं लागली. श्रीकृष्णानें तिचें पातिव्रत्य जाणून त्या ठिकाणीं आपलें रूप प्रगट केलें आणि तिला सहाय्य करून दुर्वासादि मुनींना नदीतीरींच दिव्य भोजन घातलें. द्रौपदीचें सामर्थ्य जाणून तो तापसी दुर्वास फजित झाला. पतिनिष्ठ साध्वीच्या सामर्थ्यापुढें आपल्या तपाची मात्रा चालणार नाहीं असें समजून तो द्रौपदीला वंदन करून तेथून निघून गेला. द्रौपदीच्या पातिव्रत्यप्रभावानें आपलें संकट निरसन झाल्यामुळें पांडवांना मोठा आनंद वाटला.

द्वैतारण्यांत बरींच वर्षे संकटांत काढल्यानंतर द्रौपदीवर एक मोठाच भयंकर प्रसंग गुदरला. एके दिवशीं पांची पाडव शिकारीकरितां अरण्यांत गेले होते. आश्रमामध्यें एकटी द्रौपदीच होती. यासमयीं दुर्योधनाचा मेहुणा जयद्रथ हा शाल्वदेशाला चालला होता. त्याच्या बरोबर बरेंच सैन्य होतें. जयद्रथ पांडवांच्या आश्रमावरून चालला त्यावेळीं द्रौपदी आश्रमाच्या द्वाराशीं उभी होती. तिचें अति नाजुक व मोहक सौंदर्य पाहून जयद्रथ भुलला. पांडवांना एका क्षणांत ठार मारून टाक-

ण्याची धमकी देऊन तिला वश करण्याकरितां जयद्रथानें आपला कोटिक नांवाचा दूत तिच्याकडे पाठविला. कोटिकानें तिला अनेक प्रकारें मोह पाडून जयद्रथाची भार्या होण्याविषयीं सांगितलें. त्या पतिव्रतेचें मन पतिचरणींच गुंतलें असल्यानें तिनें कोटिकाजवळ जयद्रथाची पुष्कळ निर्भर्त्सना केली. तिनें आपल्याला तुच्छवत् केलें, यामुळें रागावून तो दुष्ट जयद्रथ स्वतः आश्रमांत गेला. आपल्या भाषणानें तिला भुलविण्याकरितां तो ह्मणाला, " हे लावण्यखनि द्रौपदी, तूं पांडवांबरोबर राहून व्यर्थ कां कष्ट भोगीत आहेस. तूं मला माळ घाल ह्मणजे तुझ्या सुखांत कधींच कमी पडावयाचें नाहीं. पंडुपुत्रांसारखे करंटे राजपुत्र तुला भ्रतार शोभत नाहींत. तूं या जयद्रथास माळ घातलीस ह्मणजे सर्व सुखें तुझी चाकरी करूं लागतील."

जयद्रथानें तिला भाग्यप्राप्तीची मोठी आशा दाखविली; पण पति हेंच ज्यांचें दैवत अशा स्त्रियांना अन्य सुखाची काय पर्वा असणार ? त्या साध्वीनें जयद्रथास खडखडीत जाब दिला कीं, " जयद्रथा ! तूं महामूर्ख आहेस. तूं साध्वी स्त्रियांचें अंतःकरण जाणत नाहींस ह्मणूनच मूर्खाप्रमाणें मला सौख्याचा मोह घालीत आहेस. अरे नीचा; तूं माझ्या प्राप्तीची इच्छा करीत आहेस; पण प्रलयकालची वीज गिळून टोळ कधींही वाचणार नाहींत हें तुला समजूं नये काय ? प्रज्वलित निखाऱ्याला नांगी मारून विंचू जिवंत राहणें शक्य आहे का ? अरे मूढा, माझे पांच भ्रतार ह्मणजे प्रलयाग्नी आहेत; त्यांच्या तेजापुढें तूं केवळ पतंगाप्रमाणें भस्म होऊन जाशील. यावेळीं पांची पांडव आश्रमांत नाहींत ह्मणून तूं आपल्याला निर्भय समजतोस काय ? वनामध्यें निद्रित असलेल्या वाघाची जिव्हा ओढून पळालेला कोल्हा कधीं तरी जिवंत सुटला आहे कांय ? भयंकर सर्पाचे दांत पाडण्याचा

यत्न करून बेडूक कधींतरी वांचेल का ? जोंपर्यंत सिंहाची गर्जना ऐकली नाहीं तोंपर्यंतच तुझ्यासारखे मदोन्मत्त हत्ती मस्ती करतात. तूं आपल्या वाटेनें चालता हो. इतक्यातच माझे पति येथें येतील. तुला तुझ्या प्राणाची पर्वा असेल तर ते येण्यापूर्वीं तूं निघून जावेंस हेंच बरें. ”

द्रौपदीनें आपला धिःक्कार केला हें जाणून जयद्रथ संतापयुक्त झाला. त्यानें आपल्या मस्तीच्या जोरावर त्या अबलेचा पदर ओढला. तो तिच्या अंगास स्पर्श करण्यास सरसावला तोंच तिनें त्याला पतित समजून ढकलून दिलें. तिच्या धक्क्यानें जयद्रथ उलथून पडला. आपण जिला अबला समजतों ती महा पातिव्रत्यसंपन्न साध्वी असल्यानें अतर्क्य बलानें युक्त आहे हें समजून आलें तरी तो मूढ जयद्रथ तसाच उठला. त्यानें आपल्याबरोबरच्या वीरांचें सहाय्य घेऊन त्या दीन साध्वीवर हल्ला केला. त्यानें जबरीनें तिला आपल्या रथांत घातलें आणि तो जयजयकार करीत आपल्या नगराकडे धांवूं लागला. महा साध्वी द्रौपदी आपल्या पतींचा धावा करूं लागली. ती भयामुळें कांपूं लागली तेव्हां त्या साध्वीचा विलाप ऐकून भूमाता कंपायमान झाली. द्रौपदीसारखी हिरकणी आपल्याला सहज लाभली असें जाणून जयद्रथ हर्षभरित झाला. सिंहाची कांता जंबुकाला लाभत नाहीं हें तत्व त्या मूढाला कसें समजणार ?

द्रौपदीला जयद्रथानें पळविलें हें वृत्त जाणून अरण्यांतील तापसी आरोळ्या ठोकीत पांडवांकडे पळाले. आपली पत्निरूपी सत्कीर्ति जयद्रथरूपी कोल्हा हरण करून चालला आहे हें ऐकून पांची रणसिंव्ह पांडव शस्त्रें सरसावून त्याच्या मागोमाग धावले. त्यांनीं जयद्रथाच्या सैन्याचा निःपात चालविला. भीमानें आपल्या गदाप्रहारानें त्याचे हत्ती घोडे ठार केले. पांडवांच्या तडाक्यांतून आपण आतां जिवंत सुटत नाहीं असें जाणून त्या मूढानें द्रौपदीला रथाखालीं टाकून

दिलें. प्राणाच्या भयानें तो एकटाच पळूं लागला. भीमार्जुनांनीं त्याच्या मागें धाव ठोकून त्याला गांठिलें. भीमानें त्याला रथांतून ओढून भूमीवर पाडलें. त्यानें त्याचें पाट काढून त्याला धर्मराजापुढें आणून उभे केलें. धर्मराजानें त्याला द्रौपदीची माफी मागण्यास सांगितलें. भीमसेन त्याला लत्ताप्रहार करून त्याचा प्राण घेण्यास तयार झाला, तेव्हां साध्वी द्रौपदीनें कृपा केल्याखेरीज आपण जिवंत सुटणार नाहीं अशी खात्री होऊन तो मूढ पापात्मा द्रौपदीची प्रार्थना करून तिला शरण गेला. त्यानें आपला अपराध कबूल करून धर्म व द्रौपदी यांची क्षमा मागितली. तो गांधारीच्या दुःशीला नांवाच्या मुलीचा पति असल्यानें त्याच्या वधानें गांधारीच्या जिवाला दुःख होईल हें जाणून व तो शरणागत झाला आहे हें पाहून धर्म व द्रौपदी यांनीं त्याला जीवदान दिलें.

बारा वर्षें वनवासांत काढल्यानंतर पांडवांनीं एक वर्ष अज्ञातवास स्वीकारिला. त्या सर्वांनीं आपापले वेष पालटले आणि ते धर्मराजाचे घरचे चाकर या नात्यानें विराटराजाच्या पदरीं राहिले. धर्मराजा स्वतः कंकभट बनून विराटाजवळ द्यूत खेळण्यास राहिला. भीमसेन विराटराजाचा बल्लव झाला. अर्जुनानें उर्वशीच्या शापास अनुसरून बृहन्नटा नांव धारण करून स्त्रीवेष घेतला आणि तो अंतःपुरामध्यें स्त्रीजनांना गाणें व नाचणें शिकविण्याकरितां म्हणून विराटाजवळ राहिला. नकुळानें अश्वशाळेवर नोकरी धरिली. सहदेव गुरें राखण्यास राहिला. सती द्रौपदीनें मालिनी हें नांव धारण केलें. आणि ती सैरंध्रीच्या रूपानें विराटाच्या सुदेष्णा नांवाच्या राणीजवळ दासीचें काम करण्यास राहिली.

याप्रमाणें सेवाकर्मांत दहा महिने गेले. द्रौपदी नित्य सुदेष्णेची वेणीफणी करून तिची मर्जी संपादित असे. या सुदेष्णेला कीचक

या नांवाचा एक भाऊ होता. त्याला एकशेंपांच बंधु होते. त्यांना अनुकीचक असें ह्मणत. कीचक हा महा चांडाळ होता; पण त्यानें त्रिगर्तांपासून विराटाचें संरक्षण केलें असल्या कारणानें विराटानें त्याला आपलें सेनापतित्व दिलें होतें व त्यामुळें विराटाच्या दरबारांत कीचकाचें अतिशय वजन होतें.

एकेसमयीं तो दुष्ट कीचक सुदेष्णेच्या मंदिरांत आला असतां द्रौपदी त्याच्या दृष्टीस पडली. तिचें लावण्य पाहून कीचक मोहित झाला. त्यानें सुदेष्णेजवळून तिची माहिती मिळविली. ती सैरंध्री आपल्या बहिणीची दासी आहे हें समजतांच कीचकानें मोठें दुःख व्यक्त केलें. अशा प्रकारची सुंदर स्त्री दासीकर्म करण्यास योग्य नव्हे असें त्यानें तेथेंच उद्गार काढून द्रौपदीची फार प्रशंसा केली. कोंबडीला गट्ट करण्यास सांपडावें ह्मणून लांडग्यानें तिची जशी स्तुति करावी त्याप्रमाणेंच कीचकाच्या प्रशंसेंत मतलब आहे हें ओळखून द्रौपदी लागलीच तेथून उठून आपल्या मंदिरांत जाऊन बसली.

कीचकाला तिच्याविषयीं अभिलाष उत्पन्न झाला होता. तो समय साधून द्रौपदीच्या मंदिरांत गेला, आणि तिला ह्मणाला, " सैरंध्री ! अशा नीच स्थितींत राहण्यास तूं योग्य नाहींस. रंभा, उर्वशी यां-सारख्या स्वर्गांगना तुझ्या दासी शोभतील. तूं जर माझा स्वीकार करशील तर मी आपल्या सर्व स्त्रियांसहवर्तमान तुझा चाकर होईन. तूं आपल्या सौंदर्यजाळ्यामध्यें माझें मन माशाप्रमाणें पकडलें आहेस. तुझ्या मुखकमलावर माझे नेत्र भृंग्याप्रमाणें गुंजारव करीत आहेत. तूं सर्व स्त्रीजातीची स्वामिनी आहेस. मला अभय देऊन पदरांत घे. मी एक क्षणभरही तुला विसरणार नाहीं. "

कीचकाच्या मोहास भुलून जाण्याला ती द्रौपदी कांहीं कोणी सामान्य, ग्राम्य स्त्री नव्हती. ती यज्ञाच्या अग्नीमधून उत्पन्न झाली

होती. ती साक्षात् भवानीच्या अंशानेंच भूलोकीं अवतीर्ण झाली होती. ती सनातनधर्म जागत होती. धर्मशिक्षणाच्या योगानें तिची मति अलंकृत झालेली होती. पापी कीचकाची भ्रष्ट विनवणी ऐकतांच त्या महान् साध्वीनें त्याला सांगितलें, " हे पापतत्पर दुरात्म्या, माझ्या नादीं लागून तूं आपला नाश करून घेऊं नको. परस्त्री आणि परधन यांचा अभिलाष करणाऱ्याचें मरण जवळच ओढवलें आहे असें समजावें. मी तुला सेवाकर्म करणारी दासी वाटते; पण मी दासी नाहीं. माझे पांच गंधर्व भ्रतार आहेत. जो कोणी पामर माझ्याविषयीं दुष्ट भावना धरील त्याला ते गंधर्व एका क्षणांत ठार करतील. तूं स्वधर्माचा त्याग करून आडमार्गांत शिरत आहेस; पण या योगानें तूं अनर्थांत पडशील. ज्या गोष्टीनें थोर अनर्थ ओढवणार आहे, ज्या गोष्टी कुलसंहारास कारणीभूत होणाऱ्या आहेत, त्या गोष्टीपासून लोक दूरच राहतात. स्वतःच्या कल्याणावर नजर देऊन जे जन समर्थाशीं विरोध करतात त्यांस अपायनदींत बुडून मरण्याचा प्रसंग येतो. याकरितां तूं येथून चालता हो. "

द्रौपदीनें पुष्कळ उपदेश केला; पण त्यामुळें भानावर न येतां तो कीचक आपलीच प्रौढी गाऊं लागला. तो ह्मणाला, " सैरंध्री, तूं माझा पराक्रम जाणत नाहींस. मी खवळलों म्हणजे कोणासही आटपणार नाहीं. सर्व राजेलोक माझ्या शब्दाधीन आहेत. तूं ज्या विराटराजाच्या पदरीं आहेस तो विराटही माझ्या अधीन आहे. माझ्या सामर्थ्यावरच त्याचें राजपद अवलंबून आहे. माझ्या पाठीवर माझे एकशें पांच बंधु आहेत. भीम किंवा मारुती यांसारख्या प्रचंड वीरांना मी एका क्षणांत जिंकीन असें माझें सामर्थ्य आहे. मी तुझ्या पांची गंधर्वांना अर्धक्षणांत मारून टाकीन. तूं मला माळ घाल. "

कीचकाची मूर्खपणाची इच्छा जाणून द्रौपदी बोलली, " तूं मोठा

पराक्रमी आहेस असें तुला वाटत असेल; पण कोल्हा कितीही सामर्थ्यवान् झाला तरी त्याला सिंहकन्यका कशी प्राप्त होईल? राजहंसाला योग्य असलेला भाग कावळ्याला कसा लाभेल? तूं जर मला स्पर्श करण्याची इच्छा धरशील तर दीपाला आलिंगन देणाऱ्या पतंगाप्रमाणें तुझी स्थिति होईल. तुला जर कांहीं शहाणपणा असेल तर तूं येथून निघून जावेस हेंच बरें. श्रीमंताचें, सामर्थ्यवानाचें पोर झालें ह्मणून तें का महापुरांतून चालत जाईल काय? मनुष्य कितीही पराक्रमी झाला ह्मणून तो काय आकाशांतील सूर्यमंडळाला मिठी मारून दाखवील? तुला मी सौंदर्यसंपन्न दिसते म्हणूनच तूं माझ्या नादीं लागला आहेस; पण मी तुला सांगून ठेवितें कीं, रत्नाचे ढीग समजून तूं प्रज्वलीत निखाऱ्याचे ढीग भरूं नकोस. तुझें चित्त भ्रमित झाल्यामुळें तूं हार समजून सर्पच गळ्यांत बांधीत आहेस. विष प्राशन करून त्याची प्रचीत पाहण्यास कोणी कधीं तरी जगला आहे काय? माझा अभिलाष धरणारास अशीच कठीण अवस्था प्राप्त होईल."

द्रौपदीचें हें भाषण ऐकून कीचक आश्चर्य पावला. ती तशी वळणार नाहीं असें जाणून तो मंदबुद्धि कीचक तेथून सुदेष्णेच्या मंदिरांत गेला. आपल्या बहिणीच्या सहाय्यानें सैरंध्रीला वश करावें या हेतूनें तो सुदेष्णेला ह्मणाला, "तूं नानाप्रकारें बोध करून सैरंध्री माझी भेट घेईल असें कर. तूं जर या कामीं मला सहाय्य करणार नाहींस तर मी प्राणत्याग करीन."

कीचकाचा हट्ट पाहून सुदेष्णेनें त्याचें सांत्वन केलें. त्याची व सैरंध्रीची एकांतांत गांठ घालून देण्याबद्दल सुदेष्णेनें कीचकाला वचन दिलें. त्यामुळें समाधान पावून कीचक आपल्या मंदिरांत निघून गेला.

सुदेष्णेनें सैरंध्रीला कीचकाच्या मंदिरांत पाठविण्याची योजना केली. रात्र होतांच तिनें सैरंध्रीस हांका मारून सांगितलें कीं, " आज तूं अन्न घेऊन कीचकाच्या मंदिरांत जा. " सुदेष्णेची विपरीत आज्ञा ऐकून सैरंध्री बोलली, " आपण हें काम अन्य कोणास सांगा. मी तेथें जाणें धोक्याचें आहे. खेरीज मी आपली दासी आहे. मी कोणत्याही अन्य पुरुषाची सेवा करणार नाहीं अशी माझी अट आहे. "

द्रौपदीच्या भाषणाचा कांहींच विचार न करितां सुदेष्णेनें तिला आपली आज्ञा पाळलीच पाहिजे असें निक्षून सांगितलें. सुदेष्णेनें पाठविलेल्या दासीचा कीचक अपमान करणार नाहीं असें सांगून तिनें तिची समजूत घालण्याचा यत्न केला; आणि तिच्या हातांत अन्न देऊन तिनें तिला कीचकाकडे पाठवून दिलें.

द्रौपदी अति दुःखित झाली. ती अन्न घेऊन कीचकाच्या मंदिराकडे चालली असतां तिचे डोळे पाण्यानें भरून आले. आपलें संकट जाणून ती मनामध्यें श्रीकृष्णाचें ध्यान करूं लागली. आपल्या पातिव्रत्यामुळें दुष्ट कीचकाची शक्ति क्षीण होईल असा तिला आत्मविश्वास उत्पन्न झाला. तिनें जातां जातां सूर्याचें स्तोत्र जापिलें. द्रौपदीची प्रार्थना जाणून सूर्यानें तिचें संरक्षण करण्यास गुप्तपणानें एक राक्षस पाठवून दिला.

द्रौपदी मंदिरांत शिरतांच कीचक हास्यमुख करून आणि तिच्या सन्निध येऊन बोलला, " हे सैरंध्री ? हा माझा महाल किती सुशोभित केला आहे पहा. हा सर्व शृंगार तुझ्याकरितां आहे. " असें बोलून त्या चांडाळानें द्रौपदीचा हात धरला. त्या साध्वीनें त्याला तसाच धक्का दिला; त्याचवेळेस गुप्त राक्षसानें तिच्या धक्क्याबरोबरच धक्का देऊन कीचकाला धरणीवर पाडिलें. तो सावध होऊन उठला ह्मणजे

आपला छळ करील या भीतीनें ती साध्वी राजाश्रय करण्याकरितां विराटसभेकडे धावली. तिच्या मागोमाग कीचकही धावला.

त्यावेळीं विराटराजा सर्व सभासदांसहवर्तमान सभेमध्यें बसला होता. कंक व बल्लव हेही सभास्थानींच होते. द्रौपदी धांवत धांवत सभास्थानीं आली तोंच तिला कीचकानें गाठलें. त्यानें लागलीच तिचे मोकळे केस ओढून भरसभेंत तिला लत्ताप्रहार केला. तें कृत्य पाहतांच भीमाचे डोळे रक्तासारखे लाल झाले. तो दांत ओंठ चावूं लागला. तो एकदम उठून उभा राहिला आणि तेथल्या तेथेंच कीचकाचा प्राण घेण्यास तयार झाला.

भीमाचा तो बेत ओळखून धर्मराजानें त्याला खूण करून कीचकवधाची ती वेळ नव्हे असें सुचविलें. धर्माच्या खुणेनें भीमसेनास राग येऊन तो धर्मावरच क्रुद्ध झाला. पण उपयोग काय? कितीही त्वेष आला असला तरी पितृतुल्य असलेल्या वडील बंधूची आज्ञा पाळणें हेंच आपलें कर्तव्य आहे असें जाणून भीमाला आपला राग गिळावा लागला. अंकुशानें जसा हत्ती वळतो; मंत्रप्रभावानें जसा महाभुजंग स्वस्थ होतो त्याचप्रमाणें तो खवळलेला भीमसेन धर्मवाक्यामुळें शांत होऊन खालीं बसला. कीचकाचा वध केव्हां व कोणत्या प्रकारें करणें इष्ट आहे हें भीमाला समजावून देण्याकरितां धर्मराजा अन्योक्तीनें बोलला, “ भलत्याच ठिकाणीं वृक्ष तोडणें रास्त नव्हे. शेकोटी करण्याकरितां लांकडें पाहिजे असलीं तरी उत्तम वृक्षाचें संरक्षण करून कंटकतरूंचीच आकटी पेटवावी. लांकडें फोडावयाचीं तीं मनुष्यांना पीडा होणार नाहीं अशा एकाकडेला जाऊनच फोडलीं पाहिजेत. ”

धर्माच्या भाषणांतील गुप्त अर्थ भीमानें जाणून तो स्वस्थ राहिला. कंक व बल्लव स्वस्थच आहेत हें पाहून द्रौपदी घाबरी झाली. तिचे

डोळे पाण्यानें भरून आले. आपले भ्रतार समक्ष पहात असतां कीचकानें आपणास लाथ मारिली हें ध्यानांत आणून द्रौपदी ह्मणाली, “ माझे पांच गंधर्व गुप्तपणें आकाशांत संचार करीत असून या सूतपुत्रानें मला लाथ मारली तरी ते अद्याप स्वस्थच आहेत त्या अर्थी त्यांचा पुरुषार्थ नष्ट झालासें वाटतें. ” इतकें बोलून ती विराटराजाला बोलूं लागली, “ राजा, तूं तरी हा अन्याय पाहून स्वस्थ कसा बसतोस ? राजा, तुझ्या सभेंत न्यायान्यायाचा विचारच नाहीं वाटतें ? या सभेंतील सर्व सभासद आपणास ज्ञानी ह्मणवितात आणि हा एवढा अन्याय पाहून ते स्वस्थच बसतात याचें आश्चर्य वाटतें. ”

यावर कंकानें उत्तर केलें, “ सैरंध्री ! तुझे पांची गंधर्व मोठ्या संकटांत पडले असावेत असें वाटतें. कीचकाच्या भिडेनें हा राजा विराटही मौन धरूनच बसला आहे. तरी पण तूं घाबरूं नको. न्यायान्याय पहाण्याला सर्वसाक्षी परमात्मा समर्थ बसला आहे. ज्यानें विपरीत वासना धरिली त्याचा मृत्यु जवळ आला आहे हें निश्चित होय. तूं येथून सुदेष्णेच्या मंदिरांत जाऊन तिला हें सर्व वृत्त कथन कर. ”

कंकाच्या सूचनेप्रमाणें द्रौपदी सुदेष्णेकडे गेली. तिचें दुःखद वर्तमान ऐकून सुदेष्णेनें तिचें सांत्वन केलें. कीचकाला दंड करण्याबद्दल सुदेष्णेनें तिला वचन दिलें. नंतर ती साध्वी आपल्या स्वतः-च्या मंदिरांत गेली. कीचकरूपी चांडालाचा आपणास विटाळ झाला ह्मणून तिनें स्नान करून कृष्णनामाचा जप केला. कीचकाचा वध कसा होईल या विचारांनीं तिचें मन व्यापून गेलें. रात्र होऊन सर्वत्र सामसूम झाल्यावर द्रौपदी एकटीच जागी राहून गुप्तपणें भीमाकडे गेली. यावेळीं भीम झोपेंत होता. त्याला जागें करून ती ह्मणाली,

" हे महापराक्रमी भीमा, दुर्जनांनीं मला कसें गांजलें हें तुह्मीं प्रत्यक्ष पाहिलेंना ? व्यास, नारदांचा उपदेश न जुमानतां या धर्मराजानें द्यूत खेळून आपणा सर्वांवर संकट आणलें आणि कीचकानें मला लाथ मारिली तरीही तो धर्मराजा स्वस्थच आहे हें आश्चर्य नव्हें काय ? ज्याच्या पंक्तीला असंख्य ब्राह्मण भोजन करावयाचें, ज्याच्या चरणावर असंख्य राजांचे माथे नम्र व्हावयाचे तो धर्मराजा दीन होऊन कंकभट झाला आहे आणि त्याला विराटाची सेवा करावी लागत आहे हें माझेंच दुर्दैव नव्हें काय ? ज्यानें हिडिंब, बकासूर इत्यादि राक्षसांना एका क्षणांत यमलोकीं पाठविलें; आपल्या भुजबळानें पर्वत उपटून त्या ठिकाणीं समान भूमी करण्यासही जो समर्थ आहे असा भीमसेन विराटाचा आचारी बनून कणीक तिंबण्यांतच गुंग झाला आहे हें माझेंच दुर्दैव नव्हें कां ? ज्यानें खांडववन देऊन अग्नीला तृप्त केलें, ज्यानें आपल्या शरसंधानानें देवांनाही फजीत केलें तो धनंजय बृहन्नटा होऊन अंतःपुरांतील स्त्रियांना गाणें, नाचणें शिकवीत बसला आहे हें माझेंच दुर्भाग्य म्हणावयाचें ! नकुळ गुराखी बनला आहे, सहदेव अश्वपाळ झाला आहे, आतां या द्रौपदीनें काय करावें? मी द्रौपदी प्रत्यक्ष श्रीकृष्णाची भगिनी आहे. पांचाल राजाची मी कन्या आहे, पंडुराजाची मी स्नुषा आहे, पांडवसिंहांची मी पत्नि आहे; असें असतां कीचकानें बेफाम होऊन मला लाथ मारावी आणि तुह्मीं सर्वांनीं स्वस्थ बसावें हें तुह्मांस शोभतें काय? यापेक्षां ही द्रौपदी मेली तर बरें नाहीं का होणार ? तुह्मी जिवंत असून कीचकाच्या लाथा खाण्यास या द्रौपदीनें जगण्यांत अर्थ कोणता ? "

असें बोलत असतां द्रौपदी रडूं लागली. तिचे दुःखाश्रु पाहून भीमाचें अंतःकरण द्रवलें. तोही रडूं लागला. त्याला अतिशय त्वेष उत्पन्न झाला. द्रौपदीचें समाधान करण्याकरितां तो ह्मणाला, " द्रौपदी;

तूं शोक करूं नको. मी एका क्षणांत त्या दुष्ट कीचकाचा निःपात करतों. कीचकानें ज्यावेळीं तुला लत्ताप्रहार केला त्याचवेळीं मी त्याचा पाय तोडला असता; पण धर्मराजानें आपण प्रकट होऊं म्हणून संकेत करून माझें निवारण केलें. यामुळेंच त्या समयीं कीचक जीवंत राहिला. द्रौपदी, तूं थोडे दिवस दम धर. धर्मराजाच्या प्रतिज्ञेप्रमाणें आपला अज्ञातवास संपण्याला आतां काय तो पंधराच दिवस अवकाश आहे. ”

भीमाचें हें भाषण चाललें असतां द्रौपदी सारखी रडत होती. भीमानें तिला पोटाशीं धरून तिचे डोळे पुसले. त्यानें कीचकवधाची प्रतिज्ञा केली. द्रौपदीनें कीचकाला भुलवून चित्रशाळेंत आणावें म्हणजे त्या ठिकाणीं गुप्तपणें आपण त्याचा नाश करूं असें भीमानें ठरविलें आणि द्रौपदी तेथून उठून आपल्या बिऱ्हाडीं गेली.

नंतर कांहीं काळानें कीचक आपण होऊनच द्रौपदीच्या मंदिरांत गेला. तिला सद्भाषणानें वश करावें या मतलबानें तो तिला म्हणाला, “ सैरंध्री ! मी तुला मारलें त्याची क्षमा कर. मी तुझा दास आहें. मी तुला शरण आलों आहें. तूं माझा स्वीकार कर. मी सर्व राजांत श्रेष्ठ आहें. माझा पराक्रम अनुपम आहे. पराक्रमी कौरव-पांडव यांना ठार मारून मी तुला हस्तनापुराची स्वामिनी करीन. ज्याच्याजवळ तूं न्याय मागितलास तो विराट या कीचकापुढें केवळ घुंगुरटें आहे. तूं मला माळ घाल म्हणजे अनुपम पराक्रमी व वैभवसंपन्न असा हा कीचक तुझा केवळ गुलाम होऊन राहणार आहे. ”

असें बोलून तो तिच्या पायां पडूं लागला. त्याच्या म्हणण्यास आपली मान्यता दर्शवून द्रौपदी त्यास म्हणाली, “ आतांपर्यंत मी आपली केवळ परीक्षा पाहिली. आतां आपणास माझी इतकीच विनंति आहे कीं, आपला हा सर्व वृत्तांत आपण अगदीं गुप्त ठेवावा.

राजाराणीला यांतील एक अक्षरही कळून उपयोगी नाहीं. मी एकटी चित्रशाळेमध्यें गुप्तपणें जाऊन तेथें आपली वाट पहात बसते. आपण एकटे तेथें येऊन मला दर्शन द्यावें ह्मणजे मी आपणास धन्य समजेन."

विषयमोहानें मूढ बनलेल्या कीचकास द्रौपदीचें सर्व भाषण खरें वाटलें. तो आनंदप्राप्तीच्या आशेनें हर्षभरित झाला. त्यानें चित्रशाळेंत येण्याचें द्रौपदीस वचन दिलें. इतका प्रकार होऊन दोघांनीं एक दिवस नेमस्त केला व द्रौपदीनें तो सर्व मजकूर भीमास कळविला.

अलीकडे कीचक सैरंध्रीशीं वरचेवर एकांत करतो हें जाणून विराटानें त्याला उपदेश केला कीं, " तूं त्या सैरंध्रीचा नाद सोड. तूं तिचा छळ चालविला आहेस पण त्याचा परिणाम चांगला होणार नाहीं. तिचे पांच गंधर्व तुझा घात केव्हां करतील याचा नेम नाहीं. आजपासून सैरंध्रीचें नांव सोडण्याबद्दल तूं शपत घे. सीतेचा छळ करून रावणाचें काय झालें तें ध्यानांत आण." विराटाच्या भाषणावर कीचकानें स्पष्टपणें सांगितलें कीं, " रावणानें सीतेकरितां आपलीं दहा मस्तकें अर्पण केलीं त्याप्रमाणें द्रौपदीकरितां मी एक मस्तक अर्पण करणें केव्हांही योग्यच होय."

चित्रशाळेमध्यें जाण्याकरितां जो दिवस ठरला होता त्या दिवशीं कीचकानें नाना अलंकार धारण केले. त्यानें आपलें सर्व शरीर सुगंधित अत्तरांनीं माखून टाकलें. त्या दिवशीं तो फारच शोभायमान दिसूं लागला. रात्र लौकर व्हावी ह्मणून तो सूर्याला अस्ताचलास लौकर जाण्याबद्दल आज्ञा करूं लागला. आपला डामडौल बरोबर साधला आहे कीं नाहीं हें समजण्याकरितां तो आपलें स्वरूप वरचेवर आरशांत पाहूं लागला. नेहमींपेक्षां आपलें सौंदर्य आज विशेष खुलून दिसत आहे त्याअर्थी द्रौपदी आपल्याला भुलेल या भावनेनें तो आनंदित झाला. दिवा जाण्याच्या समयीं त्याचें तेज जास्त प्रकाशित होतें

त्याप्रमाणें आपल्या सौंदर्याची अवस्था आहे हें त्या पामराच्या ध्यानांतही आलें नाहीं.

मध्यरात्रीचा सुमार झाला असें पाहून तो नीच कीचक चित्र-शाळेकडे निघाला. द्रौपदी आणि भीम यांनीं ठरविल्याप्रमाणें चित्र-शाळेमध्यें भीमसेन द्रौपदीच्या वेषानें अंधारांत आधींच येऊन बसला होता. चित्रशाळेंत शिरल्यानंतर कीचक द्रौपदीला पाहूं लागला. त्याठिकाणीं यावेळीं अंधार असल्याकारणानें त्याला कांहींच दिसेना. क्षणभर थांबून त्यानें आपली दृष्टि स्थिर केली. तो चाचपत चाचपत पुढें गेला तों त्या ठिकाणीं एका कोपऱ्यांत द्रौपदीच बसली आहे असें त्यानें ओळखलें. कीचक कामानें धुंद झाला होता. भीम-सेन संतापानें तापला होता. द्रौपदी समजून आपण मत्तगज त्या भीमरूपी नरकेसरीपुढें आयतेंच चालून जात आहों हें न समजून कीचक मधुरवाणीनें बोलला, " सैरंध्री, तुझ्यासारखी स्त्री त्रैलोक्यां-तही सांपडणार नाहीं. तुझ्या अटीप्रमाणें येथें मी आलों आहे. येथील अट पूर्ण झाल्यानंतर तूं माझ्या मंदिरांत चल. तुझ्याकरितां मी अपूर्व तयारी करून ठेविली आहे. तूं मला माळ घालण्यास कोणाचीही भीति धरूं नकोस. मी तुझ्या पांची गंधर्वांचा नाश करून तुला निर्भय करीन. अंधारांत तुला माझें सौंदर्य दिसत नाहीं म्हणूनच तूं अद्याप दूर आहेस. सुंदरी, तूं माझ्याशीं चार मृदु शब्द बोल म्हणजे मी आपल्याला धन्य समजेन."

कीचकाचें हें भाषण ऐकतांच भीमसेन स्वर बदलून हळूच म्हणाला, " मला अंधारांत कांहीं दिसत नाहीं. आपणच पुढें येऊन मला आलिंगन द्यावें."

इतकी सूचना मिळतांच विषयानें भ्रमित झालेला कीचक पुढें सरला. आलिंगन देण्याकरितां त्यानें आपले हात पुढें केले तों भीमानें

तेच हात धरून जोरानें जमिनीवर आपटले. तो प्रकार पाहून कीचक ह्मणाला, " सैरंध्री ! हें काय ? तुं अशाप्रकारें मला अखेर निराश करणार काय ? " इतकें बोलून तो दुष्ट सरसावून पुढें गेला तोंच भीमानें त्याला गुद्धा लगावला. आपल्याला द्रौपदीनें फसाविलें अशी कीचकाची खात्री झाली. आपल्यापुढें द्रौपदी उभी नसून तिचा एखादा गंधर्वच प्रगट झाला आहे असें वाटून कीचकही मल्लयुद्धास तयार झाला. पर्वतावर पर्वत आदळावेत त्याप्रमाणें ते एकमेकावर चाल करूं लागले. एकमेकांना मुष्टिप्रहार करून ते दोघे परस्परांचा प्राणनाश इच्छूं लागले. सुग्रीव आणि वाली यांच्याप्रमाणें ते एक-मेकांना लत्ताप्रहार करूं लागले. कीचकही सामान्य योद्धा नव्हता. त्यानें दोन घटका अपूर्व कौशल्य दाखवून भीमाचें कांहीं चालूं दिलें नाहीं. अखेर भीमसेनानें त्याला जमीनीवर लोळविलें. त्याची मान आणि पाय धरून भीमानें त्याला लाकडाप्रमाणें मोडला आणि त्याचे दोन तुकडे केले. त्याचे हात, पाय, मान अलग करून भीमानें त्याच्या पोटावर त्या सर्वांचा ढीक रचला. त्यावेळीं द्रौपदीही तेथेंच होती. कीचकाचा वध होतांच भीमानें चुडी पेटविली आणि द्रौपदीला कीचकाचे तुकडे दाखवून तो तेथून चालता झाला. द्रौप-दीनें लागलीच आरडा ओरड करून सेवकांना जागें केलें. कीचका-च्या हाडामांसाची मोट पाहून सर्व सेवक आश्चर्यभरित झाले. आपल्या गुप्त गंधर्वांनीं प्रगट होऊनच कीचकाचा वध केला असें द्रौपदी ओरडून सांगूं लागली. हां हां ह्मणतां ही बातमी सर्व शहरभर पसरली. कीचकाचा घात झाला हें कळतांच त्याचे एकशें पांच बंधु तेथें धावून आले. विराट व सुदेष्णा हेही घाईघाईनें चित्रशाळेंत येऊन पोंचले. सैरंध्रीमुळेंच कीचकाचा नाश झाला हें जाणून ते एकशेंपांच अनुकीचक सैरंध्रीस शोधूं लागले. यावेळीं सैरंध्री एका

खांबाच्या आड उभी होती. ती दृष्टीस पडतांच अनुकीचकांनीं तिला केस धरून ओढली. सैरंध्रीमुळेंच कीचकाचा नाश झाला तेव्हां कीचकाच्या प्रेतासमवेत सैरंध्रीला जिवंत जाळणेंच इष्ट आहे असें त्यांनीं ठरविलें. त्यांनीं लागलीच कीचकाचें प्रेताबरोबर सैरंध्रीलाही ओढीत ओढीत चिताभूमीकडे चालविलें.

आपला आतां यज्ञ होणार हें जाणून ती दीन साध्वी घाबरी झाली. ती कृष्णाचें स्मरण करून आपल्या पांची भ्रतारास हांका मारूं लागली. चित्रशाळेंत काय हकीकत घडते याच्या कानोशावर भीमसेन टपूनच होता. द्रौपदीचा करुणास्वर कानीं पडतांच भीमानें वेष पालटला आणि वायुवेगानें धावत जाऊन तो चिताभूमीवर प्राप्त झाला. त्यानें आपल्या पराक्रमानें सर्व अनुकीचकांना ठार करून सती द्रौपदीचें संरक्षण केलें.

विराटानें सर्व कीचकांचा दहनविधि करविला. सर्व मंडळी विस्मय पावून आपापल्या ठिकाणीं निघून गेली. विराट व सुदेष्णा यांच्याबरोबर द्रौपदीही राजवाड्यांत परत आली. सैरंध्री ही कोणी कृत्या आहे असें ठरवून विराटानें तिला हाकून देण्याविषयीं सुदेष्णेला सूचना केली. द्रौपदीनें तिच्या जवळून कांहीं मुदत मागून घेतली; आणि तें स्थान सोडण्याचें पतकरिलें. सुदेष्णेनें तिची विनंति जाणून तेवढी मुदत दिली. त्या मुदतींतच अज्ञातवासाचें वर्ष पूर्ण होऊन पांडव प्रगट झाले. आपण जिला सैरंध्री समजत होतो ती प्रत्यक्ष द्रौपदीच आहे असें प्रत्ययास येतांच विराट व सुदेष्णा हे दोघेही द्रौपदीच्या भजनीं लागले.

अज्ञातवास संपल्यानंतर पांडवांनीं दुर्योधनाजवळ आपल्या राज्याचा वाटा मागितला. युद्धावांचून एक पाउलभर भूमी देण्यासही दुर्योधन तयार होईना. तेव्हां नाइलाज समजून पांडवांनीं

कौरवांशीं युद्ध केलें. द्रौपदीच्या पातिव्रत्याच्या जोरानें पांडव यशस्वी झाले. वस्त्रहरणाच्या वेळीं दुःशासनानें द्रौपदीची वेणी ओढली त्या वेळेपासून तिनें केस बांधले नव्हते. दुःशासनाच्या रक्तानें भरलेल्या हातांनीं द्रौपदीची वेणी घालण्याबद्दल भीमाची प्रतिज्ञा होती. साध्वी द्रौपदीच्या प्रभावानें भीमाची प्रतिज्ञा शेवटास गेली. कौरवांच्या बाजूला अनेक बलाढ्य योद्धे होते; त्यांचें सैन्य पांडवांच्या दीडपट होतें. प्रसंगीं श्रीकृष्णाचाही समाचार घेण्यास समर्थ अशा वीर महावीरांचें दुर्योधनाला सहाय्य होतें. ज्यांच्यापुढें हरिहरांचेंही कांहीं चालावयाचें नाहीं अशाप्रकारच्या शस्त्रास्त्रानें कौरववीर संपन्न होते; पण त्यांनीं द्रौपदीला छळल्याकारणानें त्यांची शक्ति क्षीण झाली. साध्वीछलाच्या पापानें त्यांचें तेज मंद होऊन पांडवांकडून त्यांचा निःपात झाला. सर्व सैन्याचा नाश होऊन दुर्योधनाचें व भीमाचें गदायुद्ध झालें गदायुद्धामध्यें दुर्योधन इंद्राचीही खबर घेण्याजोगता होता. त्यानें गदेच्या टोल्यानें भीमाला कित्येक वेळ मूर्च्छित केलें; पण तो द्रौपदीसतीच्या शापानें आधींच मेला असल्याकारणानें तो त्या गदायुद्धांत भीमाच्या हस्तें छिन्नभिन्न होऊन पडला.

त्या साध्वीच्या प्रभावानें पांडवांना वैभव प्राप्त झालें. धर्मराजाला अभिषेक होऊन पांडव छत्रचामरांचें अधिकारी बनले. सती द्रौपदीच्या शुद्ध, सत्वमय, पवित्र आचाराच्या पाठबळानें धर्मराजा आपली पत्नी साध्वी द्रौपदी व आपले चारी भाऊ यांसहवर्तमान आनंदानें हस्तनापुराचें राज्य करीत राहिला.

---

# ५ अनुसूया.



ष्टि उत्पन होण्याच्या पूर्वी सर्वत्र जलमय होतें. ईश्वराच्या इच्छामात्रेकरून हिरंण्यगर्भ अंड उत्पन्न झालें. पुढें त्यासच ब्रम्हांड असें नांव प्राप्त झालें. त्याच ब्रम्हांडाचीं दोन शकलें झालीं. तेथेंच ब्रम्हदेवाची उत्पत्ती झाली. परमेश्वरानें ब्रम्हदेवास सृष्टीची रचना करावयास सांगितलें. ब्रम्हदेवाला तसें सामर्थ्य नसल्यामुळें तो लीन होऊन परमात्म्याच्या मुखाकडे पाहूं लागला. ब्रम्हदेव हा परमात्म्याच्या नाभीकमळापासून उत्पन्न झाला असल्यानें परमात्मा त्याला आपला पुत्र समजत होता. आपला पुत्र सृष्टिरचना काण्याच्या कामीं विचारांत पडला आहे असें पाहून भगवानांनीं त्याला देदाचा उपदेश केला. वेदज्ञान होतांच ब्रम्हदेव सृष्टिरचना करण्यास समर्थ झाला. त्यानेंच चौदा भुवनांची रचना केली. पुरुषार्थ साधण्यास योग्य अशी सृष्टि उत्पन्न करण्याच्या हेतूनें ब्रम्हदेवानें प्रथमतः सात मानसपुत्र उत्पन्न केले. त्या सात पुत्रांत अत्रि या नांवाचा एक पुत्र होता. हा अत्रि मोठा तपोधन व ब्रम्हनिष्ठ होता. त्याची तपश्चर्या पाहून देवगणही त्याच्यापुढें लीन होत असत. तो सत्वगुणाचा महामेरु होता. अनुसूया ही त्या भगवान् अत्रि ऋषींचीच भार्या होय.

अनुसूया ही साध्वीच्या श्रेष्ठ आचारानें संपन्न होती. ती सौंदर्याची केवळ खाणच होती. त्याचप्रमाणें सद्गुणांच्या योगानें तिचें सर्व देहसौंदर्य पराकाष्ठेचें प्रकाशमान झालें होतें. ती पतिनिष्ठ होती. आपल्या पतीला आपलें दैवत समजून ती सदोदीत पतिसेवेंतच गंढलेली असे.

आपल्या पतीचें मनोगत जाणून ती नेहमीं अतिथीच्या ठिकाणीं ईश्वरभाव धरून त्याची पूजा करीत असे. दया हें सर्व धर्मांचें मुख्य मूळ आहे हें सनातन तत्व तिला पूर्णपणें समजलें होतें. कोणताही दीन याचक अनुसूयेच्या घरांतून निराश होऊन परत जाणें शक्यच नव्हतें. तिची पतिभक्ति पाहून सूर्यही तिला वचकत असे. आपल्या उष्ण किरणांनीं अनुसूयेला कदाचित् पीडा होईल म्हणून तो सूर्यनारायण तिच्यावर पडणाऱ्या किरणांतील उष्णता कमी करीत असे. याप्रमाणें वायु व अग्नि हेही अनुसूयेच्या भयानें आपापला आचार करण्यांत मंद झाले होते. अनुसूयेसारख्या पतिव्रतेच्या चरणस्पर्शानें भूमाता आपल्याला धन्य समजत असे.

अशा प्रकारच्या त्या सत्वमय साध्वीनें देवादिकांनाही अशक्य असें कृत्य करून दाखविलें. एके प्रसंगीं सतत दहा वर्षें अनावृष्टि होऊन सर्वत्र दुष्काळ पडला. अनेक जीव अन्न पाण्यावांचून तडफडून मरूं लागले. लोकांनीं दीन होऊन इंद्र, वरुण इत्यादि दैवतांचीं प्रार्थना केली. यज्ञाच्या योगानें संतुष्ट होऊन पर्जन्य पाडणाऱ्या इंद्राला प्रसन्न करण्याकरितां ब्राम्हणांनीं यज्ञयाग आरंभिले. कित्येकांनीं अनेक प्रकारचीं अनुष्ठानें केलीं; पण ईश्वराच्या कोपामुळें दुष्काळाची पीडा दूर होईना. प्राणिगणांची भयंकर तळमळ पाहून अनुसूयेचें मन कळवळलें. तिनें लागलीच आपल्या पतीची परवानगी मागीतली. परोपकार करून पुण्याची जोड करण्याच्या कामींही आपल्या पत्नीला आपली अनुज्ञा लागते हें पाहून भगवान अत्रि तिच्या पतिनिष्ठेमुळें प्रसन्नचित्त झाले. त्यांनीं तिला मंगलकारक आशिर्वाद देऊन दीनदुबळ्यांचे प्राण संरक्षण करण्याची आज्ञा केली. त्यासमयीं त्या साध्वीनें इंद्र, वरुण, अग्नि, वायु यांची मिनतवारी न करितां केवळ आपल्या पातिव्रत्याच्या सामर्थ्यानें व पति-

ध्यानाच्या बलानें फळें, मूळें, धान्यें व उदक निर्माण करून कित्येक जीवांचें संरक्षण केलें. त्या सतीचा प्रभाव पाहून सर्व देवगणांनीं तोंडांत बोटें घातलीं.

अनुसूयेचा अभ्युदय पाहून कर्माचें रिकामें बंड माजवून आढ्यता पावलेले ऋषिमुनि तिचा हेवा करूं लागले. त्यांनीं अनुसूयेच्या नाशाचा उपाय चालविला. तिचा दुष्टावा करणाऱ्या मुनींमध्येंच मांडव्य या नांवाचा एक महान् तपस्वी होता. तो मोठें उग्र तप करीत असे. तो एकांत वनांत एका मोठ्या झाडाखालीं एका पायावर उभा राही. आपले दोन्ही हात वर करून तो महाराज मांडव्य एका पायावर उभा राहून तप करीत असतां त्याच्या पाठीमागें कांहीं चोर येऊन लपले. त्या चोरांनीं राजाचें भांडार फोडलें होतें. त्यांना पकडण्याकरतां त्यांच्या मागोमाग राजदूत धावून आले. राजदूतांनीं त्या चोरांना झाडाचा आश्रय करतांना पाहिलें व त्यांनीं तस्करांना पकडलें. त्यांनीं मांडव्याचा आश्रय केला त्यावरून मांडव्य हा त्यांचा पुढारी असावा असें वाटून राजदूतांनीं मांडव्यासही धरिलें. मांडव्य हा कोणी तापसीवेषी चांडाल आहे अशी कल्पना करून राजानें त्याला शूलावर चढविण्याची आज्ञा केली. राजाज्ञेप्रमाणें सेवकांनीं मांडव्याला शूलावर चढविलें. त्या योगानें मांडव्याचा अंत व्हावयास पाहिजे होता; पण तो तपोधन असल्या कारणानें त्या मुनीनें योगबलानें आपला प्राण रक्षण केला. शूलावरच आपलें आसन स्थिर ठेवून तो सामर्थ्यवान मुनि अनुष्ठान करीत राहिला. रात्र होऊन अंधार पडला असतां त्या वाटेनें कोणा ऋषीची पत्नी चालली होती. अंधकारामुळें त्या ऋषिपत्नीला तो शूल दिसला नाहीं. चालत जात असतां त्या शूलास तिचा धक्का लागला. धक्क्यामुळें तो शूल हालून मांडव्याचें आसन चळलें. त्यामुळें तो मांडव्य मुनि रागावला. ती ऋषिपत्नी अनुसूयेची मैत्रीण होती.

ही गोष्ट मांडव्यानें जाणली. शूळास धक्का लावून आपल्याला ताप देणारी स्त्री अनुसूयेची मैत्रीण आहे हें ध्यानांत येतांच मांडव्य ऋषि खवळला. त्यानें त्या ऋषिपत्नीस शाप दिला कीं, " तूं सूर्योदय होतांच विधवा होशील. "

ऋषीचा शाप ऐकतांच त्या ऋषिपत्नीचें मन दचकलें. आपणाकडून चुकून अपराध घडला असें सांगून तिनें मांडव्याची प्रार्थना करून उःशाप मागितला. तिनें काकुळती येऊन त्याची बहुत प्रार्थना केली; पण मांडव्यास तिची दया आली नाहीं. कर्मयोगांतील अनुष्ठानें करण्यांत अभिमानग्रस्त झालेले लोक क्रोधवश होण्यांतच पुरुषार्थ मानतात. सर्व कर्मफलांचा भोक्ता जो परमेश्वर त्याच्या प्राप्तीकरितां कर्म करणाऱ्यांना कर्माभिमान सोडावा लागतो. कर्माचें कर्तृत्वपण आपणाकडे न घेतां विकारापासून अलिप्त राहणेंच ईश्वरप्राप्तीस जरूर आहे; ही गोष्ट विसरून कर्माभिमानी लोक अधिकाधिकच विकारवश होण्यांत मोठेपणा मानून खऱ्या परमार्थास मुकतात याच मासल्याचा मांडव्य ऋषि होता. त्याला ऋषिपत्नीची दया आली नाहीं. तो तिला उःशाप देईना; तेव्हां नाइलाज होऊन ती दीन अबला दुःख करीत तेथून आपल्या घरीं गेली. तिनें तें सर्व वर्तमान अनुसूयेला कथन केलें. ऋषीच्या उग्र शापानें आपणाला वैधव्य येणार ह्मणून ती अतिशय म्लान झाली. तिला सर्व जग ओस दिसूं लागलें. आपलें संकट हरण करण्याकरितां आपण एखादें व्रतादिसाधन करावें तर तसें करण्यास सवड राहिली नव्हती. आपलें संरक्षण करण्याकरितां आपण कोणत्या दैवतास हाका माराव्या; कोणाचें ध्यान करावें, कोणता मंत्र जपावा हें तिला कांहींएक समजेनासें झालें. ती अनुसूयेच्या तोंडाकडे पाहून नुसता अश्रुपात करूं लागली. रडून रडून तिनें आपले डोळे लाल

करून घेतले. तिची ती दुःखावस्था पाहून अनुसूयेला दया उत्पन्न झाली. मांडव्याच्या क्रोधाचा अनुसूयेनें धिःक्कार केला. त्याच्या शापापासून आपल्या सखीचें रक्षण करण्याविषयीं तिनें प्रतिज्ञा केली. तिनें आपल्या पातिव्रत्यधर्माला आपल्या मदतीस बोलाविलें. तिचा साध्वीधर्म, पतिनिष्ठा, सदाचार व हरिभक्ति हीं सर्व मूर्तिमंत तिच्यापुढें येऊन तिची आज्ञा मानण्यास तत्पर होऊन राहिलीं.

कांहीं झालें तरी मांडव्याची वाणी खोटी होणार नाहीं ही गोष्ट अनुसूया जाणत होती. त्या विप्रवर्याच्या वचनाकरितां यमराज ऋषिपत्नीचें कुंकू हिरावून नेऊं लागला असतां त्याला वाटेंत आडवावा तर तो विप्रशापाची सबब सांगून निघून जाणार हें तिला स्पष्टपणें समजत होतें. तेव्हां मांडव्याची वाणीही फुकट जाऊं नये आणि आपल्या सखीचेंही संकट टळावें अशी तिनें एक युक्ति योजली. तिनें मांडव्याच्या शापवाणीचा अर्थ लक्षांत आणला. त्याच्या शापाप्रमाणें सूर्योदय होतांच आपल्या सखीवर दुःखाचा डोंगर कोसळणार तेव्हां सूर्यालाच उगवूं दिलें नाहीं ह्मणजे सगळाच कारभार आटपला असें तिनें आपल्या मनाशीं योजिलें. तिनें आपल्या पातिव्रत्य व सदाचारादिकांच्या प्रभावानें सूर्यावर आपली सत्ता चालवून त्याची गती कुंठित केली. सूर्य उदयपराङ्मुख झाल्यानें ती रात्रच संपेना. दहा दिवसा इतका काळ लोटला तरी सूर्योदय होईना. हें पाहून सर्व देव व ऋषि आश्चर्यचकित् झाले. प्राणिमात्रांचे सर्व व्यवहार बंद पडले. कर्माचारी लोकांचीं सर्व धार्मिक कर्में खोळंबून राहिलीं. सूर्याच्या मार्गांत कोणी राक्षसांनीं विघ्न उत्पन्न केलें आहे कीं काय ह्मणून देवादिकांनीं शोध केला. ऋषिमुनींही अंतर्ज्ञानानें सूर्याच्या तशा स्थितीचें कारण शोधूं लागले. तेव्हां सर्वांना खरा प्रकार काय आहे तो कळून आला. त्यांनीं सूर्याची अनेक

प्रकारें समजूत करून व त्याला धीर देऊन आपला नेहमींचा क्रम चालू ठेवण्याविषयीं वारंवार सांगितलें; पण महापतिव्रता अनुसूया हिच्या आज्ञेचें उल्लंघन करण्यास तो सहस्रकिरण समर्थ झाला नाहीं. तेव्हां नाइलाज होऊन सर्व ऋषि व तपोधन मुनि देवगणांना पुढें करून अनुसूयेला शरण गेले. त्यांनीं तिच्या सखीस शुभप्रद आशिर्वाद दिले. ऋषि व देवगण यांच्या नम्रतेनें अनुसूया प्रसन्नचित्त झाली. त्या सर्वांची दीनावस्था ध्यानांत घेऊन त्या परमपतिव्रतेनें आपल्या प्रखर पातिव्रत्याच्या तेजानें मांडव्याच्या शापवाणीस दग्ध करून टाकलें. आपल्या मैत्रिणीचें सौभाग्य अढळ राहील अशाबद्दल खात्री झाल्यानंतर तिनें आपल्या सामर्थ्यानें सूर्याचा उदय करून दाखविला. अशाप्रकारें आपल्या सखीचें रक्षण केल्यामुळें जो तो त्या पतिव्रतेची व साध्वीव्रताची वाहवा करूं लागला.

वास्तविक पाहतां अनुसूया ही सत्वगुणाचीच पुतळी होती. सत्वगुणाच्या सामर्थ्यानेंच तिनें सूर्यावर आपला अधिकार चालविला. हें पुरतेपणी ध्यानांत न आणतां देवगण आपापल्या ठिकाणीं तिला जास्तच भिऊं लागले. अनुसूया एखाद्याला वरप्रदान देऊन आपला नाश करील, किंवा ती एका क्षणांत स्वर्गलोक आपल्या ताब्यांत घेऊन आपणांस स्थानभ्रष्ट करील अशा दहशतीनें सर्व देवगण एकवटून ब्रह्मदेव, विष्णु आणि शंकर यांना शरण गेले. त्यांनीं त्या देवांना अनुसूयेचें वृत्त कळवून आपलें मानसिक भय व्यक्त करून दाखविलें. अनुसूयेचें सत्व हरण झालें नाहीं किंवा अन्य उपायांनीं तिचा नाश झाला नाहीं तर आपणा सर्वांसच तिचें दास्यत्व करावें लागेल, असें जाणून ब्रह्मा, विष्णु व महेष हे देखील देवगणांच्या विनंतीस कबूल झाले. त्यांनीं संगनमत करून त्या पतिव्रतेचा सत्वभंग करण्याचा निश्चय ठरविला.

ब्रह्मा, विष्णु, महेश या तिघांनीं भिक्षुकाचे वेष धारण केले आणि ते तिघे याचक ह्मणून अनुसूयेच्या द्वारांत येऊन दाखल झाले. यावेळीं अनुसूयेचा भ्रतार अत्रिमुनी हा अनुष्ठानास गेला होता. आपल्या घरीं तीन अतिथी आले आहेत असें पाहतांच अनुसूयेला आनंद झाला. वेदांताच्या हव्यातशा गप्पा मारून आपल्या दारांत भिक्षेकरितां चालून आलेल्या भिकाऱ्यांच्या आईबापांचा उद्धार करणाऱ्या शाब्दिक विद्वानाप्रमाणें अनुसूया अनुदार नव्हती. तिला औदार्याचें प्रतिपादन करून लौकिक जोडावयाचा नव्हता. तिला औदार्याचें तत्व साधावयाचें होतें. तिनें त्या तिन्ही अतिथींचा सन्मान करून त्यांची इच्छा काय आहे ह्मणून विचारिलें. त्या त्रिवर्गांनीं तिला सांगितलें, " तुह्मी याचकांच्या मनकामना तृप्त करितां हें ऐकून आह्मी येथें आलों आहों. आह्मी अतिशय भुकेलों आहों. आपण आह्मांला इच्छाभोजन द्या. "

याचकांची इच्छा समजतांच त्या साध्वीनें कपाळाला आठ्या घातल्या नाहींत. ते तिघेजण गरीब असल्याबद्दल एखादें सर्टिफिकीट हजर करण्याबद्दल तिनें त्यांना अट घातली नाहीं. ते कोणीही व कसेही असले तरी आपल्या दारांत याचक ह्मणून आले आहेत एवढी गोष्ट तिला पुरेशी होती. तिनें लागलीच त्यांना स्नान करून येण्यास सांगितलें तेव्हां आपले स्नानादि विधि आटपले आहेत असें ते ह्मणाले. तें ऐकतांच तिनें त्यांना सोंवळें होण्यास सागून तीन पानें मांडलीं. ते तिघेजण आपापल्या पानावर स्थित झाले. अनुसूया अन्न आणण्याकरितां स्वयंपाकघरांत गेली. इतक्यांत त्यांनीं तिला बाहेर हांका मारिली. याचकांना काय पाहिजे आहे हें समजण्याकरितां ती तशीच बाहेर आली तेव्हां त्या त्रिवर्गांनीं तिला सांगितलें, " बाई, तुह्मी जेवणाची सर्व तयारी केली खरी, पण येवढ्यानें आमचें

मन संतोष पावणार नाहीं. तुह्मी स्वरूपानें फारच सुंदर आहां. तेव्हां तुह्मी आह्मांस नग्न होऊन अन्न वाढाल तरच आह्मी तुमच्या घरीं अन्न ग्रहण करूं. ही गोष्ट तुमच्यानें होण्याजोगी नसेल तर आह्मांस भोजनाची जरूर नाहीं. आह्मी विमुख होऊन तसेच उपाशी निघून जातों."

सामान्यतः पाहिलें असतां त्या विप्रवर्यांनीं अशी भलतीच विनंति करणें प्रशस्त नव्हतें; पण इतका विचार ते काय ह्मणून करतील ? त्यांना कोणीकडून तरी अनुसूयेस अडवावयाचें होतें. कांहींतरी अवघड अट घालून ती याचकांचा धिक्कार करील असें त्यांना घडवून आणावयाचें होतें. त्यांची ती भलतीच भावना जाणून अनुसूया विचारांत पडली. त्यांना निराश करून हाकून देणें ही गोष्ट तिच्या जिवावर आली. त्यांच्या इच्छेप्रमाणें नग्न होऊन अन्न वाढणें हेंही तिला पंचायतीचेंच वाटलें. अशी ती अडचणींत पडली. शेवटीं त्या महापतिव्रतेनें त्या अतिथींच्या इच्छेनुसार वागावयाचें असेंच ठरविलें. ती लागलीच स्वयंपाकघरांत गेली. तिनें आपलें वस्त्र बाजूस ठेविलें. हातामध्यें अन्नाचें भांडें घेऊन ती बाहेर येऊं लागली. सहजस्थितीनें परपुरुषाच्या दृष्टीस पडण्याला ती लाजूं लागली. स्वभावतःच तिचें पाऊल मागें ओढ घेऊं लागलें. इतक्यांत तिनें आपल्या पतीचें स्मरण केलें. तिनें आपल्या पातिव्रत्याला हाक मारली. तिनें त्या तिन्ही याचकांबद्दल बालभावना धारण केली. अज्ञान, तान्ह्या बालकापुढें नग्न होऊन वाढण्यास कांहींच हरकत नाहीं असें ठरवून ती सती त्याच स्थितींत बाहेर आली तों अत्यंत अद्भुत असा चमत्कार घडला. त्या पांतस्थांबद्दल तिनें जी भावना धरली तीच फलद्रूप झाली. तिची भावना ह्मणजे पतिव्रतेची भावना होय. साध्वीची भावना ह्मणजे समर्थाची अधिकार-संपन्न आज्ञाच होय. भगवद्भक्तांना कोणतीही इच्छा प्रगट करून दाख-

विण्याचें कारण पडत नाहीं. त्यांच्या मनांत जी इच्छा उत्पन्न होईल ती जाणून त्याप्रमाणें गोष्टी घडवून आणणें हें परमेश्वर आपलें कर्तव्य समजतो. त्याचप्रमाणें पतिनिष्ठ साध्वींची गोष्ट आहे. साध्वीचे चरण ज्या ठिकाणावरून जाऊं इच्छितात तें ठिकाणच परमेश्वर बनतो, यापेक्षां त्यांचा जास्त काय महिमा सांगावा. अनुसूयेनें आपलें वस्त्र सोडतांना त्या अतिथींबद्दल शिशुभावना धरून स्वतःला त्यांची माता कल्पिलें त्यासमयीं त्या पतिव्रतेच्या भावनेनुसार ते तिन्ही अतिथी लहान बालक होऊन पडले. अनुसूया बाहेर येतांच ते तिन्ही तान्हे बालक पाहून विस्मय पावली. तिनें लागलीच आपलें वस्त्र धारण केलें. इतक्यांत तीं तान्हीं मुलें रडूं लागलीं हें पाहून अनसूया एकेकास उचलून स्तनपान करवूं लागली. विष्णूच्या नाभीकमलापासून ज्याची उत्पत्ती झाली, ज्यानें आपल्या सामर्थ्यानें चौदाभुवनें निर्माण केलीं असा जगाचा उत्पन्नकर्ता ब्रह्मदेव अनुसूयेच्या स्तनपानानें समाधान पावला. जो पंचाननानें संपन्न आहे; ज्यानें मस्तकावर भागीरथी धारण केली आहे; पार्वतीसारखी जगन्माता ज्यानें अर्धांगीं धारण केली आहे, असा सृष्टीचा प्रलयकर्ता जो श्रीशंकर त्याला अनुसूयेला माता समजून तिचें स्तनपान करण्यांत धन्यता वाटली. ज्याच्या उदरांत अनंत ब्रह्मांडें वास्तव्य करितात; सात समुद्र व वडवाग्नि प्राशन करूनही ज्याची भूक भागत नाहीं, हिरंण्याक्ष, हिरण्यकशिपू शंखासुर, रावण, कंस इत्यादिकांना ज्यानें आपल्या दाढेंत पिष्ट केलें, ज्याचे चरणतीर्थ श्रीशंकरांनीं डोक्यावर धारण केले; ज्याला ब्रम्हदेव आपला पिता ह्मणवितो; ज्याच्या ध्यानांत शिव व भवानी हें तल्लीन असतात असा तो भक्तसंरक्षक भगवान विष्णु अनुसूयेच्या दुग्धधारा प्राशन करण्यांत पराकाष्ठेचें समाधान पावला. पतिव्रतेच्या स्तनपानानें कोणाचें समाधान होणार नाहीं ? ते तिन्ही देव त्या

साध्वीचें स्तनपान करून रडावयाचे थांबले. अनुसूयेनें लागलीच त्यांना पाळण्यांत नेऊन निजविलें. पाळण्याला झोका देऊन ती भाग्यवान साध्वी त्या पुत्रांना गाणीं ह्मणून निजवूं लागली.

इतका विधी होत आहे तों अत्रिमुनी आपल्या आश्रमांत आले. अनुसूयेचें गीत ऐकून व पाळण्याचे झोके पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. त्यांनीं आपल्या भार्येला त्यासंबंधानें प्रश्न केला. त्यांच्या पाठीमागें आश्रमांत जो प्रकार घडला तो त्या सतीनें आपल्या पतीला इत्थंभूत निवेदन केला. मुनीनीं ज्ञानदृष्टीनें अवलोकन करून सर्व कांहीं ओळखलें. पाळण्यामध्यें असलेले तिन्ही बालक देव आहेत हें जाणून मुनीनीं त्या बालकांना नमस्कार केला. मुनींच्या नमस्कारानें तिन्ही देव प्रसन्न झाले. त्यांनीं आपापलीं रूपें प्रगट करून अत्री व त्यांची पत्नी अनुसूया यांना दर्शन दिलें आणि ते तिघे ह्मणाले, " हे साधुवर्य अत्रिऋषि ! आपला जन्म धन्य आहे. या महान् पतिव्रतेसारखें रत्न आपणास लाभलें आहे तेव्हां आपलें भाग्य आह्मी काय वर्णन करावें. या सतीची अचल पतिनिष्ठा व साध्वीव्रततत्परता पाहून आह्मी प्रसन्न आहों. आपण हवा तो वर मागा ! "

देवांच्या सांगण्याप्रमाणें त्या दोघांनीं एक विचार करून त्या तिन्ही देवांना पुत्ररूपानेंच आपल्या घरीं वास्तव्य करण्यास सांगितलें. त्यांच्या इच्छेनुसार त्यांना जो पुत्र प्राप्त झाला तोच भगवान् दत्तात्रेय होय. ब्रह्मदेव चंद्र होऊन चंद्रलोकीं निघून गेला. शंकर दुर्वासरूपानें तीर्थाटणास निघून गेले. त्यांच्या अंशासह भगवान विष्णु दत्तात्रेय होऊन अनसूयेचा पुत्र होऊन राहिला. अशाप्रकारें आपल्या पातिव्रत्यप्रभावानें जिनें त्रयमूर्ति ईश्वरांनाही आपलीं तान्हीं बालकें बनविलीं त्या भाग्यवान्, पतिव्रता, जगन्माता अत्रिपत्नी अनुसूयेचा महिमा गाण्यास सहस्रमुखी शेषतरी समर्थ होईल काय ?

# ६ महान् सती दत्तकांता.



उत्तर देशामध्यें माहुर या नांवाचें गांव होतें. तेथें कोणी गोपीनाथ या नांवाचा ब्राह्मण राहत असे. तो सुखवस्तु गृहस्थ होता. त्याला खायलाप्यायला कांहीं कमी नव्हतें. त्याची पत्नी धर्मानुकूल व सती होती. पण त्या जोडप्यास सुख नव्हतें. त्यांना पुत्र होत असत; पण ते वाचत नसत. या कारणानें ते दोघे सदा उदास असत. एखादा तरी पुत्र वाचावा ह्मणून त्यांनीं दत्तात्रयाची बहुत आराधना केली. दत्तभक्ति आरंभल्यानंतर कांहीं काळानें त्यांना एक पुत्र झाला. तो दत्ताच्याच प्रसादानें झाला अशा भावनेनें त्यांनीं त्याचें नांव दत्त असेंच ठेविलें. तो मुलगा पांच वर्षांचा झाला. तेव्हां आपला मुलगा आतां वाचणार असें वाटून गोपीनाथाला फार आनंद वाटला. गोपीनाथ व त्याची स्त्री आपल्या मुलावर अत्यंत प्रेम करीत. दत्त पांच वर्षांचा होतांच गोपीनाथानें मोठ्या हौसेनें त्याचा व्रतबंध केला. दत्ताला बारावें वर्ष लागलें तेव्हां त्याचें लग्न करावें अशी गोपीनाथाला इच्छा उत्पन्न झाली. त्यानें कुलसंपन्न घराण्यांतील एक सुशील मुलगी शोधून काढून दत्ताचा विवाह केला. दत्ताची बायको विवाहाच्या वेळीं दहाअकरा वर्षांची होती. बारावर्षांच्या मुलाला अकरावर्षांची वधू पसंत करणें ही वस्तुतः चूक आहे असें कोणीही प्रतिपादन करील; पण ब्रह्मदेवानें जो नेमानेम ठरविला असेल त्याच्या विरुद्ध जाण्यास कोण समर्थ असणार ? मनुष्यांनीं आपल्या अकलेच्या घमेंडीवर वाटेल तशा योजना केल्या तरी परमेश्वराच्या ठरलेल्या सूत्रांत बदल करण्यास परमेश्वरभक्तांवाचून अन्य कोणीही

समर्थ नाहीं, ही गोष्ट निश्चित होय. आपण ज्यांना दगड समजून बाजूला टाकतो ते बुद्धिविहीन ठरलेले लोक साधुकृपेनें ज्ञानवान झालेले दिसतात; त्याचप्रमाणें आपण ज्यांना हुषार समजून त्यांच्या भावी स्थितीबद्दल मोठी आशा प्रगट करतों व त्यांच्या सुस्थितीबद्दल अति खटपट करतों ते पुढें मठ्ठ निपजल्याचेंही दाखले सांपडतात, यावरून वरील ईश्वरी नियमनाचा सिद्धांतच सत्य ठरतो.

दत्त व त्याची बायको हें समवयस्क जोडपें स्वरूपानें फार सुंदर दिसे. पांच चार वर्षें झाल्यावर तें जोडपें सोळा वर्षांचें झालें तेव्हां तर त्याची शोभा अपूर्व दिसूं लागली. तो मदनरतीचाच दुसरा जोडा आहे कीं काय असें लोकांना वाटत असे.

दत्ताच्या बायकोचें नांव सावित्री असें ठेविलें होतें. त्यांचें परस्परावर अतोनात प्रेम असे. एकमेकांपासून कोणी जरा दूर गेले कीं त्यांना करमत नसे. सावित्री जात्याच मोठी हुषार व बहुगुणसंपन्न होती. तिच्या मनावर सासरमाहेरच्या बालबोध आचारविचारांचा ठसा उमटलेला होता. अनुवंशिक संस्कारामुळें तिला पति या शब्दाचें महत्व समजलें होतें. आपलें सुख साधण्याकरितां आपल्याला पतीची अवश्यकता आहे अशी तिची अंतराविषयीं पोकळ कल्पना नव्हती. पतीचें सुख व आचारधर्म साधण्याकरितांच आपला जन्म आहे; पतिसेवेनेंच आपल्या जन्माचें सार्थक होणार आहे; पति हा देव असून त्याच्या ठिकाणची एकनिष्ठ भक्तीच आपलें खरें कल्याण करणारी आहे वगैरे धर्मपर गोष्टी तिच्या मनांत रुजलेल्या होत्या.

तें भाग्यवान् जोडपें आनंदानें कालक्रमणा करीत असतां मध्येंच त्यांचें दुर्दैव उभें राहिलें. दत्ताला कांहीं भयंकर व्याधि उत्पन्न होऊन तो आजारी पडला. रोग बरा व्हावा ह्मणून अनेक औषधोपचार केले तरी कांहींच गुण येईना. त्याला अन्नद्वेष झाला ह्मणून तो उपवासी

राहूं लागला. तें पाहून सावित्रीनेंही अन्नाचा त्याग केला. तिची आपल्या पतीच्या ठिकाणीं इतकी दृढभक्ति होती कीं ती पतीबरोबर औषधेंही प्राशन करीत असे.

अशा स्थितींत तीन वर्षें लोटलीं. दत्ताच्या प्रकृतीस कांहींच आराम पडेना. तो रोगानें जास्तच जर्जर झाला. तो सदोदित दुःखानें विवळूं लागला. तें दुःख पाहून त्याचे आईबाप कष्टी झाले. आपला पुत्र आतां वांचत नाहीं अशी अटकळ करून ते अतिशय विलाप करूं लागले. पतीची व्याकुळ अवस्था पाहून सावित्री तर अत्यंत खिन्न व उदास झाली. तरी पण आपली पतिभक्ति पाहून ईश्वर आपणाला चुडेदान देईल असा मात्र तिच्या मनाला भरंवसा वाटत होता. व त्याच जोरावर ती सासुसासऱ्यास म्हणाली, " गाणगापुरामध्यें नरसिंह-सरस्वती या नांवाचे गुरु वास्तव्य करितात, तिकडे आम्हांस पाठविलें असतां त्यांच्या कृपेनें सर्व व्याधि दूर होतील. " असें सुचवून तिनें स्वामीकडे जाण्याचा आग्रह धरिला. जिचें अंतःकरण सात्विकी धर्माकडे वेधलें आहे; जिला सनातन धर्माचें शिक्षण मिळालें आहे तिच्या भावना कशा असतात पहा ! सावित्रीची दृढ भावना जाणून तिच्या सासुसासऱ्यांनीं एक डोली करून त्यांत आपल्या पुत्रास घातलें व बरोबर सर्व अवश्य ती व्यवस्था करून देऊन त्यांनीं सावित्रीस व दत्तास गाणगापुरास रवाना केलें.

मार्गक्रमण करीत करीत तें जोडपें गाणगापुरास येऊन पोंचलें. तेथें येतांच सावित्रीनें सद्गुरु नरसिंहसरस्वतींचा शोध केला. त्यावेळीं स्वामि नजीकच असलेल्या संगमावर आहेत असें तिला समजलें. आपल्या पतीची व्यवस्था लावून आपण एकटेंच संगमावर जावें ह्मणून ती पुनः आपल्या पतीकडे गेली. ती आपल्या पतीला हांक मारूं लागली तों दत्त कांहींच शब्द बोलेना. वाटेच्या

श्रमानें तो जास्तच थकला असेल असें समजून ती त्याला हालवूं लागली तों तो मृत झाला आहे असें तिला समजून आलें. मग काय विचारितां ? त्या साध्वीनें आक्रांत मांडला. ती धरणीवर गडबडा लोळूं लागली. ती भुईवर डोकें आपटून उरावर दगड मारून घेऊं लागली. तिचे केश मोकळे सुटून भुईवर लोळूं लागले. मोठमोठ्यांनीं आरोळ्या मारून तिनें धरणी दुभंग करण्याचा प्रसंग आणला. ती विलापवाणीनें बोलूं लागली, " देवा, तूं हें काय केलेंस ? तूं मला अबलेला कां गांजलेंस ? तुझ्या कृपेनें माझा पति वाचावा म्हणूनच मी येथें आलेना ? देवाची पूजा करण्यास देवळांत जात असतां तें देऊळच कोसळून पूजकाच्या अंगावर पडावें हें तुला रास्त दिसतें काय ? उष्णामुळें शरीर तप्त झालें असतां शीतल छायेकरितां वृक्षाचा आश्रय करणाऱ्या दीनावर त्या वृक्षानेंच उमळून पडावें हें तुला बरें वाटतें कां ? व्याघ्राला भिऊन पळणाऱ्या गाईवर कसायानें सुरी मारावी; तहान भागविण्याकरितां नदीतीरावर जाणाऱ्या तृषार्तावर सुसरेनें धाड घालावी; त्याप्रमाणेंच ईश्वरा, तूं माझी स्थिति केलीस. सासुसासऱ्यापासून मी ह्यांना दूर आणलें आणि माझ्या आग्रहामुळेंच त्यांचा व ह्यांचा वियोग झाला; तुझ्या नादानेंच विदेशीं येण्याचें मीं धाडस केलें त्या अर्थीं पतीच्या मरणास मीच कारण झालें. "

तिची ती दुःखदवाणी ऐकतांच तिच्या भोंवतीं पुष्कळ मंडळींचा घोळका जमला. बायका, पुरुष आपापल्या परीनें तिचें सांत्वन करूं लागले. पुष्कळांनीं तिला धीर दिला. कित्येकांनीं तिला मदत करण्याचे उद्गार काढून तिला तिच्या सासऱ्याकडे पोहोंचती करण्याबद्दल आश्वासन दिलें. पण अशा कोरड्या सांत्वनानें खऱ्या पतिनिष्ठ साध्वीचा जीव स्वस्थ कसा होणार ? तिला अधिकच गहिंवर येऊन ती बोलूं लागली, " माझी समजूत करणाऱ्या सर्व मायबहिणींनो; माझा

पति मृत झाला असतां मी जगणें शक्य तरी आहे काय ? चुडे-कंकणांच्या आशेनें मी मंगलागौरीची पूजा केली; पतीच्या सुरक्षित-पणाकरितां मीं अनेक व्रतें केलीं; पण माझा सर्व कर्माचार व्यर्थ झाला. आतां मी कोणाकरितां प्राण ठेवूं ? माझें सर्व पुण्य कोठें हो गेलें ? माझी पतिसेवा निष्फळ कशी हो झाली ? यावेळीं माझी पाठ राखण्यास कोणीच समर्थ नाहीं काय ? माझें सौभाग्य हिरावून नेण्याऱ्या काळाचे दांत पाडण्यास कोणाच्याच अंगांत सामर्थ्य नाहीं काय ? मीं आजपर्यंत पतिसेवेंत कधींही अंतर पडूं दिलें नाहीं; साध्वीच्या शुद्ध व्रताला मीं आपल्या मनानें आजपावेतों कधींही विसंबलें नाहीं; पतीच्या ठिकाणच्या ईश्वरीभावनेंत मीं कधींही ढिलाई केलेली नाहीं;मी हा काळपर्यंत पतीच्या आज्ञेचा कधींही भंग केला नाहीं. पतीच्या चरणतीर्थावांचून मी कधींही अन्नग्रहण केलें नाहीं. असें असतां मज दीन अबलेचें कुंकूं हिरावण्यास यमाचें सामर्थ्य चालावें हें पातिव्रत्याला मोठें लांछन आहे. सनातनधर्मांत प्रतिपादन केलेल्या सात्विकी तत्वांचें सत्व आज नाहींसें झालें काय ? साधु-संतांच्या वचनांस आज सर्वत्र हरताळ लागली काय ? शुद्ध सदा-चारास माळ घालून, स्त्री जातीच्या सात्विकी व सनातनधर्मास कवटाळून, एक-पति-निष्ठा हेंच आपलें ध्येय समजून ईश्वरस्वरूप पतीची सेवा करण्यांत आयुष्याचा काळ कंठणाऱ्या माझ्यासारख्या दीन, निराधार, दुबळ्या, साध्वीव्रततत्पर, सनातनधर्मीय अबलेचा असा मरणप्राय छळ होईल तर आर्यधर्माच्या श्रेष्ठपणास कोणी ढुंकूनही विचारणार नाहीं !" इतकें बोलून त्या भाग्यवतीनें आपल्या पतीच्या मृत देहास घट्ट मिठी मारली. जणूं काय आपला प्राण त्याच्या कुडींत घालून त्याला सजीव करून आपलें सौभाग्य कायम राखण्याचाच तिनें प्रयत्न आरंभिला. पतीला घट्ट मिठी मारून ती

साध्वी एकाएकीं शांत झालेली पाहून ती बहुतेक प्राण सोडणार अशीच सर्व लोकांची कल्पना झाली. वस्तुतः सर्व लोकांची अटकळ खरी होती. आणखी एका पळाचा विलंब झाला असतां तर सावित्रीचा प्राण निघून जाऊन आर्यधर्माला काळाकुट्ट डाग लागला असता ! पण असें कसें होईल ? साध्वीची विलापवाणी फुकट कशी जाईल. मनुष्यानें आपलें कर्तव्य बरोबर बजाविलें असतां परमात्मा आपली स्वतःची जबाबदारी संभाळण्यास हयगय कशी करील ? सावित्रीनें पतीच्या गळ्याला मिठी मारून ती आतां प्राण सोडणार तोंच त्या ठिकाणीं अकस्मात् एक जटाधारी सिद्ध प्राप्त झाला. त्यानें तिला हाका मारून सावध केलें. त्यास पाहतांच सावित्री त्याला तेथूनच नमस्कार करून त्याची मनोमय प्रार्थना करूं लागली.

सावित्रीची दीन स्थिति ध्यानांत आणून तो सिद्ध तिची समजूत घालण्याच्या बुद्धीनें बोलूं लागला, “ हे स्त्रिये; तूं व्यर्थ शोक करूं नको. कपाळीं लिहिलेल्या गोष्टी घडणारच. हा देह पूर्व कर्मांनीं बद्ध आहे. आपण सर्वजण कालेंकरून मरणारच आहों. पाण्यावरील फेसाप्रमाणें हा नरदेह अस्थिर आहे. हा मनुष्यदेह पंचभूतात्मक आहे. पंचभूतें गुण उत्पन्न करतात, गुणानुसार कर्में घडतात. सर्व विश्वपसारा मायेनें व्यापला आहे. मायेमुळेंच सत्व, रज, तम यांची उत्पत्ति होते. या तीन गुणांच्या धोरणानेंच सर्व प्राण्यांचा आचार घडतो. कर्माधीन असलेल्या प्राण्यांना कर्माप्रमाणेंच सुखदुःख प्राप्त व्हावयाचें. देवादिकाना जरी कल्पकोटि आयुष्य आहे तरी तेही अखेर नाश पावतात, मग मनुष्यांची कथा ती काय ? प्राणी गर्भांत येतांच त्याचा नाश त्याच्या बरोबर नेमलेला असतो. ज्याचें जसें संचित् असेल त्याप्रमाणें त्याचा जन्ममृत्यु घडत असतो. आयुष्य, सुखदुःख, इष्टसंबंध, इष्टवियोग यांचा सर्व कांहीं संबंध पापपुण्य क्रियेशीं असतो. हा

संसार स्वप्नासारखा आहे. स्वप्नांतील वैभवाबद्दल आनंदही मानूं नये आणि स्वप्नांतील अभाग्याबद्दल दुःखही करूं नये. नाशवंत अशा देहाच्या नाशाबद्दल शोक करीत न बसतां तूं आपला पुढील मार्ग पहा. जेणें-करून आपल्याला हा दुःखरूप भवसागर तरून जाण्यास सांपडेल असा मार्ग स्वीकारणें हें आपलें कर्तव्य आहे."

त्या सिद्धाची अधिकारसंपन्न वाणी कानीं पडतांच ती दत्तभार्या सावित्री कांहींशी सावध झाली. त्याच्या प्रासादिक उपदेशाचा तिच्या मनावर बराच परिणाम घडला. तिनें त्याला हात जोडले आणि ती ह्मणाली, " महाराज; मी बुद्धिहीन अबला आहें. माझा पतिरूपी प्राण परलोकीं गेला आहे. आतां साध्वीच्या धर्माला योग्य असें मी कोणतें वर्तन करावें तें आपण मला सांगा. जेणेंकरून माझ्या पतीचें व त्याच्या बरोबरच माझें इहपरलोकीं कल्याण होईल असा पवित्र स्त्रीचा आचार-धर्म आपण आपल्या मुखानें मला सांगा. आपण जो पवित्र उप-देश कराल त्याप्रमाणें वागण्याचाच मीं आतां निर्धार केला आहे!"

सावित्रीची इच्छा जाणून तो तिला स्त्रियांचा आचारधर्म सांगू लागला. तो म्हणाला, " पति हा स्त्रियांचा देव होय. पति जरी अभागी, व्याधिष्ट, कोपी किंवा कसाही असला तरी तो देवासमान मानावा. पतीची मनोभावना जाणूनच स्त्रीनें सदैव वर्तन करावें. पतीच्या आवडीप्रमाणेंच स्त्रीनें वस्त्रें व अलंकार धारण करावे. पतीचें मन जर स्वस्थ नसेल तर स्त्रीनें श्रृंगार करूं नये. पतीला जी कांहीं प्राप्ती होईल तेवढ्यांतच संतुष्ट असावें. दुसऱ्याची सुस्थिति पाहून आपण आपल्या पतीच्या दुःस्थितीची निंदा करूं नये. पतीचें पादोदक म्हणजेच सर्व तीर्थांचें सार होय. पतीच्या आज्ञे-वांचून कोणतेंही व्रत केलें असतां त्यामुळें उलट पतीचें आयुष्य क्षीण होतें. पतीला क्रोधानें उत्तर देणाऱ्या स्त्रिया श्वान किंवा जंबुक-

योनींत उत्पन्न होतात. पुरुषाचें उच्छिष्ट भोजन करणें यांतच मह्-त्पुण्य आहे. सासु, स्वशूर व पती यांच्यापुढें निर्लज्जपणानें वल्गना करूं नये. सासुस्वशुरापासून पतीला वेगळें काढून संसार करूं इच्छिणाऱ्या स्त्रिया अस्वलिणी होतात. पतीला कोप येऊन त्यानें ताडण केलें तरी देखील त्याला वंद्यच समजून त्याच्यापुढें लीनता धरावी. आपल्या पतीच्या आधीं जेवण करणें किंवा त्याला चोरून कांहीं खाणें हें विष्ठाभक्षण होय. कांहीं अडचणीमुळें पुरुषाला दुसरी पत्नी करावी लागली तरी आपण पतीवर रुष्ट होऊं नये व तिच्याशीं सवतीभाव धरूं नये. एकपातिव्रतापासून केव्हांही चळून नरकाचें साधन करूं नये. जेणें करून आपला पति नेहमीं प्रसंन्नचित्त राहील असा आपला वर्तनक्रम ठेवावा. पति हेंच स्त्रीचें सर्वसुख होय; तिचें मंगल, तिचें भाग्य, तिचें कल्याण सर्व कांहीं एक पति होय. पति हेंच तिचें जीवित होय. पतीची भक्ति, पतीचें ध्यान, पतीचा नामजप, पतीचें चिंतन हाच तिचा भक्तियोग होय. पति हाच तिचा गुरु होय. पतीची एकनिष्ठपणें सेवा केली असतां तिन्ही देव संतोष पावतात. पतिभक्तिविहीन अशा स्त्रीची परमेश्वरभक्तीही तिला यशदायक होणार नाहीं. माता, पिता, पुत्र, कन्या, आप्त, इष्टवर्ग, मित्रवर्ग, सुहृदवर्ग फार काय पण परमेश्वर यांच्याकडूनही मिळणें कठीण असें जें इहपरकल्याण तें एका एकनिष्ठ पतिभक्तीनेंच स्त्रीच्या पदरांत पडणारें आहे. कारण साध्वी स्त्रीला तिच्या पतीवांचून अन्य देव नाहीं. धर्म, कर्म, मंत्र, तंत्र, उपासना. उपदेश हें सर्व कांहीं तिचा पतीच होय. पतिव्रता स्त्रिया याच आचाराचा अवलंब करितात. लोपामुद्रा, अरुंधती, अनुसूया, मैत्रेयी यांसारख्या स्त्रिया केवळ आपल्या एकपतिनिष्ठेमुळेंच सुरमुनींना वंद्य होऊन राहिल्या. त्या धर्मांगनांना हा स्त्रीधर्म संमत आहे. अगस्ती, बृहस्पती, वसिष्ठ, अत्रि यांसारख्या पूज्य विभूतींना हाच धर्म मान्य आहे. ”

सिद्धाच्या तोंडचा आचारधर्म ऐकून सावित्री त्यास ह्मणाली, " हा सर्व आचार पतिव्रतेला साजेसा आहे. माझा पति जिवंत होता तों पावेतों मीं असेंच आचरण केलें आहे; पण आतां मीं काय करावें ? आतां या पतिहीन दशेंत मीं कसा वर्तनक्रम ठेवावा हें कळण्याकरितां आपण मला विधवापणाचा आचार सांगा. "

यावर सिद्धानें भाषण केलें कीं, " दैवयोगानें पति मरण पावला असतां ब्राह्मणाच्या स्त्रियांनीं केशवपन करावें. ज्या स्त्रिया पतीच्या पश्चात् केश वपन करीत नाहींत त्या आपल्या पतीला बंधनांत पाडून आपण स्वतः नरकांत जातात. विधवा स्त्रीनें प्रातः-स्नान करावें. तिनें एकवेळेलाच भोजन करावें. तिनें नेहमीं कोणतें तरी एक धान्य खावें. दर पंधरवड्यांत पांच उपवास करावे. किंवा तिनें चांद्रायणग्रास घ्यावेत. शुद्ध द्वितीयेला एक घास अन्न खाऊन दररोज एकेक घास वाढता खावा आणि पौर्णिमेला यथास्थित भोजन करावें. त्याचप्रमाणें वद्यपक्षांत दररोज उतरते घास खावेत. हें चांद्रा-यण करण्याची जिला शक्ति नसेल तिनें एकान्नभोजन किंवा फला-हार करावा. तात्पर्य, तिनें प्राणधारणेस अवश्य तेवढेंच पवित्र भक्ष्य खाऊन असावें. तिनें मंचकावर किंवा मऊ बिछान्यावर शयन करूं नये. आपल्या पतीला विष्णुस्थानीं मानून सदैव त्याचें ध्यान करीत असावें. पतीच्या आवडीचे जे जे पदार्थ ते ते सर्व सत्पात्रांना दान करावेत. सर्व भोग सोडून पतीच्या नामाचा जप करीत असावें. पतिचरणीं ध्यान ठेऊन नेहमीं पतीच्या नांवानें परोपकार करण्यांत तल्लीन असावें. दीन, दुबळे अनाथ यांचा पतीच्या नांवानें शक्य तो परामर्ष करावा. पती आपल्या पापामुळें नरकांत पडला असला तरी त्याच्या जिवंत असलेल्या विधवा स्त्रीच्या शास्त्रोक्त सदा-चारानें त्याचा उद्धार होतो. "

सिद्धाचा उपदेश ऐकून सावित्रीचें समाधान झालें. पण तिचें मन भलत्याच विचारांनीं व्यापलें होतें पतीच्या पश्चात् जिवंत राहणाऱ्या पतिव्रतांनीं आपला आचार कसा ठेवावा याबद्दल सिद्धानें जें सांगितलें तें तिला मानवलें. पण ती एकपतिनिष्ठ साध्वी वैधव्यस्थितींत जिवंत राहण्यास खुषी नव्हती. आपण आपल्या पतीबरोबरच सहगमन करणार असा तिनें आपला निश्चय स्पष्टपणें सांगितला. तिचा निर्धार ऐकून सिद्धानें तिची पुष्कळ समजूत केली पण ती आपला आग्रह सोडीना. तेव्हां संगमावर जाऊन स्वामींचें दर्शन घेऊन नंतर सती जाण्याबद्दल सिद्धानें तिला नाइलाजास्तव संमती दिली आणि तो आपल्या मार्गानें निघून गेला.

सावित्री सहगमन करण्यास तयार झाली. तिनें ब्राह्मणमंडळी बोलावून आणिली. षोडषकर्में करून तिनें पतीच्या प्रेतासप्रायश्चित्त दिलें. कुंकु लावून ती वस्त्रचूडेमंडित सती पतीच्या प्रेताबरोबर नदीतीरीं गेली. विप्रमंडळींनीं अग्निकुंड तयार करून अग्नि प्रज्वलित केला. त्या प्रेताला कुंडावर ठेऊन सावित्रीनें सुवासिनींच्या ओटया भरल्या. तिची अवस्था पाहून मौज पाहण्यास जमलेल्या सर्व नारीनरांना मोठाच कळवळा आला. ती स्वतः पतीबरोबरच परलोकीं जावयाचें या भावनेनें उल्हसित दिसत होती.

सर्व विधि यथासांग आटपला. आतां त्या दोघांची पेटलेल्या अग्निकुंडांत आहुती पडण्याचाच काय तो विधि व्हावयाचा राहिला. इतक्यांत सावित्रीला सिद्धाचें वचनाची आठवण झाली. तिनें विप्रमंडळींची प्रार्थना करून संगमावर गुरुमूर्तींच्या दर्शनास जाण्याची परवानगी मागितली. तिची इच्छा जाणून ब्राह्मणमंडळी तिला गुरूकडे घेऊन गेली.

वाटेनें चालत असतां सावित्रीचें हृदय पतिप्रेमानें व्याकूळ झालें.

तिच्या डोळ्यापुढें तिच्या पतीची व सद्गुरु-नरसिंहसरस्वती स्वामींची मूर्ती दिसूं लागली. आपल्या पातिव्रत्याचें सर्व सामर्थ्य नष्ट होऊनच आपणावर भयंकर प्रसंग ओढवला अशी भावना होऊन ती पवित्र साध्वी आपल्या मनाशीं ह्मणूं लागली. "हे स्वामी नरसिंह-सरस्वती ! पूर्वभाग्याच्या मंदपणामुळें आपण माझा पतिव्रतेचा अव्हेर करतां काय ? तूंच सर्वेश्वर दाता असून शरणागताचा आधार आहेस. रजोगुणाच्या सामर्थ्यानें सृष्टि रचणारा, तमोगुणाच्या प्रभावानें तिचा संहार करणारा, सत्वगुणाच्या प्रबलतेनें तिचें प्रतिपालन करणारा तूंच आहेस. सर्वसिद्धि तुझ्या दासी आहेत. तूं त्रिमूर्तींचा अवतार असून भक्तजनांचा कैवारी आहेस अशी तुझी ख्याती आहे. मी पातिव्रत्यसंपन्न अबला आहें. माझी तुला दया आलीच पाहिजे. स्वामी; मला माझ्या पतीपुढें आईबाप देखील प्रिय नाहींत. माझ्या पतीला आरोग्य प्राप्त व्हावें ह्मणून मोठी आशा धरून मी तुजकडे आलें. या ठिकाणीं तूं माझे सर्व हेतु परिपूर्ण केलेस. पतिव्रता स्त्रीचा कैवार घेऊन तूं आपलें ब्रीद सत्य करून दाखविलेंस. माझ्यासारख्या पतिनिष्ठ साध्वींचा दाखला दाखवून तूं अपार यश जोडलेंस. असो; कसेंही असलें तरी मला पतीच्या मागें प्राण ठेवणेंच नाहीं. चंद्राबरोबर जशी प्रभा, आकाराबरोबर जशी छाया त्याप्रमाणें जिकडे पती तिकडेच त्याची पतिव्रता स्त्री हा उघड न्याय आहे. स्वामी, मीं आपलें यथायोग्य पवित्र व श्रेष्ठसंमत कर्तव्य बजाविलें आहे. अनन्यपतिव्रतांबद्दलेंच तुझें कर्तव्य तूं न बजाविशील तर तुझीच अपकीर्ति होऊन दीनभक्तांना कमीपणा येणार आहे याची लाज तूंच धर !"

अशी प्रार्थना करीत ती संगमावर जाऊन पोंचली. तिच्या बरोबर अनेक स्त्रीपुरुष आले होते. तेथें यावेळीं भगवान् नरसिंहसरस्वती

एका पिंपळाच्या झाडाखालीं बसले होते. सावित्रीनें विनीत होऊन स्वामींना शुद्ध भावनेनें नमस्कार केला. स्वामींनीं प्रसन्न मनानें तिला " अष्टपुत्रा सौभाग्यवतीभव ' असा आशिर्वाद दिला. स्वामींचा आशिर्वाद ऐकतांच सर्व लोक हंसूं लागले. जो तो स्वामींच्या वचनाबद्दल साशंक झाला. टवाळ व विशेष अक्कलवान लोक स्वामींच्या आशिर्वादवाणीची थट्टा करूं लागले. रास्तच आहे; खोकड किंवा कोल्हा धूर्त व अक्कलवान असतो. पण सिंह हत्तीच्या डोक्यांतील मोतीं खातो हें त्यांना खरें कसें वाटणार ? ते त्या गोष्टीचा उपहासच करणार ? त्याचप्रमाणें चटोर व पाखंडी जनांना तो थट्टेचा विषय वाटला. त्यांना स्वामींची शक्ति समजली नव्हती. ते आपल्याच ज्ञानसिद्धांतांच्या घमेंडींत होते. पतिव्रतेच्या विलापांत काय सामर्थ्य असतें आणि नरसिंहसरस्वतीसारख्या सत्वमय साधुजनांच्या अमोघ वाणींत कशाप्रकारची सिद्धी वास्तव्य करते हे त्या ऐहिकसुखानें बुद्धिमंद झालेल्या पामरांना कसें माहीत असणार ? त्यांनीं स्वामींना सावित्रीची हकीकत समजावून देऊन त्यांना फजीत करण्याचा अट्टहास केला. पण स्वामी सामान्य पुरुष नव्हते. प्रपंचाची घडी बसवून विषयसौख्यासच परब्रह्म समजणाऱ्या ज्ञानाढ्य किंवा दीन जनांना ते थोडेच हार जाणार ? त्या महात्म्यानें सर्वांसमक्ष असें सांगितलें कीं, " हिचें सौभाग्य स्थिर आहे. ही महान् पतिव्रता आहे. ही हयात असतांना हिच्या पतीचे प्राण हरण होण्यांत चूक झाली असली पाहिजे. तुह्मी हिच्या पतीचा देह मजकडे घेऊन या. "

स्वामींच्या सूचनेप्रमाणें त्या भाग्यवान् दत्ताचा मृतदेह मंडळींनीं तेथें आणला. स्वामींनीं ब्राह्मणांकडून त्या प्रेताला स्नान घातलें व आपल्या कमंडलूंतील तीर्थ त्या मृतदेहावर शिंपडलें. सावित्रीचा अधिकार लक्षांत आणून स्वामींनीं दत्ताचा सर्व देह

कृपादृष्टीनें अवलोकन करतांच तो दत्त जागा झाल्याप्रमाणें उठून बसला. त्याच्या देहाची जी अवस्था झाली होती ती पाहून तो हालचाल करावयास लाजूं लागला. तें पाहून लोकांनीं त्याला चांगलीं वस्त्रें दिलीं. तीं वस्त्रें परिधान करून तो आपल्या-भोंवतीं पाहूं लागला. भोंवतालची परकी मंडळी व स्वामींची मूर्ति अवलोकन करून तो विचारांत पडला. त्यासंबंधानें त्यानें आपल्या बायकोस प्रश्न विचारिला व एकंदर प्रकार काय घडला त्याचें ज्ञान होतांच दत्ताला आपल्या आजारपणाची आठवण झाली. त्याला गहिंवर उत्पन्न झाला. अंतःकरण भरून येऊन तो एकदम स्वामींच्या चरणाला घट्ट मिठी मारून बसला. सर्व लोक जयजयकार करूं लागले. स्वामींच्या अंगांतील सात्विकी सामर्थ्य प्रत्यक्षच पहावयास सांपडल्यामुळें विशेष घमेंडखोर व अक्कलवानांना बोलण्याची कांहीं सोयच राहिली नाहीं. त्यांचे नास्तिकी सिद्धांत त्यांच्या ओठांतल्या ओठांतच राहिले. स्वामींनीं प्रेमपूर्वक दत्ताला उठवून आपल्या पोटाशीं धरिलें. त्यांनीं त्याला सावित्रीचें महात्म्य सांगून दोघांना शुभ आशिर्वाद दिले. सर्वलोकांसमवेत सावित्री व दत्त स्वामींची स्तुति करूं लागले.

नंतर स्वामींनीं सर्व मंडळींना रुद्राक्ष, रुद्राध्याय, भस्म, इत्यादिकांचें महात्म्य सांगितलें. स्वामींची सेवा करीत आपण नेहमीं येथें रहावें अशी त्या दंपत्याला भावना उत्पन्न झाली. स्वामींचीं बोधवचनें ऐकावयास सांपडावींत या हेतूनें ते दोघे स्वामींना नित्य कांहींतरी प्रश्न विचारीत. स्वामीही त्यांना त्यांच्या प्रश्नाचीं उत्तरें सांगून त्यांची इच्छा पूर्ण करीत.

याप्रमाणें कांहीं काळ गेल्यानंतर स्वामींनीं त्या दंपत्यास आपल्या घरीं जाण्यास सांगितलें. आपण आपल्या घरीं गेल्यानंतरही आपल्याला स्वामींची सेवा घडावी व पुढें आपल्या देहाचें सार्थक व्हावें

या इच्छेनें सावित्रीनें हात जोडून स्वामीस विनविलें कीं, " आपण आह्मांस येथून जाण्याची अनुज्ञा करतां, परंतु आपण मला कांहींतरी मंत्रोपदेश करावा. जगतामध्यें मनुष्यांनीं गुरूवांचून असूं नये असें थोर लोक ह्मणतात. गुरु व गुरूपदेश यांचा महिमा अपूर्व आहे. देहाचें सार्थक होण्याकरितां मला एखादी उपासना देण्याचा अनुग्रह व्हावा. "

सावित्रीची ही विनंति ऐकून नरसिंहसरस्वतीसारख्या भगवद्वंद्य विभूतीनें सांगितलेलें उत्तर विशेष विचार करण्यासारखें आहे. ते ह्मणाले, " स्त्रियांना पतिभक्तिवांचून अन्य उपदेश नाहीं. अज्ञानपणानें त्यांनीं उपदेश मागितला तरी उपदेशकानें त्यांना मंत्रोपदेश करूं नये. व स्त्रियांना त्यांच्या पतीवांचून अन्य गुरु नाहीं. पति हाच त्यांचा गुरु होय. त्यांनीं नेहमीं आपल्या पतीच्या सेवेंत निमग्न असावें हीच त्यांची गुरुभक्ति होय. त्यांची एकपतिनिष्ठाच त्यांना फलद्रूप होणारी आहे. एकपतिनिष्ठाच त्यांचें इहपरलोकीं कल्याण करणारी आहे. त्यांची पतिसेवा पाहून तिन्ही देव त्यांचे दास होतात. त्यांना कांहीं धर्मकर्म करावें अशी इच्छा उत्पन्न झाल्यास त्यांनीं आपल्या पतीच्या अनुज्ञेनें कांहीं व्रतोपवास करावे. "

स्वामींचा हा बोध ऐकून सावित्रीचें समाधान झालें. त्या दोघांनीं स्वामीपुढें लोटांगण घालून त्यांची आज्ञा शिरसा वंद्य केली. इकडे ही सर्व हकीकत सावित्रीचे आईबाप व सासूसासरा यांना कळून ते सर्व त्या ठिकाणीं आले. त्या सर्वांनीं स्वामींचा जयजयकार करून त्यांना नमस्कार केला. सर्वांच्या भेटी होऊन आनंदीआनंद झाला. नंतर स्वामींचा शुभप्रद आशिर्वाद घेऊन ते सर्वजण आपल्या घराकडे निघून गेले. सावित्रीच्या चरित्रानें सर्व लोकांचें मन व्यापून राहिलें. जो तो तिचें स्तोत्र गाऊं लागला.

---

# ७ स्वाहा.



माहिष्मती नांवाच्या राजधानींत नीलध्वज या नांवाचा राजा राज्य करीत होता. माहिष्मतीची रचना प्रेक्षणीय होती. तिचें दर्शन घडलें असतां मनाला मोठा हर्ष वाटत असे. ठिकठिकाणीं गगनचुंबित राजवाडे उभारले होते. तिच्या सभोंवतालच्या अनेक उद्यानांची शोभा पाहून नेत्र प्रसन्न होत असत. अशा या नगरीचा अधिपति नीलध्वज हा मोठा पराक्रमी व भगवद्भक्त होता. तो न्यायप्रिय व धर्मावर श्रद्धा ठेवणारा होता. त्याचें प्रजाप्रेम पाहून सर्व लोक समाधानी असत. त्याच्या अमलाखालचे सर्व वर्णांचे लोक आपापला धर्म पाळण्यांत तत्पर असत. त्याच्या नगरींतील ब्राह्मणलोक सदोदित वेदघोष करण्यांत गढलेले असत. नीलध्वजाच्या कीर्तीनें सर्व जग नादित झालें होतें. तो केवळ भूलोकावरील अमरेंद्रच होता.

नीलध्वजाला प्रवीर या नांवाचा एक मुलगा होता; व स्वाहा या नांवाची एक कन्या होती. ही स्वाहा स्वरूपानें फारच देखणी होती. ती लावण्याची केवळ खाण होती. सिंहालाही लज्जा उत्पन्न करण्यासारख्या मध्यरचनेनें ती संपन्न होती. तिचे नेत्र पाहूनच हरिणांनीं अरण्याचा स्वीकार केला असावासें वाटे. ती शुकनासिका असून तिनें आपल्या तेज:पुंज कांतीनें चंद्रालाही खालीं पहावयास लाविलें होतें. तिचा वर्ण सोनचाफ्याप्रमाणें असून तिनें आपल्या अधरांनीं प्रवाळमण्यांना जिंकलें होतें. तिचा कंठ शंखाकृति होता. कोकिळांप्रमाणें तिचा स्वर मधुर होता. राजहंसांनीं जणूं काय तिच्याच गतीचें अनुकरण केलें असावें असें वाटत असे.

अशा प्रकारची ती सुंदर कन्या स्वाहा उपवर झाली. तेव्हां

तिच्या पित्याला मोठी काळजी उत्पन्न झाली. त्यानें अनेक राज-पुत्रांचा शोध केला, पण स्वाहाच्या सौंदर्यास साजेल असा कोणीच राजपुत्र त्याच्या आढळांत येईना. शेवटीं त्यानें राजपुत्रांचा एक चित्रपट तयार केला. आपल्या कन्येनें स्वेच्छेनेंच वर पसंत करावा अशी योजना करून नीलध्वजानें तो चित्रपट आपल्या कन्येपुढें ठेविला. आपली कन्या रतीलाही लाज आणण्याजोगी आहे अशी नीलध्वजाची खात्री असल्यानें तो तिच्या अनुरूप वर पसंत कर-ण्यास शंकित् होता. तिचा तिनेंच वर पसंत केला ह्मणजे आपणास बोल लागणार नाहीं या भावनेनें त्यानें आपल्या कन्येला चित्रपटां-तील कोणता तरी राजपुत्र पसंत करण्याची मुभा दिली.

प्राचीनकाळीं क्षत्रियकन्यकांना स्वतः पति पसंत करण्याची सवड मिळे ही गोष्ट पुढें आणणारांनीं त्या कन्यकांचा अधिकारही पूर्णपणें ध्यानांत आणावयास पाहिजे. स्वाहा कोणत्या राजपुत्रास निव-डून काढते इकडे तिच्या आईबापांचें व भावाचें चित्त वेधलें होतें; पण ती स्वाहा निराळ्याच विचारांत होती. तिच्या अंतःकरणांत पातिव्रत्याची कल्पना इतकी कांहीं पूर्णपणें बिंबली होती कीं, ती त्या मानवी राजपुत्रांच्या चित्रपटाकडे ढुंकूनही पाहीना. तिच्या मनांत विचार तरी काय आहे हें कळण्याकरितां नीलध्वजानें तिला तिचा हेतु विचारिला. तेव्हां तिनें सांगितलें, " मला या मर्त्य मानवापैकीं कोणीही वर नको आहे. "

कन्येची इच्छा जाणून नीलध्वजानें तिला सांगितलें, " तुला मी देवांचा राजा जो इंद्र तो पति मिळवून देईन. सर्व देव ज्याचें सेवन करितात, ज्याच्या दरबारांत नेहमीं रंभेचें नृत्य चालतें, जो सदा कल्पतरूंच्या उद्यानांत क्रीडा करतो अशा इंद्रासमवेत ऐरावतावर तुला बसलेली पाहण्यांत मला आनंदच होईल. "

बापाचें भाषण ऐकून स्वाहानें सांगितलें, " नुसते सुखविलास भोगावयास सांपडण्याकरितां पतीचा लाभ करून घ्यावयाचा अशी माझी कल्पना नाहीं. त्यांतून तो इंद्र तर मला मुळींच मान्य नाहीं. तो परद्रोही आहे. तो तपोधनांचा द्वेष करणारा आहे. परभाग्य पाहतांच तो कावराबावरा होत असतो. श्रेष्ठ श्रेष्ठ मुनींच्या तपाचा विध्वंस करण्यांत इंद्र नेहमीं धन्यता मानतो. त्याच्या पापी वर्तनामुळें तो सहस्रभगांनीं व्याप्त असल्याचें मला ठाऊक आहे. श्रीकृष्णाशीं पारिजाताबद्दल युद्ध केल्यानें तो नीच ठरला आहे. श्रीकृष्णानें गोवर्धनाची पूजा केली तें न साहून त्या इंद्रानें वैरभाव धरून सात दिवस अतिवृष्टि केल्यामुळें तो कृतघ्न ठरला आहे. तसल्या पापी, कृतघ्न, अशुद्ध, भ्रष्ट इंद्राचें नांवही काढूं नये. "

स्वाहाचें हें बोलणें ऐकून नीलध्वज जास्तच चिंतेंत पडला. सुरांचा राजा इंद्रही तिला आवडत नाहीं तेव्हां तिच्या मनांत आहे तरी काय; कां तिला कांहींतरी सबब सांगून लग्नच करावयाचें नाहीं. यांतील त्याला कांहींच नीट समजेना. तो तिला जरा दरडावून ह्मणाला, " तुला इंद्रही पसंत नाहीं ह्मणतेस; मग इंद्राहून श्रेष्ठ असा कोण सुरगण सांपडणार ? सत्वगुणपरिपूर्ण असा कोणी मानवश्रेष्ठ आधीं तूं नापसंत कां ठरवितेस हेंच आह्माला समजत नाहीं. तुझा यासंबंधानें काय विचार ठरला आहे तो तरी सविस्तर सांग. "

बापाचें बोलणें ऐकून स्वाहानें सांगितलें, " कोणताही मानव न वरण्याचें कारण काय आहे तें आपणांस समजलें ह्मणजे मी इंद्राlाही तुच्छ कां करते याचा सहजच उलगडा होणार आहे. आह्मां स्त्रियांना पातिव्रत्याहून अधिक कांहीं एक प्रिय नाहीं. कोणतेंही सुख, कोणताही विलास, कोणताही आराम, कोणतेंही भाग्य या सर्व गोष्टी पतिव्रता स्त्रिया आपल्या पातिव्रत्यापुढें कःपदार्थ समजतात.

दुःखाचे डोंगर कोसळत असले तरी त्यांच्या निवारणार्थ पति-व्रता स्त्रिया आपल्या पातिव्रत्यापासून एक रेसभरही ढळणार नाहींत. पातिव्रत्याच्या सामर्थ्यापुढें तिन्ही देवांनाही नम्र व्हावें लागतें. अशा प्रकारचें पातिव्रत्य ह्मणजे एकपति–निष्ठा हेंच होय. पतिसेवा, पतिभक्ति, पतिध्यान, पति–नाम–स्मरण हेंच आह्मां स्त्रियांचे सर्व योग होत. पति जीवंत असतांना किंवा मेल्यानंतरही आह्मां स्त्रियांना पतीवांचून अन्य पुरुषाचें अस्तित्वच मान्य नाहीं. अशी जर आमची पातिव्रत्याची श्रेष्ठतम भावना आहे तर मानव-पति वरून कसें निभेल ? दुर्दैवाच्या हल्यानें किंवा पूर्व पापाच्या प्राबल्यानें पति मृत झाला असतां त्याच्या मागें मरणाऱ्या कांतेस किंवा तो हयात असतांना त्याच्यापूर्वीं मरणाऱ्या त्याच्या स्त्रीला अग्नीच्या स्वाधीन व्हावें लागतें. अग्नि हा पुरुष असल्यानें सतीचा मृत देह अग्नीमध्यें पडणें ह्मणजे त्या मृतदेहास परपुरुषाचा स्पर्श होणें ही गोष्टही माझ्या मनास रुचणारी नाहीं. याकरितां मीं असा विचार केला आहे कीं, त्या अग्निनारायणासच पति करावयाचा. अग्निच पति प्राप्त झाला ह्मणजे मेल्यानंतर माझ्या पातिव्रत्यसंपन्न मृत देहास परपुरु-षाचा स्पर्श होण्याची शक्यताच संपली ! ”

स्वाहाची ही पतीबद्दलची इच्छा समजतांच इतर स्त्रिया तिची चेष्टा करूं लागल्या. त्या तिच्या कल्पनेचा उपहास करून तिला ह्मणाल्या, “ तुला मनुष्यपति रुचत नसून कोणी मनुष्याहून श्रेष्ठ असा सुरगण पाहिजे तर तूं अमरनाथालाच पसंत कर. तो टाकून तूं अग्नीवरच काय इतकी भाळली आहेस ! इंद्राप्रमाणें अग्नीच्या ठिकाणींही दोष सांपडण्यासारखे आहेतच. अग्नि हा सर्वभक्षक आहे. बरें; त्याचें रूप तरी काय मेलें ! सात जिव्हा, सात हात, दोन डोकीं यांनीं तो युक्त आहे; त्याला पाय तीन असून जनावराप्रमाणें

चार शिंगें आहेत. वाहन तरी ऐरावताच्या तोडीचें एखादें आहे का ? तो मेषवाहन ह्मणून प्रसिद्ध आहे. बरें, त्याचें गुण तरी धड असावयाचे होते. जो त्याचा सहवास करील त्याला जाळणें हें त्याचें स्वभावसिद्ध कर्म. अशा प्रकारचा कृतघ्न अग्नि वरून तुला काय समाधान होणार न कळे. तेव्हां तूं हा सारा हट्ट सोडून दे. ”

मैत्रिणींनीं तिची थट्टा करून अग्नीची कुचेष्टा केली पण त्याचा स्वाहाच्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं. स्त्रीजनांनीं अग्नीचें वर्णन केलें तें तिला आधींच माहीत होतें. वैभव, सौंदर्य, विलास यांवर नजर देऊन तिनें अग्नीला पसंत केलें नव्हतें. तिचा मुख्य भावार्थ काय होता तो तिनें आपल्या बापाजवळ खुलासेवार सांगितला होता. त्याच्याकडे दुर्लक्ष्य करून नुसती अग्नीची टवाळी करणाऱ्या स्त्रीजनांच्या भाषणाकडे स्वाहानेंही दुर्लक्ष्यच केलें. तिनें त्यांच्या भाषणाचा राग न मानतां आपला निर्धार अचल राखला. अग्नि आपण होऊन स्वाहाचा स्वीकार करण्यास येईल तर आपण त्याला आपली कन्या देऊं असें नीलध्वजानें स्पष्टपणें सांगितलें. बापाची तितपत कबुली मिळतांच स्वाहानें आपण स्वतःच अग्निप्राप्तीबद्दल प्रयत्न चालविला. तिनें पवित्र अशा द्विजांची सेवा करून त्यांना अग्निप्राप्तीचा मार्ग विचारिला. ब्राह्मणांनीं तिला अग्नि प्रसन्न होण्याचा मंत्र सांगितला. त्या मंत्राचा अक्षय्य जप करून त्या कन्येनें यथाविधि हवन केलें. स्वाहाच्या भक्तिपूर्वक व्रताचरणानें अग्नि संतुष्ट झाला. त्यानें ब्राह्मणाचा वेष धारण केला आणि तो नीलध्वजाकडे येऊन त्याच्या कन्येची याचना करूं लागला.

त्याची मागणी ऐकून नीलध्वजानें त्याला आपल्या कन्येचा हेतु कळवून त्याची मागणी नाकारली. तेव्हां त्या ब्राह्मणानें राजाला आपणच प्रत्यक्ष अग्नि असल्याचें सांगितलें. त्याचें भाषण ऐकून सर्व

सभाजन त्याला हंसूं लागले. त्यांनीं राजाला सांगितलें, " हा कोणी तरी लबाड ब्राह्मण असावा. आपण याच्या भाषणावर भरंवसा धरून कन्येचें मातेरें करून घेऊं नका. आपल्याला हा अग्निच आहे असें वाटत असेल तर आपण याची कन्यादानापूर्वीं परीक्षा पहावी. "

सभाजनांची सूचना राजासही मान्य झाली. त्यानें लागलीच आपल्या प्रधानाला आज्ञा करून त्या ब्राह्मणाची परीक्षा पहाण्यास सांगितलें. प्रधानानें त्याला कांहीं अनुभव दाखविण्याबद्दल सुचवितांच त्याच्या मुखांतून ज्वाला निघूं लागल्या. त्या ज्वालांनीं प्रधानाचीं वस्त्रें जळूं लागलीं अग्नीचे चटके बसूं लागतांच प्रधान ओरडावयास लागला. प्रधानाचें दुःख पाहून नीलध्वजानें त्या विप्ररूपीं अग्नीचें स्तवन केलें. राजाच्या प्रार्थनेनें वैश्वानर संतुष्ट होऊन शांत झाला. आपल्या कन्येच्या व्रतानें अग्नि प्रसन्न होऊन आपला जांवई होण्याकरितां ब्राम्हणाच्या रूपानें आला आहे याविषयीं सर्व सभासदांसह राजाची पूर्ण खात्री झाली.

राजानें त्या विप्राला आपल्या घरीं मोठ्या आदरानें राहून घेतलें व त्याच्याशीं स्वाहेचें लग्न करावयाचें असा आपल्या मनाशीं राजानें निश्चय केला. त्यानें तो सर्व प्रकार बायकामंडळीस विदित केला. स्वाहेची आई ज्वाला हिला अग्नि जामात होणार याबद्दल आनंद होऊन तीही राजाच्या मतास अनुकूल झाली. राजाराणीचा संकल्प जाणून राजाची भावजय आश्चर्यचकित् झाली. तो विप्र खरोखरीच अग्नि असावा अशी त्या भावजयीची अद्यापही खात्री होईना. ती आपल्या दिराला म्हणजे नीलध्वजास म्हणाली, " तुम्ही सर्वच कसे भुलला कोण जाणें. हा ब्राह्मण कोणी कपटी पुरुष असावा. तो इंद्रजाल जाणत असेल तर आपल्या तोंडांतून ज्वाला काढण्याचे प्रयोग सहज करून दाखवील. तुम्ही असल्या गारुडविद्या जाणणाऱ्याला अग्निदेव समजून स्वतःचें हंसें करून घ्याल. असला गारुडी जांवई करण्यापूर्वीं त्याची चांगली परीक्षा करा. "

वहिनीचें शंकायुक्त भाषण ऐकून नीलध्वज तिला ह्मणाला, "आह्मी सर्वांनीं आपापली खात्री करून घेतली आहे. तुमची संशयनिवृत्ति करून घेण्याकरितां तुम्हींच स्वतः त्याची हवी तशी परीक्षा करावी."

नंतर त्या भावजयीनें त्या विप्राला आपल्या मंदिरांत नेलें. त्याला उत्तम प्रकारचें आसन देऊन तिनें त्याची पूजा केली; आणि ती त्यास विनयानें बोलली, "तुम्ही खरेच अग्निदेव आहां याबद्दल मला साक्षात्कार दाखवा." अग्नीला त्या बाईचें सर्व ह्मणणें आधींच कळलें होतें. ती बरीच चिकित्सेखोर आहे हें त्याच्या ध्यानांत आलेलें होतें. आपल्या स्वरूपाची प्रचीत पाहण्याची तिच्या मनांतील दृढ भावना जाणतांच त्यानें आपल्या सामर्थ्यानें तिचें मंदिर पेटविलें. तें पाहतांच ती बाई घाबरून इकडे तिकडे पळावयास लागली तोंच तिचें नेसतें वस्त्र पेटलें. आपला प्राण वांचवावा या हेतूनें तिनें लागलीच त्या वस्त्राचा त्याग केला. ती धांवत जाऊन दुसरें वस्त्र नेसूं लागली तों तेंहि पेटलें. अशाप्रकारें ती जें वस्त्र परिधान करावयास घेई तें पेटूं लागलें. तेव्हां तिचा नाइलाज होऊन ती तशी वस्त्ररहीतच सैरावैरा धावूं लागली. तशाच स्थितींत ती आरोळ्या मारूं लागली. आपल्या भावजयीची अवस्था ध्यानांत आणून राजानें अग्नीची प्रार्थना करून त्यास शांत केलें. कुत्सितपणानें संशयाची वाढ करून घेणाऱ्या कुटिल जनांची कशी दीनावस्था होते याबद्दल आपल्या भावजयीस चांगली आठवण ठेवण्यास सांगून राजानें तिला नवें वस्त्र नेसण्यास देऊन तिची समजूत केली. तिनें आपणास आलेल्या प्रत्यक्ष अनुभवामुळें सर्व कुकल्पना सोडून देतांच अग्नीनें तिला त्रास देण्याचें बंद केलें. तो कन्या मागणारा विप्र अग्निदेवच आहे याबद्दल आतां कोणासही संशय उरला नाहीं. राजानें उत्तम मुहूर्त पाहून स्वाहा आणि अग्नि यांचें लग्न लाविलें. राजानें अग्नीला घरजांवई करून ठेविलें.

स्वाहा आणि अग्नि यांचा विवाह होऊन बराच काळ लोटल्या-नंतर धर्मराजानें हस्तनापुरास अश्वमेध यज्ञ सुरू केला. त्यानें जगा-वर संचार करण्याकरितां जो शामकर्ण सोडला होता त्याचें रक्षण करण्याचें काम अर्जुनाकडे होतें. तो शामकर्ण हिंडतां हिंडतां नीलध्व-जाच्या राज्यांत शिरला. त्याच्या मस्तकावरील सुवर्णपत्रिका वाचतांच नीलध्वजाचा मुलगा प्रवीर यानें तो अश्व धरून आणिला. प्रवीर आणि अर्जुन यांचें युद्ध जुंपलें. अनुशाल्व, वृषकेतु वगैरे पार्थाकडील वीरांनीं प्रवीराला जखमी केलें. तेव्हां पुत्राच्या कैवारार्थ नीलध्वज सैन्या-सह धावून आला. अर्जुनाच्या प्रखर बाणांनीं नीलध्वजही बेशुद्ध होऊन पडला. राजाची ती अवस्था जाणून सर्वत्र हाहाकार उडाला. नीलध्वजाचें सर्व सैन्य सैरावैरा धावूं लागलें. अर्जुनाच्या भयानें आपल्या बापाच्या सैन्याची गाळण उडली असून पार्थानें आपल्या बापास व भावाला समरभूमीवर पाडिलें आहे असें पाहतांच ती महानपतिव्रता स्वाहा संतप्त झाली. तिनें आपल्या पतीची प्रार्थना करून अर्जुनाचा समाचार घेण्यास त्याला उद्युक्त केलें. त्या महान् साध्वीची इच्छा जाणून अग्नीनें पांडवसैन्यांत प्रलय मांडला. अर्जुनाचें सैन्य, रथ, गज, अश्व वगैरे सर्व कांहीं जळूं लागलें. अग्नीचें उग्र रूप पाहून अर्जु-नानें वरुणास्त्र सोडिलें. त्या अस्त्राच्या प्रभावानें आकाशांत मेघांची दाटी झाली. हत्तीच्या सोंडेसारख्या पाण्याच्या धारांचा वर्षाव होऊं लागला. एवढ्या प्रचंड जलधारांनींही तो अग्निप्रलय शांत होईना. इतक्यांत नीलध्वज सावध झाला. आपल्या पातिव्रत्यसंपन्न कन्येच्या प्रभा-वानें पार्थाचें सर्व सैन्य भस्म होत आहे हें पाहून नीलध्वजाला मोठें कौतुक वाटलें. त्यानें आपल्या सैनिकांना उत्तेजन देऊन अर्जु-नाच्या सैन्यावर बाणांचा मारा चालू केला. अर्जुनाच्या वरुणास्त्रानें अग्नि शांत न होतां अधिक जोरानें भडकला. आतां त्रिभुवन दग्ध

होतें कीं काय असेंच सर्वत्रांना वाटलें. अर्जुन मोठ्या विचारांत पडला. त्यानें अनेक उपाय योजले पण ते सर्व फसले. आपण कितीही पराक्रमी असलों तरी स्वाहेसारख्या महान् पतिव्रतेच्या सामर्थ्यापुढें आपणास लीनच झालें पाहिजे असा सुविचार करून अर्जुनानें अग्निनारायणाचें स्तवन आरंभिलें. "हे मेषवाहना ! तुला मी शरण आहें. तूं सर्व देवतांचें मुख आहेस. तुझ्या मुखानेंच सर्व देवतांना त्यांचें अवदान पोंचत असतें. धर्मराजा तुला संतुष्ट करण्याकरितांच अश्वमेध करीत आहे. तूंच जर माझ्या सैन्याचा निःपात करशील तर मग यज्ञ सिद्धीस कसा जाईल ? तूं सर्वभक्षक असलास तरी साधु आहेस. तुला यज्ञपति ह्मणतात हें ध्यानांत आण. तूं दुर्जन नाहींस. दिवसाच्या पूर्व प्रहारामध्यें जशी माणसाची सावली प्रथमतः मोठी असून पुढें क्षय पावते त्याप्रमाणें दुर्जनांच्या मैत्रीचा प्रकार आहे. उत्तर दिवसांतील सावली आरंभीं लहान असून पुढें पुढें वृद्धि पावते त्याप्रमाणेंच सज्जनमैत्रीचा प्रकार आहे. तूं सज्जन आहेस. तूं क्षयरोगानें व्याप्त झालास त्यावेळीं मीं तुला खांडववन देऊन रोगमुक्त केलें आणि तेव्हापासून तूं माझा मित्र झाला आहेस. असें असून तूं कृतघ्नता धरून माझें सैन्य जाळीत आहेस हें योग्य आहे काय ? तूं मजवर प्रसन्न हो."

अर्जुनाचें स्तवन ऐकूनही तो अग्नि शांत होईना. पातिव्रत्यसंपन्न स्वाहादेवीची अनुज्ञा मिळाल्याखेरीज तो प्रलयाग्नि शांत कसा होणार ? आपल्या स्तुतीला अग्नि जुमानीत नाहीं असें पाहून अर्जुन रागावला. अग्नि कृतघ्न बनला आहे; घरजांवईपणानें त्याची बुद्धि भ्रमित झाली आहे, असें जाणून अर्जुन फारच खवळला. वाळूचा घाणा गाळला तरी तेल निघेल, कोपयुक्त सर्प मस्तकावर ठेववेल, दुधामध्यें कावळा धुतला असतां तो पांढरा होईल पण दुर्जनाच्या ठिकाणीं चांगला

गुण उत्पन्न होणार नाहीं असें ठरवून अर्जुनानें अग्नीची बहुत निंदा केली. कांहीं केल्यानें अग्नि आपली कठोरता सोडीत नाहीं असें पाहून अर्जुनानें अखेर नारायण—अस्त्राचा प्रयोग केला. त्या अस्त्राच्या प्रभावानें भगवान नारायण संतुष्ट होऊन त्यांनीं अग्नीला शांत होण्याची प्रेरणा केली. अग्नीनें आपण होऊन पार्थाला पुष्कळ उपदेश करून कृष्णस्वरूपीं भगवानाचें महात्म्य सांगितलें. महान् पतिव्रता स्वाहा हिच्या प्रेरणेनेंच आपणाला अर्जुनाच्या सैन्याचा नाश करावा लागला असें सांगून त्यानें अर्जुनाला साध्वीतेजाचें ज्ञान करून दिलें. नंतर तो अग्निदेव नीलध्वज आणि स्वाहा यांनाही उपदेश करूं लागला. श्री कृष्ण परमात्मा ह्मणजेच जो साक्षात् नारायण होय त्याच्या प्रेरणेनें स्वाहेचें हृदय दयायुक्त होऊन तिनें अग्नीला अर्जुनाशीं सख्य करण्याची अनुज्ञा दिली. अर्जुनालाही पातिव्रत्यप्रभाव समजून तो स्वाहा—देवीचें स्तोत्र गाऊं लागला. अशा प्रकारें अग्नीचें व अर्जुनाचें युद्ध संपलें. नीलध्वजही अर्जुनाला सहाय्य करण्यास त्याच्या बरोबर जाण्यास सिद्ध झाला.

राजाची पत्नी ह्मणजे स्वाहेची आई ज्वाला ही देखील मोठी पतिव्रता होती. स्वाहा व अग्नि यांच्या अनुकूलतेनें नीलध्वजानें अर्जुनाशीं स्नेह जोडला ही गोष्ट तिला खपली नाहीं. आपल्या प्रवीर पुत्राला अर्जुनानें युद्धामध्यें फजीत करून नीलध्वजालाही जखमी केलें ही गोष्ट तिच्या हृदयाला टोंचून राहिली होती. तिचा कोप शांत होईना. ती पतिव्रता अर्जुनाच्या नाशास तयार झाली. तिच्या हट्टास न जुमानतां नीलध्वजानें अर्जुनाशीं सख्य केलें हें पाहतांच ती साध्वी कोपायमान होऊन आपल्या भावाकडे गेली. तिनें आपल्या भावाच्या मनांत अर्जुनाविषयीं वैर उत्पन्न करण्याचा पुष्कळ यत्न केला. तेथेंहि तिचा अव्हेर झाला.

तेव्हां तर ती साध्वी अतिशयच चौताळली. पुढें तिनें गंगानदीचें चित्त भ्रष्ट करून तिच्या मनांत अर्जुनाविषयीं द्वेष उत्पन्न केला. अर्जुनानें कपट करून भीष्माचा प्राण घेऊन गंगेला निपुत्रिक केलें याबद्दल त्या स्वाहेच्या आईनें गंगेला चिडवितांच ती गंगा क्रुद्ध होऊन शापवाणी बोलली कीं, " माझ्या पुत्राचा नाश करणारा जो अर्जुन त्याचें शिर आजपासून सहा महिन्यांच्या आंत तुटून पडेल. " यानंतर तेवढ्या मुदतींत अर्जुनाचें बभ्रुवाहनाशीं युद्ध सुरू झालें. त्यासमयीं गंगेच्या शापाप्रमाणें अर्जुनाचें चित्त भ्रमित होऊन त्याला अस्त्रें आठवेनाशीं झालीं. तिचा शाप सफल व्हावा या हेतूनें ज्वालेनें बभ्रुवाहनाच्या भात्यांत बाणरूपानें प्रवेश केला. बभ्रुवाहनानें तो ज्वालायुक्त बाण सोडतांच अर्जुनाचें शिर तुटलें. अर्जुनाला जिवंत करून धर्माचा अश्वमेध पार पाडण्याकरितां श्रीकृष्णाला अत्यंत कष्ट पडले. तात्पर्य, ज्वालेसारख्या पतिव्रतेच्या क्रोधामुळें साक्षात् भगवान श्रीकृष्णालाही आपलें पुण्याचा लय करून घ्यावा लागला.

याप्रमाणें ज्यांची ज्यांची पतिव्रता स्त्रियांशीं गांठ पडली त्या सर्वांना त्यांच्यापुढें हारच घ्यावी लागली. त्यांनीं उच्चारलेल्या शापवाणीचें निवारण करणें हरिहरांना देखील अशक्य झालें तेव्हां अशा साध्वींच्या चरित्रांचा महिमा मानवांनीं एक मुखानें कोठवर गावा ?

# ८ सीता.



प्राचीनकाळीं पद्माक्ष या नांवाचा एक पृथ्वीपति होऊन गेला. त्यानें परमेश्वराची भक्ति करून त्याला प्रसन्न करून घेतलें. त्यानें श्रीधराजवळ असा वर मागितला कीं, " हे क्षीरसागरनिवासी परमेश्वरा, तुझी कांता लक्ष्मी ही माझ्या पोटीं कन्यारूपानें अवतीर्ण व्हावी. " पद्माक्षाचें मागणें ऐकून भगवान् श्रीविष्णूंना हंसूं आलें. जगन्माता ही सामान्य जनाप्रमाणें जन्म पावणें शक्य नाहीं ही गोष्ट विष्णु जाणत होते. तरी पण भक्ताची इच्छा पूर्ण करण्याकरितां त्यांनीं त्या पद्माक्षास प्रसाद म्हणून एक मोठें थोरलें महाळुंग दिलें. राजानें नऊ महिनेपर्यंत तें दिव्य फळ जतन करून ठेविलें. नऊ मास पूर्ण होतांच त्या मातुलिंग फळांतून एक दिव्य कन्या प्रगट झाली. त्या कन्येचें अद्भुत तेज पाहून पद्माक्षाला ती साक्षात् रमाच अवतीर्ण झाली असल्याविषयीं खात्री वाटली.

ती कन्या हलके हलके मोठी होऊन उपवर झाली. तिचें सौंदर्य पाहून पुष्कळ राजांनीं पद्माक्षाजवळ तिच्याबद्दल मागणी घातली. परंतु, पद्माक्षानें सर्व राजांची मागणी नाकबूल केली. कन्येच्या विवाहाबद्दल त्यानें आपला असा बेत सांगितला कीं, " आकाशाच्या निळिमेसारख्या रंगानें जो राजपुत्र युक्त असेल त्यालाच मीं आपली कन्या अर्पण करीन. "

राजाची ही अट ऐकतांच सर्व राजपुत्र खवळले. त्यांनीं पद्माक्षाशीं भयंकर युद्ध करून त्याचा प्राण घेतला. त्याची राजधानी लुटून ते सर्वजण त्याच्या कन्येस शोधूं लागले. आपला पिता मारला गेला तेव्हां आपण आतां शत्रूंच्या हातांत सांपडूं व त्यामुळें आपले

हाल होतील हें जाणून त्या कन्येनें अग्निकुंडांत प्रवेश केला. जिच्या-करितां आपण एवढा खटाटोप केला ती सुंदर राजकन्या अग्निकुंडांत गुप्त झाली हें पाहतांच सर्व राजेलोक निराश होऊन आपापल्या ठिकाणीं निघून गेले.

पुढें कांहीं काळानें ती कन्या कुंडांतून बाहेर पडली. त्यावेळीं रावण आपल्या विमानांत बसून चालला होता. त्यानें ती लावण्ययुक्त कन्या पाहतांच त्याच्या मनांत तिच्याविषयीं अभिलाष उत्पन्न झाला. रावणानें लागलीच त्या कन्येवर झडप मारली; इतक्यांत ती सुंदरी पुन्हां अग्नि-कुंडांत गुप्त झाली. हें पाहून रावणानें तें अग्निकुंड विझविलें. ती कन्या मोठी लाघवी असावी अशी कल्पना करून रावणानें तिला हुडकून बाहेर काढण्याकरितां तें अग्निकुंड खणण्यास आरंभ केला. खणतां खणतां रावणाला त्या कन्येच्या ऐवजीं पांच रत्नें सांपडलीं. तीं रत्नें अप्रतिम आहेत असें जाणून रावण तीं घेऊन आपल्या नगरीस निघून गेला. रावणानें तीं पांचीं रत्नें एका पेटींत घालून बंदोबस्तानें ठेविलीं. रावणाच्या मनांत तीं रत्नें आपल्या मंदोदरी नांवाच्या पत्नीस द्यावींत असें होतें. त्याची व मंदोदरीची एकांतांत गांठ पडतांच रावणानें तिला त्या अमूल्य रत्नांची हकीगत सांगितली. मंदोदरीच्या मनांत त्या रत्नांबद्दल प्रेम उत्पन्न होऊन ती लागलीच त्या पेटीकडे गेली. मंदोदरी ती रत्नांची पेटी उचलूं लागली तों ती तिला हालेना. एवढीशी पेटी इतकी जड कशी झाली याबद्दल मंदोदरीस मोठें आश्चर्य वाटलें. तेव्हां ती रावणाकडे जाऊन पेटीचा मजकूर सांगूं लागली. तिच्या बोलण्याचें आश्चर्य करून रावण स्वतः ती पेटी उचलूं लागला. त्यानें आपली सर्व शक्ति खर्च केली तरी त्यालाही ती पेटी उचलेना. त्यानें लागलीच आपले चतुर प्रधान बोलावून आणून त्यांस तो पेटीचा मजकूर सांगितला. प्रधानांच्या विचारानें

त्यानें ती पेटी उघडून पाहिली तों त्या पेटींत रत्नें नसून त्यांच्या ऐवजीं सहा महिन्यांची एक कन्या आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. हें कांहीं तरी विघ्न आहे असें ठरवून रावणानें त्या कन्येचा घात करावा असें योजिलें. रावणाचें मिथिलेचा राजा महात्मा जनक याच्याशीं बरें नव्हतें. त्याचें कांहींतरी अनिष्ट व्हावें या मतलबानें रावणानें आपलया सेवकांकडून ती पेटी जनकाच्या राज्यांत नेऊन पुरण्यास सांगितलें. रावणाच्या आज्ञेप्रमाणें सेवकांनीं ती पेटी उचलण्याचा प्रयत्न केला त्यावेळीं त्यांना ती जड लागली नाहीं. त्यांनीं ती पेटी उचलली आणि मिथिलानगरीजवळच्या एका शेतांत पुरून टाकिली.

पद्माक्षराजाचा देहपात झाल्यानंतर तो मिथिलानगरींत एका ब्रह्मकुलांत उत्पन्न झाला. तो वेदाध्ययन करून मोठा विद्वान झाला. त्याची विद्वत्ता जाणून जनकानें त्याला कांहीं जमीन आंदण दिली होती. रावणाच्या सेवकांनीं ज्या शेतांत ती पेटी पुरली तें शेत त्या ब्राह्मणाच्याच जमिनींत होतें. तो ब्राह्मण तें शेत नांगरींत असतां त्याला ती पेटी सांपडली. जमिनींत सांपडलेला ठेवा आपला नव्हे असें समजून तो ब्राह्मण ती पेटी घेऊन जनकाकडे गेला आणि त्यास ह्मणाला, " राजा; माझ्या जमिनींत ही पेटी सांपडली आहे. हिच्यावर तुझीच मालकी आहे. हिचा तूं स्वीकार कर. "

ब्राम्हणाचें बोलणें ऐकून राजाला त्याच्या इमानाबद्दल संतोष वाटला. त्यानें सर्व सभासदांच्या देखत ती पेटी उघडून पाहिली तों त्यांत एक पांच वर्षांची दिव्य कन्या आहे असें पाहून राजा चकित् झाला. त्या कन्येचें असंभाव्य तेज व लावण्य पाहून राजाला तिच्याबद्दल अपत्यमोह उत्पन्न झाला. राजानें ती आपली स्वतःचीच कन्या समजून त्या कन्येचा स्वीकार केला. राजाला ती दिव्य कन्या प्राप्त झाली म्हणून सर्वांना आनंद वाटला. राजानेंही कन्याप्राप्तिबद्दल

सर्व नगरांत मोठा उत्साह केला. ही कन्या ह्मणजेच देवी सीता होय. रावणाचा वध इच्छून जगाला पातिव्रत्यधर्माचें ज्ञान करून देण्याकरितां ती साक्षात् इंदिराच सीतेच्या रूपानें भूलोकीं अवतीर्ण झाली होती.

सीता लहानपणीं अनेक अद्भुत कृत्यें करूं लागली तेव्हां कन्येचा पराक्रम पाहून जनकराजाला अतोनात हर्ष होत असे. सीता लहान असतांना एकदां परशुराम जनकाच्या घरीं आले. भार्गवरामानीं ज्या त्र्यंबक-धनुष्यानें एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली तें यावेळीं त्यांच्या बरोबर होतें. भार्गवानें तें धनुष्य बाहेरच्या अंगास ठेविलें आणि भोजन करण्याकरितां तो जनकाबरोबर घरांत गेला. भोजन आटोपून ते दोघे बाहेर येतात तों भार्गवाचें धनुष्य ठेवलया ठिकाणाहून नाहींसें झालें होतें. आपलें धनुष्य कोणीं तरी पळविलें असें जाणून परशुरामास राग आला. जनकराजा व परशुराम धनुष्याचा शोध करूं लागले. ते दोघे दरवाजाबाहेर येऊन पाहतात तों जानकी त्या धनुष्याचा घोडा करून बाळलीला करीत आहे असें दिसतांच परशुराम आश्चर्यभरित झाला. सीतेचें सामर्थ्य जाणून भार्गवराम संतोष पावला. त्यानें तें धनुष्य तेथेंच ठेविलें आणि जनकराजाला सांगितलें, "हे मिथिलाधीश जनका; ही तुझी कन्या महान् भाग्यवती आहे. जो राजपुत्र हें धनुष्य उचलील व ह्याला गुण लावील त्यालाच ही कन्या अर्पण करावयाची असा तूं हिच्या स्वयंवराबद्दल पण कर."

इतकें सांगून भार्गवराम निघून गेला. जनकानें त्याची आज्ञा शिरसा वंद्य मानली. पुढें सीता जेव्हां स्वयंवरास योग्य झाली त्यावेळीं जनकानें शेंकडों राजपुत्रांना निमंत्रणें पाठवून आपला पण कळविला. जनकाच्या आमंत्रणाप्रमाणें देशोदेशींचे अनेक राजे आपापल्या इतमामासह मिथिलानगरांत प्राप्त झाले. जनकाच्या घरचें स्वयंवराचें वर्तमान कळून विश्वामित्रमुनी दशरथाचा मुलगा राम व लक्ष्मण यांना घेऊन

मिथिलानगरींत प्राप्त झाले. स्वयंवरमंडपांत सर्व राजे आपापल्या दर्जाप्रमाणें स्थित झाले. असंख्य ऋषिमंडळी आपापल्या आसनावर बसली. कौशिकमुनि रामलक्ष्मणांना घेऊन ऋषिमंडळींतच जाऊन बसले.

अशाप्रकारें सर्व मंडप गजबजला आहे तों जनककन्या सीता हत्तिणीवर बसून त्या स्थळीं प्राप्त झाली. ती यावेळीं उपवर झाली असल्यानें फारच मोहक दिसत होती. तप्तसुवर्णाप्रमाणें तिचा सर्व देह शोभायमान दिसत होता. तिचे नेत्र आकर्ण असून तिच्या प्रसन्न मुखचंद्राची कांति अवर्णनीय होती. तिच्या दंतपंक्तीचें तेज हिऱ्याप्रमाणें लकाकत होतें. तिनें कानांत, मस्तकावर, अमूल्य अलंकार धारण केले होते. तिच्या अंगावरील मोत्यांचें तेज गुरुशुक्राच्या चांदण्यांनाही मागें सारीत होतें. तिचें एकंदर सौंदर्य पाहिलें असतां तिच्यावरून शेंकडों मदनांचें सौंदर्य ओवाळून टाकावें अशी ती मनोहर दिसत होती. अशा प्रकारची ती चित्कळा सीता सर्व सभा अवलोकन करून आपल्या सखीला ह्मणाली, " त्या ऋषिमंडळींत घनश्याम सावळी अशी जी मूर्ति बसली आहे तिच्या चरणीं माझें मन जडलें आहे. तो राजपुत्र जर मला प्राप्त होईल तर मी धन्य होईन." इतकें बोलून सीता श्रीरामचंद्राकडे बोट दाखवून आपल्या सखीशीं भाषण करीत आहे तों विश्वामित्राच्या सूचनेवरून जनकानें तें शिवचाप सभारंगामध्यें उचलून आणविलें. तें चाप इतकें जड होतें कीं, तें ओढून आणण्यास एक हजार वीर लावूनही भागलें नाहीं. असें तें शिवचाप पाहतांच सर्व राजांचें मन दचकलें. त्या चापाचें वर्णन करून जनकानें आपला पण बोलून दाखविला. तो ऐकतांच सर्व नृपती तटस्थ झाले. त्याला गुण लावण्यास कोणीच तयार होईना. इतक्यांत त्या ठिकाणीं लंकेचा अधिपति रावण आपल्या प्रधानांसह आगंतुकाप्रमाणें धावून आला. रावणास पाहतांच बहुतेक राजे घाबरून गेले. रावण त्या चापा-

शेजारीं उभा राहून जनकास म्हणाला, " राजा, मी तुझा पण जिंकीन याबद्दल तुझी खात्री असूं दे. अरे, मीं आपल्या हातांनीं कैलासपर्वत गदगदां हालविला आहे. मी ही सारी पृथ्वी उचलून समुद्रांत फेंकून देईन मग या चापाची माझ्यापुढें काय प्रतिष्ठा आहे? " अशी वल्गना करून रावणानें आपलीं वस्त्रें व अलंकार सावरून चापास हात घातला. रावणासारखा दुष्ट राक्षस तें चाप उचलील तर आपण रामचरणास अंतरूं असें वाटून सीता फार दुःखित झाली. रावणाला तें धनुष्य उचलूं नये ह्मणून सीतेनें अनेक दैवतांची प्रार्थना केली. तिचा भाव जाणून हजारों दैवतांनीं त्या चापावर आपला भार घातला. दशाननानें आपलें सर्व बळ खर्च केलें तरी त्यास तें चाप हालेना. तसाच निर्धार करून रावणानें आपली सर्व शक्ति आपल्या वीस हातांच्या ठिकाणीं आणली आणि दांत ओठ चावून तो तें चाप उभें करूं लागला. त्यानें तें धनुष्य कांहीं उचललें पण त्याचें वजन न झेपल्या-मुळें तें शिवधनुष्य कलंडलें आणि रावणाच्या छातीवर पडलें. रावण भूतलावर पडतांच जमिनीवरील धूळ उडाली आणि रावणाचीं दाहीं तोंडें धुळीनें भरून गेलीं. त्या त्र्यंबकचापाच्या भारानें रावणाच्या तोंडांतून रक्त वाहूं लागून तो घाबरा झाला. आपल्या उरावरील तें चाप बाजूला काढण्यासाठीं तो आरोळ्या मारूं लागला. तें भवचाप दूर करण्यास समर्थ असा वीर सभेंत नाहीं असें पाहून जनकराजाही घाबरला. तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, " हें शंकराचें चाप उच-लून माझा पण जिंकण्याकरितां या सभेमध्यें कोणीच तयार नाहीं त्या अर्थीं आज सर्व पृथ्वी निर्वीर झाली आहे असें मी निःशंकपणें ह्मणतों. "

जनकाचे हे शब्द ऐकतांच विश्वामित्र मुनीनीं श्रीरामचंद्रास खूण केली. मुनींकडून इशारा मिळतांच रामचंद्र उभा राहिला. रात्र संप-तांच जसा सूर्य उदयाचलावर येतो किंवा यज्ञांतील पूर्णाहुती होतांच

आराध्यदैवत प्रगट होतें त्याप्रमाणें रामचंद्रास उभा राहिलेला पाहून सर्व नृपगण एकमेकांकडे टकमक पहात राहिले. रामचंद्रानें विश्वामित्राच्या चरणावर मस्तक ठेवून इतर ब्रह्मवृंदांना वंदन केलें. रामचंद्राची सावळी सुकुमार मूर्ति पाहतांच सीतेचें मन घाबरें झालें. भार्गवचापासारखें अवजड धनुष्य उचलतांना रामचंद्राच्या नाजुक ह्यातांना कष्ट पडतील म्हणून ती दुःखित झाली. तिनें आपल्या मनानें रामचंद्रास वरिलें होतें. रामचंद्रावांचून जगांतील सर्व पुरुष तिनें पित्यासमान मानले होते. बापाच्या पणाप्रमाणें सुकुमार रामचंद्राला तें शिवकोदंड उचललें नाहीं तर आपण रामाला अंतरूं असें वाटून ती पित्याच्या भयंकर पणाला दोष देऊं लागली. बापानें पणाचा त्याग करून आपणास तसेंच रामचंद्राच्या पदरांत टाकावें अशी तिनें सखीजवळ आपली इच्छा प्रगट केली. पण तिच्या त्या इच्छेस त्यावेळीं रामावांचून कोण जुमानणार ? आपल्या चरणींच तिचें चित्त जडलें आहे हें ओळखून रामचंद्र दंड थोपटून कोदंडाजवळ आला. त्यानें आपलें वस्त्र खोंवलें व एखादा हत्ती जसा केवळ लीलेनें उसाची मोळी मोडतो त्याप्रमाणें त्या दशरथसुत श्रीरामचंद्रानें तें प्रचंड चाप उचलून रावणास सोडविलें. जनकाचा पण जिंकण्याकरितां त्यानें त्या चापास सित लावून तें ओढलें. श्रीराम हा प्रत्यक्ष वैकुंठाधीश भगवानच असल्यानें त्याच्या सामर्थ्यापुढें त्या चापाचें काय चालणार! रामचंद्रानें दोरी ओढतांच तें प्रचंड चाप मोडून गेलें. रामप्रताप पाहून त्याच्यावर देवांनीं पुष्पवृष्टी केली. आपल्या छातीवरील चाप निघतांच रावण लज्जायमान होऊन पळून गेला. चापाचे दोन तुकडे केलेले पाहून सर्व राजे रामाचें यश वर्णन करूं लागले. आपला शिष्य विजयी झाला हें पाहून विश्वामित्रांनीं धांवत जाऊन रामचंद्रास पोटाशीं धरिलें. इतक्यांत लावण्यवती सीता हत्ति-

णीवरून खालीं उतरली व हंसगतीनें चालत जाऊन तिनें रामचंद्राच्या गळयांत माळ घातली. रामाच्या गळयांत माळ पडतांच वाद्यांची एकच गर्दी उसळली. सर्व ऋषि मंगलकारक आशिर्वाद उच्चारूं लागले. जनक आणि विश्वामित्र यांनीं अयोध्येला कुंकुममंडित पत्रें पाठविलीं. पत्रांतील मजकूर कळतांच दशरथ व वसिष्ठ यांचा हर्ष गगनांत मावेना. दशरथराजा आपल्या सर्व परिवारासह मोठ्या थाटानें मिथिलेस गेला. जनकानें त्यांचें स्वागत करून रामपराक्रम वर्णन केला. त्यानें त्या समयीं अद्भुत सोहळा करून श्रीरामचंद्रास सीता अर्पण केली. याचसमयीं रामाचे बंधु लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांचीं लग्नें झालीं. सीतेच्या चुलत बहिणी उर्मिळा, मांडवी व श्रुतकीर्ति यांच अनुक्रमें लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांच्या भार्या झाल्या. त्यावेळीं अपूर्व समारंभ झाला. जनकानें आपल्या जामातास अक्षय्य भांडारें अर्पण केलीं. लग्न सोहळा उरकल्यानंतर रामाची आई कौसल्या व दशरथाच्या इतर राण्या यांसहवर्तमान जनकानें सर्वांना देणग्या दिल्या. जनकाचें औदार्य पाहून सर्वांना समाधान वाटलें. मिथिला नगरीहून सर्वांची बोळवण होऊन दशरथ पुत्र व स्नुषा यांसहवर्तमान अयोध्येस गेला. श्रीरामचंद्राचें दर्शन घेण्याकरितां सर्व अयोध्या लोटली. दशरथानें अपूर्व थाट करवून अयोध्येंत प्रवेश केला. रामचंद्र व सीता यांचा विवाह झाला याबद्दल आनंद व्यक्त करण्याकरितां दशरथानें आपलें सर्व भांडार गरीब याचकांना वाटून टाकलें. सर्व लोकांना सीतारामाचें जोडपें पाहून आपलें कुळ उद्धरलेंसें वाटूं लागलें. रामाचा पराक्रम व सीतेची रामनिष्ठा ध्यानांत आणून जो तो जनकराजा व सूर्यवंश यांची वाखाणणी करीत राहिला.

आपला जेष्ठ पुत्र श्रीराम हा सर्व विद्यापारंगत झाला आहे असें जाणून दशरथानें त्याला गादीवर बसविण्याची योजना केली.

कुलगुरु वसिष्ठऋषि यांना राजाचा विचार पसंत पडून त्यांनीं राज्याभिषेकाची सर्व तयारी करविली. रामाला सिंहासन प्राप्त होणार ह्मणून सर्व लोकांना अतिशय आनंद वाटला. नगरीमध्यें मोठा सोहळा सुरू झाला. मोठमोठे मंडप व ध्वज उभारून सर्व नगर श्रृंगारण्यांत आलें. हा सर्व मंगलकारक देखावा पाहून कैकयीची दासी मंथरा हिचें पित्त खवळलें. वसंतामध्यें कोकिळेचा स्वर ऐकून जसे कावळ्यांना दुःख होतें, सिंहाचा पराक्रम ऐकून कोल्हे जसे उगीचच संतापतात, धार्मिक मनुष्यांच्या धर्मलीला पाहून अपवित्रांना रिकामाच खेद उत्पन्न होतो त्याप्रमाणें रामराज्याभिषेकाचा उत्साह पाहून मंथरा संतापली. तिनें त्या शुभ कार्यांत विघ्न आणण्याचा निश्चय केला. ती रागानें लाल होऊन पाय आपटीत आपल्या यजमानणीच्या महालांत गेली. तिची मालकीण कैकयी ही दशरथाची विहित पत्नि असून दशरथाचें तिच्यावर अत्यंत प्रेम असे. देवदैत्यांचें युद्ध चाललें असतांना एकदां देवांनीं दशरथाला आपल्या बाजूनें लढाई करण्यास नेलें होतें. त्यावेळीं ऐन युद्धाच्या प्रसंगीं दशरथाच्या रथाचा कणा मोडला असतां कैकयीनें आपला हात घालून रथ सावरल्यामुळें त्या युद्धांत दशरथ विजयी झाला. अशा प्रकारें रथ सावरण्यास ती समर्थ होईल असा कैकयीला पूर्वीं वर मिळालेला होता. आपल्या जयश्रीचें सर्व श्रेय कैकयीकडेच आहे असें समजून दशरथास परम आनंद वाटला. त्यानें प्रसन्न होऊन कैकयीला दोन वर अर्पण केले; परंतु, तिनें त्यावेळीं वर मागून न घेतां ते तसेच शिलक ठेविले. या वेळेपासून दशरथराजा कैकयीच्या अगदीं अधर्या वचनांत असे.

दशरथराजाला कौसल्या, सुमित्रा व कैकयी अशा मुख्य तीन बायका होत्या. त्यांच्या पोटीं श्रीराम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न अशी अनुक्रमें संतती झाली होती. रामचंद्रास अभिषेक होण्याच्या प्रसंगीं

कैकयीचे पुत्र भरत व शत्रुघ्न हे आपल्या मातुलगृहीं गेले होते. मंथरा दासी रामाच्या द्वेषानें खवळून कैकयीच्या मंदिरांत गेली. या समयीं कैकयी आपल्या मंदिरांत दोन दासींसह गप्पागोष्टी करीत बसली होती. मंथरा तेथें जातांच तिनें त्या दासींना तेथून हाकून देण्याविषयीं कैकयीला सूचना केली. कैकयीचें मंथरेवर अत्यंत प्रेम असल्यामुळें कैकयीनें त्या दासींना तेथून जाण्यास सांगितलें. दासी निघून गेल्या-नंतर एकांतांत मंथरा एकाएकीं रामाची निंदा करूं लागली. तिच्या तोंडचीं अभद्र भाषणें ऐकून कैकयीला आश्चर्य वाटलें. तिनें मंथरेला तिच्या संतापाचें कारण विचारलें. मंथरेच्या अंगांत कली शिरला अस-ल्यानें ती रामाला शिव्याशाप देऊं लागली. तेव्हां कैकयी तिला दटावूं लागली. कैकयी अशानें वळणार नाहीं असें पाहून मंथरेनें आकर्त-ळेपणा आरंभिला. तिनें धाडकन् आपलें अंग धरणीवर टाकून दिलें. तिला सावरण्याकरितां कैकयी घाईघाईनें तिच्याजवळ जाऊन तिचें डोकें आपल्या मांडीवर घेऊन बसली. मंथरेला स्पर्श करीपर्यंत कैकयीची बुद्धि चांगली होती. मंथरेला स्पर्श करितांच तिच्या अंगांत कलीचें वारें शिरून तिच्या बुद्धीस भ्रंश झाला. ती श्रीरामाची द्वेष्टी बनली ती आपल्या मुखानें रामचंद्र आणि सीता यांना शिव्या देऊं लागली. तेव्हां आपलें इच्छित कार्य झालें असें समजून मंथरा सावध होऊन उठली. तिनें लागलीच कैकयीच्या मनांत भरताला गादीवर बसवि-ण्याची प्रेरणा केली. मंथरेचें कपटभाषण खरें वाटून कैकयी रामाच्या नाशास प्रवृत्त झाली. दशरथ, वसिष्ठ यांसारख्या महाजनांच्या विरुद्ध चालविलेली मसलत सिद्धीस जाणें दुर्घट आहे असें जाणून कैकयी चिंताक्रांत दिसूं लागली. तिची चिंता जाणून मंथरा तिला ह्मणाली, "आपलें कार्य कसें पार पडेल याची काळजी करण्याचें बिलकुल कारण नाहीं. मी तुह्माला एक नामी युक्ति सांगतें. आपले दशरथ

राजाजवळ जे दोन वर येणें आहेत ते यावेळीं मागून घ्या. एका वरानें रामाला चौदा वर्षें वनवासास पाठवा आणि दुसऱ्या वरानें भरताला राज्याभिषेक करवा. ”

मंथरेची ही मसलत कैकयीला पसंत पडली. दोघींचा असा विचार ठरून मंथरा निघून गेली. कैकयीनें लागलीच आजारी पडल्याचें सोंग घेतलें. तिनें शय्येचा त्याग करून दागदागिना काढून टाकला. ती भुईवर लोळूं लागली. ही बातमी दशरथाला समजून तो तावड-तोब तिच्या महालांत आला. तिची अवस्था पाहून राजाचें चित्त कळवळलें. त्यानें आपल्या हातांनीं तिला उठवून मंचकावर बसविलें. तिला धीर देऊन तो तिला तिच्या दुःखाचें कारण विचारूं लागला. तिनें कौशल्यपूर्ण भाषण करून राजाचें मन मोहिलें. तिनें रागाचा आविर्भाव आणून राजाचें मन भारून टाकलें. तिच्या दांभिक भाष-णास भुलून दशरथराजा तिला वाटेल तें देण्यास प्रवृत्त झाला. तिनें त्याला मागील आठवण देऊन आपले वर पूर्ण करण्याविषयीं सांगि-तलें. राजा वरदान पूर्ण करण्यास सिद्ध आहे असें पाहतांच तिनें त्यास ठरल्याप्रमाणें सांगितलें. रामचंद्राला वनवासास पाठविण्याचें उद्गार ऐकतांच राजा मूर्छा येऊन खालीं पडला. तो वृत्तांत सुमंत प्रधानास कळून तेथें अनेक मंत्री प्राप्त झाले. त्यांनीं राजाला सावध केलें. राजानें कैकयीची पुष्कळ समजूत केली तरी कांहीं केल्या ती आपला हट्ट सोडीना. शेवटीं दशरथराजा भरताला राज्याभिषेक करण्यास कबूल झाला; पण रामचंद्राला वनवासास पाठविण्यास मात्र तो कबूल होईना. रामवियोगानें आपला अंत होईल असें त्यानें स्पष्ट-पणें सांगून कैकयीचें मन वळविण्याचा यत्न केला. परंतु, कैकयी विकल्पानें व्यापली असल्यानें तिची समजूत होईना. ती बेफामपणानें राजासकट सर्वांना शिव्याशाप देऊं लागली. प्रधान, मंत्री वगैरे

मंडळींनींही तिची समजूत चालविली; पण राजालाही जी जुमानीना ती त्यांना काय विचारणार ? अखेर तिच्या हट्टाप्रमाणें दशरथानें रामाला वनवासास पाठविण्याचा निश्चय केला. भरताला गादीवर बसविण्याकरितां त्यानें आपल्या सासुरवाडीस सेवक पाठवून त्याला अयोध्येस येण्याची विनंति केली.

इतका प्रकार होऊन दशरथ तेथून जाऊं लागला; पण रामवियोगाचें दुःख पुढें उभें राहून तो पुन्हां बेशुद्ध होऊन तेथेंच पडला. हा सर्व प्रकार रामाला विदित होतांच तो लक्ष्मणासह तेथें धावून आला. राजा मूर्छित पडलेला पाहतांच रामानें त्याला मांडी दिली. राजाच्या दुःखाचें कारण काय असा रामानें प्रश्न करतांच कैकयीनें त्याला सर्व वृत्तांत स्वतः सांगितला. कैकयीच्या मुखांतील शब्द ऐकतांच राम आनंदानें ह्मणाला, “ याबद्दल राजाला दुःख करण्याचें कारणच नाहीं. माझा पिता वचनबद्ध झाल्याकारणानें मला वनवास प्राप्त होत आहे त्या अर्थी पितृवचनाकरितां वनवासच काय पण वाटेल तो अवघड प्रसंग मी आनंदानें स्वीकारीन. कैकयी ही माझी माता आहे. तिच्या आज्ञेचा भंग करणें उचित नव्हे. मी याच पावली वनवासास जाण्यास तयार आहें.”

असें सांगून रामानें दशरथ व कैकयी यांना वंदन केलें. रामचंद्र वनास जाण्याला तयार झाला आहे हें पाहतांच त्याची सख्खी आई कौसल्या त्या ठिकाणीं धावून आली. रामचंद्राचें मुख पाहतांच त्याच्या वियोगकल्पनेनें तीही बेशुद्ध होऊन पडली. रामानें धांवत जाऊन तिला सावध केली. कौसल्या अनेकप्रकारें शोक करूं लागली. तेव्हां रामानें तिला सांगितलें, “ मातोश्री, आपण शोक करणें इष्ट नाहीं. माझा पिता दशरथराजा हा वचनानें बद्ध झाला आहे. त्याला वचनमुक्त करण्याकरतां मी दंडकारण्यांत जातों आहें. पित्याचें वचन पाळणें हें माझें पुत्राचें कर्तव्य आहे. आपणही मला वनास जाण्याला आज्ञा द्या ह्मणजे

दशरथाला वचनमुक्त करण्यास आपणही सहाय्य केलें असें होईल. पूर्वेचा सूर्य पश्चिमेला उगवेल पण मी पितृवचन मोडणार नाहीं."

रामाचा निश्चय जाणून कौसल्या तशीच विलाप करीत राहिली. दशरथराजाही सावध होऊन शोकानें अश्रु गाळूं लागला. प्रधान, मंत्री वगैरे सर्व मंडळी दीन वदन होऊन रडूं लागली. त्या सर्व दुःखद स्थितीस कैकयी कारण आहे असें जाणून लक्ष्मणानें डोळे आरक्त केले. त्यानें आपली तरवार उपसली आणि तो त्या दुष्ट कैकयीची खांडुळी करून सर्व दुःख निवारण करण्यास उद्युक्त झाला. कैकयीचें शिर उडविण्याबद्दल तो रामाजवळ आज्ञा मागूं लागला. तेव्हां श्रीरामचंद्र ह्मणाला, "बा लक्ष्मणा, अरे, वनवासच काय; पण प्राणांत होत असेल तरीही सहसा विपरीत कर्म करण्यास मनुष्यानें सरसावूं नये. कसेंही असलें तरी कौसल्या व सुमित्रा यांच्याप्रमाणें ही कैकयी देखील आपली माता आहे. आईनें आपलें कर्तव्य सोडलें किंवा राखलें तरी त्याचा विचार आपणास कर्तव्य नाहीं. पुत्र या नात्यानें आपण आपलें कर्तव्य जाणलें पाहिजे. आईचा वध करून आपल्याला कधीं तरी सद्गति मिळेल काय?"

अशाप्रकारें बोध करून रामानें लक्ष्मणाचें निवारण केलें व त्यानें हरप्रकारें समजूत घालून कौसल्येचीही परवानगी मिळविली. सुमित्रेनें रामाची विनंति करून लक्ष्मणालाही वनवासास नेण्यास सांगितलें. वनवासामध्यें बंधुसेवा घडून रामालाही सहाय्य होईल या हेतूनें लक्ष्मणानें रामाबरोबर वनांत जाण्याची तयारी केली. नंतर सीतेची आज्ञा घेण्याकरितां ह्मणून राम तिच्या मंदिरांत गेला. सीतेला या सर्व प्रकाराची बातमी लागून ती आधींच डोळे लाल करून घेऊन बसली होती. पतीची मूर्ति पाहतांच सीतेच्या नेत्रांतून अश्रुबिंदु गळूं लागले. तिची चिंताक्रांत मुद्रा पाहून राम ह्मणाला, " मी लक्ष्मणासह वनवासास जात आहें. आह्मी परत येईपर्यंत तूं कौस-

ल्येची सेवा करून आनंदानें रहा. कौसल्या व सुमित्रा यांच्याप्रमाणेंच तूं कैकयीशीं सलोख्यानें वाग. आपल्या बापाच्या घरीं जाऊं नकोस. तुला मी बरोबर नेली असती; पण दंडकारण्य फार भयंकर आहे. तूं नाजुक आहेस. तुला अरण्यांतील कष्ट सोसणार नाहींत. तुझे फार हाल होतील. आह्मी चौदा वर्षांनीं परत येऊं तों पावेतों तूं सुखानें येथेंच रहा."

पतीचें हें भाषण एखाद्या भिकार कल्पनेच्या स्त्रियेला चांगलेंच रुचलें असतें; पण जानकीची गोष्ट तशी नव्हती. जगतांतील स्त्रियांना पातिव्रत्य धर्माचें वळण लावण्याकरितांच ती अवतीर्ण झाली होती. ती आपल्या पतीला आपलें दैवत समजत होती. ती महान् साध्वी होती. पतीचें भाषण ऐकतांच ती सद्गुणसंपन्न जानकी ह्मणाली, "हे जगद्वंद्य श्रीरामा, आपण मला टाकून जाऊं नका. जलानें जलचरांचा त्याग केला तर तीं जिवंत राहणें शक्य आहेत काय ? आकाशावांचून पक्षीगण संचार कसा करणार ? दीपावांचून प्रभेला अस्तित्व तरी आहे कां? सोन्यापासून त्याची कांती कधीं तरी अलग झालेली ऐकली आहे काय ? शिवशक्तीचा वियोग संभवनीय आहे कां ? किरणें कधींही सूर्याचा त्याग करीत नाहींत. साधूच्या हृदयावांचून सुविचार अन्य कशाचाही आश्रय करीत नाहीं. रत्नाला त्याची कळा कधींही सोडीत नाहीं. गोडीनें गुळाचा कधींही त्याग केला नाहीं. कस्तुरीनें आपल्या परिमळास कधींहि सोडलें नाहीं. हा विचार ध्यानांत आणून आपण माझा त्याग करूं नका. अरण्यांतील वास कितीहि भयप्रद असला तरी सिंहाबरोबर वनसंचार करण्यांत सिंहिणीला भय कशाचें ?"

सीतेचें भाषण ऐकून रामचंद्राला हर्ष झाला. त्यानें तिला वसिष्ठ-गुरूची आज्ञा घेण्यास सांगितलें. तिचा आचारधर्म ध्यानांत आणून वसिष्ठांनीं रामचंद्राला तिला बरोबर नेण्याविषयीं सांगितलें. नंतर राम-चंद्रानें विप्रवर्गास अपार संपत्ती दान केली आणि ते त्रिवर्ग रथावर

चढून वनप्रयाणास निघाले. रामाच्या वियोगानें अयोध्येंत एकच गोंधळ उडाला. दशरथराजा वक्षस्थळ बडवून घेऊं लागला. कौसल्या, सुमित्रा व दशरथाच्या इतर स्त्रिया आक्रांत करूं लागल्या. सर्व जन अश्रुपात करूं लागले. जो तो कैकयीला शिव्या देऊं लागला. अयोध्या नगरी ओस दिसूं लागली. कुडींतून प्राण जावा त्याप्रमाणें अयोध्येंतून सीताराम निघतांच ती राजधानी प्रेतवत् दिसूं लागली. नगरवासी जन रथामागें पळत सुटले. रामचंद्रानें सर्वांचें सांत्वन केलें. चौदा वर्षें संपवून आपण खास परत येतों असें आश्वासन देऊन रामानें मातापित्याचें सांत्वन केलें. अशाप्रकारें तो महात्मा सत्पुत्र श्रीरामचंद्र लक्ष्मण व जानकी यांसह वनवासाकरितां अयोध्येच्या बाहेर पडला.

अयोध्येचा त्याग करून रामचंद्र बाहेर पडल्यावर त्यानें जान्हवीच्या तीरावर एका वडाच्या झाडाखालीं मुक्काम केला. त्याठिकाणीं त्याचा परम भक्त गुहक याची गांठ पडली. त्याला जान्हवी ओलांडून जावयाचें होतें. त्यानें गुहकाकडून एक नाव आणविली. त्या नावेंत बसून राम, सीता व लक्ष्मण हे तिघेजण परतीरास गेले. येथपावेतों सुमंतप्रधान रामाबरोबर होता. भागीरथीच्या परतीरास राम जाऊन पोहोंचल्यानंतर सुमंत अयोध्येस परत गेला. त्यानें दशरथाला रामचंद्राची हकीकत कळविली. दशरथ विरहानळानें होरपळतच होता. सुमंत परत येऊन त्याच्याकडून राम वनांत गेल्याचें खात्रीलायक वृत्त कळतांच दशरथ व्याकूळ झाला. त्यानें अन्नपाण्याचा त्याग केला. रामचंद्राचा वियोग असह्य होऊन शेवटीं त्यानें श्रावणाच्या शापाप्रमाणें ' राम राम ' असें ह्मणूत प्राण सोडला.

दशरथाच्या मागून गादीवर भरताची स्थापना करण्याकरितां कैकयीनें तयारी चालविली होती. दशरथाच्या मृत्यूचें वर्तमान समजतांच भरत आपल्या आजोळाहून अयोध्येस आला. त्यानें राजाचें

और्ध्वदेहिक कर्म केलें. तो रामभक्त असल्यानें गादीचा स्वीकार करीना. कैकयीनें त्याची पुष्कळ समजूत केली तरी तो धर्मशील भरत सिंहासनाचा स्वीकार करीना. इतकेंच नव्हे तर त्यानें कैकयीच्या कृष्णकारस्थानाबद्दल तिची फारच निर्भर्त्सना केली. रामाच्या विरुद्ध कैकयीचें मन बिघडविणाऱ्या मंथरेला त्यानें कडक शासन केलें. तो रात्रंदिवस रामाचा ध्यास घेऊन बसला. अखेर रामाचें दर्शन घेण्याकरितां तो वनामध्यें गेला. त्याची व रामाची गांठ पडतांच भरतानें रामचरणास मिठी मारली. रामानें त्याला राज्यपद स्वीकारण्याचा आग्रह केला. पण राम हाच गादीचा यथाशास्त्र अधिकारी असल्यानें भरत राज्याधिकाराचा स्वीकार करीना. इतकेंच नव्हे तर तो रामचरण सोडून जाण्यासही नाखुष दिसला. अखेर रामानें त्याची समजूत करून त्याला आपल्या पादुका दिल्या. भरतानें त्या पादुकांचीच सिंहासनावर स्थापना केली. त्यानें आपल्या प्रधानमंडळीकडून रामाच्या नांवानें राज्यकारभार चालविला. तो स्वतः नंदिग्रामांत जाऊन समागमनावर हेतु ठेऊन तपश्चर्या करीत बसला.

सुमंत निघून गेल्यानंतर रामचंद्रानें पुष्करिणीवर एक रात्र काढली नंतर तो प्रयागास गेला. तेथून तो भारद्वाज आश्रमांत गेला. भारद्वाजांनीं त्याचा सत्कार करून त्यास चित्रकूट पर्वतावर लावून दिलें. तेथें एक पर्णकुटिका बांधून रामानें त्यांत वास्तव्य केलें. रामचंद्र त्या ठिकाणीं आपलीं सर्व नित्य कर्में करीत असे. एके समयीं रामचंद्र हवन करीत असतां सती सीता आश्रमाच्या दारांत उभी होती. यावेळीं सुदर्शन गंधर्व आकाशांतून संचार करीत होता. सीतादेवी त्याच्या दृष्टीस पडतांच सुदर्शनाच्या मनांत तिच्याविषयीं पाप उत्पन्न झालें. त्यानें अमंगळ कावळ्याचें रूप धरून तिच्यावर झडप मारली. पतंग आपलें मरण विसरून दिव्यावर

झाप टाकतो त्याप्रमाणें सुदर्शनानें झाप टाकतांच सीतेनें आपलें अंग धरणीवर टाकिलें आणि ती श्रीरामचंद्राला हांका मारूं लागली. रामचंद्रानें तो प्रकार पाहून एक दर्भ मंत्रून त्या कावळ्यावर सोडला. त्या दर्भानें सुदर्शनाचा पठलाग चालविला. दर्भाच्या भयानें तो दुष्ट भ्रमण करूं लागला. त्यानें इंद्र, ब्रह्मदेव, शंकर यांच्या लोकीं जाऊन त्यांचा आश्रय मागितला. त्या देवांतून त्याला कोणीही आश्रय देईना. शेवटीं तो नारदमुनीला शरण गेला. नारदानें त्याला रामाचे पाय धरण्यास सांगितलें. त्यानें हरेक प्रकारें रामाची स्तुति करून सीते-पुढें लोटांगण घातलें. तेव्हां रामानें दयाळू होऊन त्याचा एक डोळा फोडून त्याला प्राणदान दिलें. त्यानें आपल्या चोंचीनें सीतेला जी पीडा दिली त्याबद्दलचें प्रायश्चित्त म्हणून रामानें त्यास 'विष्ठा' हा आहार नेमून दिला.

नंतर त्या पर्वतावरील कित्येक ऋषींनीं रामाचें दर्शन घेतलें. त्यांनीं रामावताराचें भविष्य ध्यानांत आणून रामाला तें स्थळ सोडून दंडकारण्यांत जाण्याचा आग्रह केला. मुनींच्या उपदेशाप्रमाणें रामचंद्र आपली पत्नि सीता व बंधु लक्ष्मण यांसह दंडकारण्यांत निघून गेला. त्यानें अनेक ऋषींचीं दर्शनें घेतलीं. सवडीप्रमाणें प्रत्येक स्थळीं मुक्काम करीत आणि आपल्या दर्शनानें आपल्या भक्तांचा उद्धार करीत रामानें बहुत काळ काढला. नंतर तो सह्याद्री पर्वतावर अत्रीच्या आश्रमांत गेला. अत्रीची पत्नि अनसूया हिनें सीतेला यावेळीं अद्भुत पतिव्रताधर्म सांगितला. पतिव्रतेला पतिचिंतन व पतिसेवा यांवाचून अन्य पुण्याईची अपेक्षा नाहीं व पतिभक्ती-वांचून अन्य साधनसंभार श्रेयस्करही नाहीं असा अनसूयेनें सीतेला बोध करून तिला अक्षय्य हार, उटी, कुंकुम व वस्त्र अर्पण केलें. मग अत्रीचा निरोप घेऊन त्यांनीं रेणुकेचे दर्शन घेतलें. नंतर त्यांनीं आपला सर्व रोख दक्षिणदिशेकडे वळविला.

या दक्षिणभागांत अनेक राक्षसांची वस्ती होती. राम, लक्ष्मण व त्यांच्या मागें सीता अशा रीतीनें मार्गक्रमण चाललें असतां त्या ठिकाणीं विराध नांवाच्या राक्षसानें मागल्यामागेंच सीतेला पकडलें. एखादा चोर जसा लोकांच्या घरांतील धनकुंभ उचलून नेतो त्याप्रमाणें त्या भयंकर राक्षसानें सीतेला उचललें आणि तो पळून जाऊं लागला.

आपल्याला दुष्ट राक्षस उचलून नेत आहे हें जाणून सीता घाबरी झाली. तिनें दीनवाणीनें रामचंद्रास हांका मारल्या. पत्नीचा करुण स्वर ऐकतांच रामानें मागें पाहिलें. लक्ष्मणानें लागलीच बाण रोखला; पण एका क्षणाचाही विलंब न करतां तो नीच विराध सीतेला घेऊन त्या दाट अरण्यांत नाहींसा झाला. त्याचा शोध करण्याकरितां राम-लक्ष्मण हे दोघेही त्याच्या मागोमाग झाडींत धांवले. कांहीं वेळानें त्यांनीं विराधास गांठलें व वाऱ्याचेंही खंडन करण्यास समर्थ असे श्रीरामानें दोन बाण सोडून विराधाचा नाश केला. अशाप्रकारें सीतेची मुक्तता होऊन ते तिघे मार्गक्रमण करूं लागले. त्या भागांत राक्षसांचा उपद्रव फार हें जाणून ते आतां जानकीला फार जपूं लागले.

प्रवास करतां करतां त्यांनीं शरभंग, अगस्ति, सुतीक्ष्ण वगैरे ऋषिवर्यांचीं दर्शनें घेतलीं. अगस्तीच्या मसलतीप्रमाणें श्रीराम पंच-वटीस जाऊन पोंचला. वाटेनें त्याचा व जटायूचा योग होऊन जटायू त्याच्याबरोबर पंचवटीपर्यंत गेला.

पंचवटींत येतांच लक्ष्मणानें पर्णशाळा रचल्या. त्याच स्थळीं राहि-लेला काळ काढावयाचा असा त्यांनीं बेत ठरविला. लक्ष्मण हा वनां-मध्यें फिरून फळें आणावयास जाई त्यावेळीं रामचंद्र सीतेचें रक्षण करीत असे. रात्रीं लक्ष्मण हा जागा राहून आश्रमाचें संरक्षण करीत असे. अशाप्रकारें कालक्रमण चाललें असतां एक अपूर्व प्रकार घडला. एकदां लक्ष्मण फळें घेऊन आश्रमाकडे येत असतां वाटेनें त्याला

एक कळकाचें बेट दिसलें. या बेटांत शंबरी नांवाचा एक राक्षस काळखड्ग प्राप्तीकरतां तप करीत होता. त्याची उग्र तपश्चर्या पाहून अस्त्रदेवता भयभीत झाल्या. त्यांनीं शंबरीकरितां काळखड्ग पाठवून दिलें. तें आकाशांतून खालीं उतरतांच लक्ष्मणाच्या हातीं लागलें. लक्ष्मणानें तें चालवून पाहण्याकरितां तें कळकाचें बेट दुखंड केलें. त्या कृत्यांत लक्ष्मणाचा प्रहार शंबरीवर पडून त्याचा अंत झाला.

तो शंबरी राक्षस रावणाचा भाचा होता. रावणाची बहीण शूर्पनखा ही त्याची आई होय. शंबरीचा वध झाला त्या रात्रीं शूर्पनखेला कांहीं दुःस्वप्न पडल्यामुळें ती घाबरून आपल्या पुत्राकडे आली. शंबरीचा वध झाला आहे असें पाहतांच ती अतीशय खवळली. तिनें आपल्या बरोबर चार राक्षसी दासी ह्मणून आणल्या होत्या. आपल्या पुत्राला ठार मारणारा कोण असावा याचा शोध करीत असतां तिला त्या बेटाच्या आसपास मनुष्यांच्या पावलाच्या खुणा दिसल्या. या अरण्यांत असला घातकी मनुष्य कोण असावा याचा तपास करीत हिंडत असतां तिची व लक्ष्मणाची गांठ पडली. लक्ष्मणाचें सूर्यासारखें तेज पाहून तोच आपल्या पुत्राचा घातक असावा अशी शूर्पनखेनें बरोबर कल्पना केली. लक्ष्मणाचा नाश कपटानेंच केला पाहिजे असें जाणून ती रूपवान् राजकन्या बनली. त्या मनोहर अशा मायावी वेषानें ती लक्ष्मणापुढें लीन होऊन त्याला माळ घालण्याची आपली इच्छा दर्शवूं लागली. लक्ष्मण तिचा तसा स्वीकार करीना. त्यानें त्या कामीं रामाच्या परवानगीची अट घातली. तेव्हां शूर्पनखा रामाकडे गेली. रामानें तिचें कपट ओळखलें. त्यानें लक्ष्मणाला सांकेतिक भाषेनें पत्र लिहून तिचें नाक व कान कापण्यास सांगितलें. शूर्पनखा रामाचें पत्र घेऊन लक्ष्मणाकडे परत आली. लक्ष्मणानें पत्रांतील गुह्यार्थ ध्यानांत घेऊन तिचें नाक व कान कापून टाकले. त्यानें

तिला तेव्हां ठारही मारलें असतें; पण ती स्त्री असल्यामुळें अवध्य आहे असें समजून रामाज्ञेप्रमाणें त्यानें तिला जिवंत ठेविलें.

लक्ष्मणानें कान व नाक कापल्यामुळें विव्हल होऊन शूर्पनखा आरोळ्या मारीत पद्मपुराजवळ आली. तेथें त्रिशिरा, खर, दूषण वगैरे रावणाचे सेवक राहत होते. शूर्पनखेची व त्यांची गांठ पडून त्यांना रामलक्ष्मणाचें वर्तमान समजलें. तिच्या कैवारार्थ ते तिन्ही राक्षस रामलक्ष्मणावर चालून गेले. अमोघ पराक्रमी रामानें तुमुल युद्ध करून त्या तिघांसही मुक्ति देऊन टाकली. तिन्ही राक्षसांचा वध होतांच ती शूर्पनखा तेथून निघून रावणाकडे गेली. तिनें आकांत करून रावणाला आपल्या कैवारार्थ रामलक्ष्मणावर चालून जाण्यास सांगितलें. तिच्या नादीं लागून रावण रामलक्ष्मणांचा नाश करण्यास उद्युक्त होईना. तेव्हां रावणाला कसेंतरी करून रामाचा नाश करण्यास तयार केलें पाहिजे असा निश्चय ठरवून शूर्पनखेनें त्याचें मन वळविण्याकरितां निराळीच युक्ति योजली. त्रिशिरादि राक्षसांचा रामानें वध केला, हें वृत्त तिनें रावणाला कळवून त्याच्या मनांत त्याच्या पराक्रमाबद्दल अभिमान उत्पन्न केला. तिनें रामलक्ष्मणांच्या शौर्याचें वर्णन करून रावणाला लाजविलें, आणि त्यामुळें रावण ईर्षेस चढला. हें पाहून तिनें रावणाला सीतेच्या स्वरूपाचें वर्णन सांगितलें. सीतेचें सौंदर्यवर्णन ऐकून रावण मोह पावला. त्याच्या मनांत सीतेविषयीं अभिलाष उत्पन्न झाला. तो आपल्या पराक्रमाच्या बढाया सांगून सीतेचें हरण करण्यास उद्युक्त झाला. त्यानें लागलीच मारीच नांवाच्या राक्षसास पाचारण केलें आणि त्यास सांगितलें, " रामचंद्राची पत्नि सीता ही लावण्यसंपन्न आहे. ती रामाची पत्नि होण्यास योग्य नाहीं. ती माझी भार्या होण्यासच योग्य आहे. तिला राम हा पति शोभत नाहीं. याकरितां सीतेला पळवून आणण्याचा माझा

निर्धार ठरला आहे. रामचंद्र हा मोठा प्रतापी आहे. त्याच्यासमक्ष सीतेला पळवून आणणें धोक्याचें आहे. ह्मणून तूं सुवर्णमृगाचा वेष धारण कर. तूं रामाच्या दृष्टीस पडून त्याचें मन मोहिलेंस ह्मणजे शिकारीकरितां रामलक्ष्मण तुझ्या पाठीस लागतील. तूं त्या दोघांना पंचवटींतील आश्रमापासून दूर घेऊन गेलास ह्मणजे मी सीतेला पळवून लंकेस आणीन आणि तिच्याशीं विवाह करीन. ह्याकरितां तूं ताबडतोब माझ्याबरोबर चलण्याची तयारी कर."

रावणाची ही भलतीच इच्छा समजतांच मारीच वेडा झाला. त्याला रामपराक्रम ठाऊक होता. खेरीज तो नीतितत्वेंही जाणत होता. त्यानें रावणाला सांगितलें, "हे दशानना; परांगनेचा अभिलाष करणारांतून कोणाचेंही कल्याण झालेलें नाहीं. तूं सद्विचार करून रामाची मैत्री संपादन कर. तूं अभिमानाच्या भरीं पडून दुसऱ्याच्या नाशास प्रवृत्त होऊं नको. हें शरीर क्षणिक जाणून परमार्थ साधण्यांतच कल्याण आहे. तूं सीतेबद्दलची पापवासना टाकून रामाला शरण जा."

मारीचाचा हा उपदेश गोड होता; पण गर्वज्वरानें त्रस्त झालेल्या रावणास तो कडू वाटला. उकिरड्यावर अमृत ओतून काय उपयोग होणार? मद्यपी माणसाला धर्मतत्वें कशीं रुचणार? मारीचाच्या उपदेशानें रावण जास्तच संतापला. तो मारीचाला ठार मारण्यास तयार झाला. रावणासारख्या पाप्याच्या हातून मरण्यापेक्षां रामबाणानें मेलेलेंच बरें असा विचार करून नाइलाजास्तव मारीच रावणाबरोबर जाण्यास कबूल झाला आणि ते दोघेजण पंचवटीकडे गेले.

रावणानें या समयीं गोसाव्याचा वेष धारण केला होता व मारीचानें सुवर्णमृगाचा वेष स्वीकारला होता. रावण अरण्यांत गुप्ततेनें राहिला. मारीच हरिणरूपानें रामाच्या आश्रमावरून चमकत चमकत

हिंडूं लागला. त्या मृगाची सुवर्णकांति पाहून सीतेचें मन भुललें. आपल्याला चोळी करण्याकरितां त्या हरिणाचें कातडें आणावें असा सीतेनें रामाजवळ हेतु दर्शविला. सीतेची हौस जाणून राम धनुष्य-बाण घेऊन त्या मृगाच्या मागें धांवला. आपण परत येईपर्यंत सीतेच्या रक्षणाची जबाबदारी त्यानें लक्ष्मणावर सोपविली.

आपल्या मागें रामचंद्र धांवत आहे हें जाणून तो हरिण पळत सुटला. त्यानें रामाला आश्रमापासून बरेच दूर नेलें. गौतमी नदीच्या पूर्व बाजूकडे तो मृग पळत होता. रामानें हरणाचें वर्म लक्षून एक बाण सोडतांच तो मृग घायाळ होऊन पडला. मृगाच्या मृत देहा-कडे रामानें दृष्टि टाकली तों तो हरिण नसून राक्षस आहे असें त्यास कळून आलें. राक्षसाच्या कपटक्रियेबद्दल रामाला आश्चर्य वाटलें. शिकारीच्या श्रमामुळें रामचंद्र बहुत थकला असल्यामुळें तो तेथेंच एका पिंपळाच्या झाडाखालीं विश्रांति घेण्याकरितां स्वस्थ बसला.

राम हरिणामागें गेला तेव्हां लक्ष्मण आश्रमांतच होता. त्यालाही कांहींतरी युक्तीनें बाहेर काढावें ह्मणून मारीचानें कपट केलें. त्यानें रामासारखा आवाज काढून असे शब्द काढले कीं, " लक्ष्मणा, धांवरे धांव; राक्षसांनीं मला वेढलें आहे. तूं धांवून आल्याशिवाय माझी सुटका होणार नाहीं. " राक्षसाचे हे शब्द सीतेच्या कानावर पडले. लक्ष्मणानेंही ते ऐकिले. रामचंद्र संकटांत आहेसें जाणून सीतेनें लक्ष्मणाला तिकडे जाण्यास सांगितलें. रामचंद्राला राक्षसांपासून अपाय होणें अशक्य आहे हें लक्ष्मणाला ठाऊक होतें. तें मायावी राक्षसांचेंच कपट असेल असें जाणून लक्ष्मण आश्रमांतून बाहेर जाण्यास अनमान करूं लागला. तेव्हां सीतेनें त्याला दुःशब्दांनीं ताडण करून खिजविलें. रामसंरक्षणाविषयीं अधीर होऊन

सीतेनें लक्ष्मणाला रामाची शपथ घालून त्याच्या साह्यार्थ जाण्यास सांगितलें. तेव्हां त्यानें आश्रमाभोंवतीं एक धनुष्यरेषा काढून सीतेला ती न ओलांडण्याबद्दल बजाविलें आणि नाइलाज होऊन लक्ष्मण रामाचा शोध काढीत चालला. कांहीं वेळानें तो रामासंन्निध येऊन पोंचला. तो आश्रमांत सीतेला एकटी टाकून आपल्याकडे आल्याबद्दल रामानें त्याला दोष दिला. लक्ष्मणानें नम्रपणानें त्याला सीतेचा आग्रह व तिनें घातलेली शपथ ही हकीकत सांगितली. नंतर दोघांच्याही मनाचें समाधान झालें. कांहीं वेळ मारीचवधाविषयीं भाषण होऊन ते दोघेजण पंचवटीकडे परतले.

लक्ष्मण गेल्यावर आश्रमांत एकटी सीता आहे हें जाणून रावणास मोठा हर्ष वाटला. तो अतीतवेषानें आश्रमासन्निध आला. तो आंत शिरणार तोंच त्याला लक्ष्मणानें केलेली रेषा दिसली. ती ओलांडून जाण्यास तो समर्थ नव्हता. त्यानें त्या रेषेच्या बाहेर उभे राहूनच सीतेला पाचारण केलें.

सीतारूपी चंद्रमंडळ ग्रासण्याकरितां तो दशाननरूपीं राहू आश्रमाबाहेर उभा राहिला. हरिनामापुढें पाप काय करणार? वासुकीपुढें बेडकाचें काय चालणार? सिंहापुढें कोल्हा काय बोलणार? अग्नीपुढें गवतानें धांवून यावें, त्याप्रमाणें पातिव्रत्याच्या दीपिकेपुढें रावण उभा राहून तिचें रूप न्याहाळूं लागला. आपल्याला आतां सीता प्राप्त होणार ह्मणून रावण आनंदित झाला; पण त्या जगन्मातेविषयीं पापबुद्धि धारण करतांच आपल्या हातांत झोळी आली हें त्या मूढाच्या लक्षांतही आलें नाहीं. त्यानें दुरूनच सीतेला तूं कोणाची कोण ह्मणून विचारलें. तिनें त्याला आपला सर्व मजकूर सांगून रामलक्ष्मण परत येईपर्यंत थांबण्यास सांगितलें. तो अतिथी आहे असें जाणून तिनें त्याला बसण्यासाठीं आसन दिलें. सीता आश्रम सोडून बाहेर येईना आणि लक्ष्मणाची

चापरेखा ओलांडून रावणाच्यानें आश्रमांत जाववेना. तो तेथूनच तिच्याजवळ फलाहार मागूं लागला. ती त्यास आंत येण्याची विनंति करूं लागली. इतक्यांत रावणानें भुकेमुळें आपण व्याकूळ झालों अहों असें दाखविण्याकरितां आपला देह धरणीवर टाकला. आतां अन्नावांचून आपला प्राण जातो असें दाखवून रावण मोठा विलाप करूं लागला. त्याची ती दशा पाहून सीता फळें घेऊन रेखेपर्यंत आली. तिनें ती फळें त्याच्या झोळींत टाकण्यासाठीं आपले हात रेषेच्या बाहेर नेले तों त्यानें ते हात धरूनच तिला उचललें. सीता हातांत येतांच त्यानें आपलें रूप प्रगट केलें व तो मोठ्या आढ्यतेनें ह्मणाला, "आतां मी तुला अशीच लंकेस नेणार. तूं मुकाट्यानें मला माळ घालण्याचें क़बूल कर. मीं सर्व देवांनाही बंदिवासांत ठेविलें आहे. माझ्यापुढें कोणाचाही पराक्रम चालणार नाहीं."

त्याचें भाषण ऐकून सीता बोलली, "हे जंबुका दशानना; तूं रामसिंहाच्या भार्येला पळवून नेत आहेस याचा पुरता विचार कर. रखरखीत निखाऱ्याला नांगी मारणारा विंचू जगत नाहीं हें ध्यानांत आण. एखादें कुत्रें स्वयंपाकघरांत चोरून प्रवेश करतें तसा तूं या ठिकाणीं आला आहेस; पण तूं मला न सोडशील तर तुझा मृत्यु ओढवला आहे असें जाण. बऱ्या विचारानें तूं मला सोडून येथून चालता हो."

सीतेच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून रावण तिला घेऊन आकाशमार्गानें चालूं लागला. सीता फारच घाबरी झाली. ती दीनवदन करून रामलक्ष्मणांना हांका मारूं लागली. ती ह्मणाली, "हे पूर्णब्रह्मा, श्रीरामा, धांव धांव, या रावणरूपी सर्पानें मला तोंडांत धरिलें आहे. गरुडवाहन रामा; लौकर धांवून येऊन मला सोडीव. मी या रावणरूपी मस्त हत्तीच्या सोंडेंत सांपडलें आहे. हे नरसिंहा रामा, लौकर धांवून ये. महान् साधु लक्ष्मण याला मीं दुरुत्तरें बोललें

म्हणूनच तूं कठोरता धरलीस काय ? त्या करतांच मजवर राक्षसाचा घाला पडला काय ? श्रीरामा; तूं पापी अहल्येचा उद्धार केलास त्याप्रमाणें माझाही उद्धार कर ? " अशा प्रकारें तिनें एकसारखा विलाप चालविला. तिचा शोक ऐकून पशुपक्षीही रडूं लागले. वृक्ष-पाषाणही कष्टी झाले. तिच्या ओरडण्याकडे लक्ष न देतां रावण लंकेकडे चालला होता. इतक्यांत सीतेचें रुदन जटायूच्या कानीं पडलें. जटायू हा पक्षी असून रामभक्त होता. त्याचा देह पर्वतासारखा विशाल होता. त्याचें पंख, चोंच, नखें भयंकर असून तो मोठा शूर होता. त्यानें धांवत येऊन रावणाचा मार्ग अडवून धरिला. त्याचें व रावणाचें घोर युद्ध होऊन रावण जेरीस आला. अखेर रावणानें कपट लढवून जटायूचें पंख उपटून त्याला जखमी केलें. आपल्याला सोडविण्याकरितां धांवून आलेला जटायू घायाळ होऊन पडतांच जानकी हैराण झाली. तिला तशीच उचलून रावण आपल्या मार्गानें चालूं लागला. वाटेनें तो मातंग पर्वतावर आला. तेथें सुग्रीव, हनुमंत इत्यादि पांच वानर होते. त्यांनीं अंतरिक्षांत होत असलेला सीतेचा दुःखद ध्वनी ऐकला. त्यांनीं आपणांस सोडविण्याकरितां धांवून यावें किंवा निदान रामचंद्राला आपण कोणत्या दिशेस गेलों हें कळावें या हेतूनें सीतेनें या ठिकाणीं आपलीं भूषणें टाकून दिलीं. भूषणें पाहतांच मारुतीनें तीं ओळखलीं आणि वर पाहिलें. त्यानें रावणाचा नाश करण्याकरतां वर उड्डाण केलें तोंच तो कपटी राक्षस मोठ्या वेगानें पुढें निघून गेला आणि सुखरूप लंकेला जाऊन पोंचला.

आपल्या बायकोच्या शोधार्थ राम लंकेकडे येण्याचा यत्न करील अशी कल्पना करून रावणानें आपलें राक्षसी सैन्य रामाचा नाश करण्याकरितां पंचवटीस पाठवून दिलें. रावण सीतेला एकांतामध्यें प्रार्थना करून म्हणाला, " सीते; आतां तूं मला माळ घाल.

मी व राम एकराशीवरच जन्मास आलों आहों. रावण व राम यांत तूं अंतर मानूं नको. " असें सांगून तो दुर्जन तिला आपला पराक्रम सांगूं लागला. त्यानें तिला आपलें वैभव दाखविलें. तो तिची मनधरणी करून तिच्या पाया पडूं लागला. जेणेंकरून तिचें मन मोह पावेल; व ती सुखविलासास भुलून आपला स्वीकार करण्यास कबूल होईल अशाप्रकारच्या सर्व क्रिया रावणानें केल्या ! पण त्या सर्वांचा काय उपयोग होणार ? ती जानकी विदेही जनकाची कन्या होती. ती रामभार्या होती. ती दशरथराजाची सून होती. ती महान् पतिव्रता शुद्धधर्माची भोक्ती होती. आपल्या प्रिय पतीवांचून तिला अन्य विलाससौख्याशीं कांहींच कर्तव्य नव्हतें. आपण रावणास वश झालों नाहीं तर आपलें पराकाष्ठेचे हाल होतील हें ती जाणत होती. रावणाला आपण माळ घातली तर आपण सुखसागरांत पोहत राहूं हेंही तिला समजत होतें. पण अस्सल पतिव्रतेला असल्या सुखदुःखाची काय क्षिती असणार ? रावणासारख्या परपुरुषाकडून होणारा त्रास चुकविण्याकरितां आणि त्याच्यापासून प्राप्त होणाऱ्या सौख्याकरितां आपल्या पतिव्रताधर्मावर तिलांजली सोडण्याइतकी ती ढिली स्त्री नव्हती. कडकडीत पातिव्रत्यापुढें तिला स्वर्गभोगही तुच्छ वाटत होते. पातिव्रत्य व एक-पति-निष्ठा यापुढें तिला आपल्या प्राणाचीही पर्वा नव्हती. मग ती जगन्माता रावणासारख्याच्या अपार वैभवाला कितीशी किंमत देणार ? त्या भारतीय आर्येनें रावणाला खडखडीत जाब केला कीं, " हे दुर्जना, मलिना, चोरा, दशानना ! तूं शतमूर्ख आहेस. अरे; प्रळयाग्नींत उडी घालून मशक कधीं परत येईल काय ? सिंव्हाची जिव्हा तोडून कोल्हा कधीं जिवंत राहिला आहे का ? बेडकानें उडया मारून रविमंडळ गांठलें आहे का ? तूं स्वतःला रामचंद्रापेक्षां श्रेष्ठ मानतोस हा तुझा वृथा भ्रम आहे.

तुझी व रामचंद्राची रास एक असली तरी माझा पति श्रीराम तुझ्या-पेक्षां अनंतपटीनें थोर आहे. कावळा व गरुड हे दोन्ही पक्षीच आहेत. राम व रावण यांच्या नामाचा आरंभ रकारानें होतो एवढ्या-मुळेंच तूं रामाशीं साम्य कसें पावशील ? तम व तरणी; वायस व वैनतेय; मशक व महेश; रजक व रमावर; कुक्कुट व कुंजर; रजनीचर व रघुवीर; कपटी व कमळासन यांचीं अद्याक्षरें जरी सारखींच असलीं तरी त्यांच्या महत्वांत केवढें अंतर आहे हें ध्यानांत आण. तूं स्वतःला पराक्रमी समजत असशील; पण रामचंद्रापुढें तूं घुंगुरटें आहेस. मदनानें सर्वांस जिंकलें; पण शंकरापुढें तो भस्म झाला. अग्नि सर्वांस जाळतो पण मेघापुढें तो हतवीर्य होतो. हें ध्यानांत आणून तूं या रामभार्येला मुक्त कर. तूं जर पापनिवृत्त होणार नाहींस तर माझा तेजसंपन्न पति येथें येऊन तुझा नाश करील हें सत्य समज. मी महान् पतिव्रता आहें, रामचंद्रावांचून अन्य पुरुषांना मी स्त्रिया मानतें. तूं जर दांडगाईनें मला स्पर्श करशील तर तूं येथेंच भस्म होशील हें ध्यानांत धर. "

सीतेचा रोखठोक जबाब ऐकून रावण भ्याला. तिचें मन स्थिर होईपर्यंत तिला अशोकवनांत ठेवावें असा त्यानें बेत केला. त्यानें त्रिजटा नांवाच्या राक्षसीशीं खलबत करून सीतेला अशोकवनांत नेऊन ठेविलें. तिच्या रक्षणार्थ त्यानें हजारों राक्षसांचा पहारा ठेवला. त्यानें असंख्य राक्षसींना आज्ञा करून सीतेचें मन वळविण्याकरितां अशोकवनांत पाठविले. त्या राक्षसींनीं अक्राळविक्राळ रूपें धारण केलीं. त्या सीतेला भेवडावूं लागल्या. त्यांनीं तिला हरतऱ्हेच्या धमक्या घातल्या. तिच्यापुढें डोळे वटारून करकरा दांत खाऊन त्या तिला छळूं लागल्या. तिनें रावणाचा स्वीकार न केला तर आपण तिचे अनंत हाल करूं अशी त्यांनीं तिला दहशत घातली. पण जिचें मन

रामचरणीं गुंतलें होतें ती सीता त्या असुरींच्या दहशतीस काय जुमानणार ? ती मुळींच भ्याली नाहीं. झंझा वायु सुटला तरी जसे पर्वत उडून जात नाहींत त्याप्रमाणें त्या राक्षसींच्या भयानक कृतीनें सीतेचें सात्विक धैर्य ढळलें नाहीं. ती आपल्या प्रखर पातिव्रत्याच्या सामर्थ्यामुळें स्वतःला अजिंक्य समजत होती. कुत्र्यांनीं कितीही भुंकणें चालविलें तरी जसा हत्ती स्थिरच असतो त्याप्रमाणें त्या भयानक राक्षसींच्या दरडावणीस कस्पटासमान लेखून ती महान् साध्वी आपल्या पतिचरणाकडे ध्यान लावून सदोदित मन स्थिर करून राहिली होती.

इकडे रामलक्ष्मण पंचवटीस परत येऊन पाहतात तों आश्रमांत सीता दिसेना. ती कोठें गेली असावी याबद्दल त्या दोघांची कांहींच कल्पना चालेना. तिला कोणी राक्षसांनीं पळविलें असेल अशा शंकेनें ते तिचा शोध करूं लागले. ती जवळपास कोठें सांपडेना तेव्हां रामचंद्र घाबरा झाला. ते दोघे पंचवटीचा त्याग करून सीतेच्या तपासाकरितां अरण्यांत हिंडूं लागले. तिचा कांहींच थांग लागेना तेव्हां राम विव्हळ झाला. तिच्या वियोगानें त्याचा देह तप्त होऊन गेला. तो भ्रमित होऊन ‘ सीता सीता ’ ह्मणून पिशाप्रमाणें हिंडूं लागला. त्या शोकभरांत तो सीता ह्मणून वृक्ष—पाषाणासही मिठ्या मारून रडूं लागला. त्याची ती विरहव्यथा पाहून लक्ष्मणास अत्यंत दुःख झालें. आपण सीतेला एकटी टाकून रामाकडे गेल्याबद्दल त्याला मोठा पश्चात्ताप वाटला. रामाची बुद्धि भ्रमित होऊन तो पर्वत, पशु, पक्षी यांना सीतेची माहिती विचारूं लागला.

याप्रकारें हिंडतां हिंडतां त्याची व जटायूची गांठ पडली. जटायू रक्तबंबाळ होऊन विवळत होता. त्याच्याशीं झालेल्या बोलण्यावरून सीतेला रावणानें हरण केल्याचें वृत्त त्यांना समजलें. पण रावण तिला घेऊन कोठें गेला हें कांहींच कळेना. पुढें रामलक्ष्मण यांचा कबंध

राक्षसाशीं संग्राम झाला. त्यामध्यें रामाच्या बाणांनीं कबंध जखमी झाला. रामानें कबंधाची हकीगत ऐकून त्याचा उद्धार केला रामाच्या औदार्यामुळें कबंधाच्या मनांत प्रेम उत्पन्न होऊन कबंधानें त्यास सांगितलें, " रावणानें सीतेला लंकेस नेलें आहे. किष्किंधेचा राजा सुग्रीव याला तूं मित्र कर; म्हणजे त्याच्या सहाय्यानें तुला सीतेची सर्व हकीगत समजेल. त्याच्याच मदतीनें तुझा लंकेंत प्रवेश होऊन तुला सीता प्राप्त होईल. "

कबंधाच्या उपदेशाप्रमाणें रामानें सुग्रीवाशीं सख्य केलें. त्याचा भाऊ वाली यास मारून रामानें सुग्रीवाला गादीवर बसविलें. वीर हनुमान हा सुग्रीवाचा मंत्री होता. तो महान रामभक्त असल्यानें त्यानें सुग्रीवासह सर्व वानर रामाच्या साह्यास आणले. त्या सैन्यासह श्रीराम सीतेस सोडवून आणण्याकरितां लंकेवर स्वारी करण्यास निघाला.

सीतेचा शोध करण्याकरतां जे वानर दाही दिशेस गेले होते ते निराश होऊन परत आले. मारुती दक्षिण दिशेला गेला होता. त्याला मात्र सीता लंकेंत असल्याचें वृत्त माहीत होतें. तो महेंद्रपर्वतावर उभा राहिला. तो पर्वत आणि रावणाची लंका यांमध्यें विशाल समुद्र होता तरी हनुमानानें रामप्रसादामुळें उड्डाण करून लंकेंत प्रवेश केला. सीता-देवी कोठें आहे तें समजण्याकरिता त्यानें लंकेची नासधूस आरंभिली. तेथें त्याचें व राक्षसांचें युद्ध झालें. हनुमंतानें राक्षसांचा पराभव केला. मारुती गुप्तपणानें रावणाच्या महालांत शिरला. तेथें रावणाचें मंदो-दरीशीं बोलणें चाललें होतें. त्या बोलण्यांत सीतेची वाटावाट होऊन रावणानें एक दासी सीतेकडे अशोकवनांत पाठविली. त्या दासीच्या पाठोपाठ मारुती अशोकवनांत गेला. थोड्या वेळानें ती दासी निघून गेली. तेव्हां मारुती सीतेला शोधूं लागला व काहीं वेळानें एका अशोक वृक्षाच्या तळाशीं बसलेली सीता त्यानें पाहिली. तिच्याच

शेजारीं त्रिजटा राक्षसी बसली होती. ती राक्षसी रामभक्त असल्यामुळें तिला भिण्याचें मारुतीस कारण नव्हतें. मारुतीनें हलकेंच जाऊन सीतेच्यापुढें मुद्रिका टाकली आणि तो हात जोडून उभा राहिला.

त्यावेळीं जानकी ध्यानस्थ होती. ती आपल्या पतीच्या चिंतनांत गर्क झाली होती. तें पाहून मारुती त्या अशोकवृक्षावर जाऊन बसला. सीतेनें राममूर्ति पुढें आणली असतां त्याच्या हातांत मुद्रिका दिसेना, तेव्हां तिनें घाबरून डोळे उघडले तों तिच्यापुढें मारुतीनें टाकलेली मुद्रिका दिसली. ती मुद्रिका हातांत घेऊन सीता शोक करूं लागली. तिचा विलाप ऐकून मारुतीनें झाडावर बसून रामगीत आरंभिलें. तें ऐकतांच सीतेनें वर पाहिलें तों तिला झाडावर कोणी दिसेना. झाडावरून रामगीत तर स्पष्ट ऐकूं येत होतें. हें कांहींतरी कपट आहे असें जाणून सीता रामनामाचा घोष करूं लागली. रामगीत गाणारा कोण तो दिसावा ह्मणून तिनें अगदीं निर्वाण मांडलें. रामाच्या भेटीकरितां आतुर होऊन ती निराशेनें प्राण देण्यास तयार झाली. तिचें पतिप्रेम पाहून मारुती प्रगट झाला. त्यानें सीतेला नमस्कार केला. एकमेकांच्या खाणाखुणा एकमेकांस कळतांच सीतेला हर्ष झाला. मारुतीनें तिला रामलक्ष्मणाची सर्व हवाल सांगितली. रामाची विरहव्यथा कळतांच जानकीला गहिंवर दाटला. मारुतीनें तिचें समाधान केलें. वानरगणांसह श्रीरामचंद्र लौकरच लंकेंत येऊन तुझी सुटका करील अशी मारुतीनें तिची समजूत केली. रावणाच्या राक्षसांपुढें वानरांचें कांहीं चालावयाचें नाहीं असें वाटून सीता खिन्न झाली. आपली व आपल्या पतीची लौकर भेट होणें अशक्य वाटून ती रडूं लागली. तिला चोहोंकडे रामचंद्र दिसूं लागला. आपल्या पतीची व आपली त्वरित भेट न होईल तर आपण आतां जिवंत राहणार नाहीं असें सांगून सीतेनें शोक आरंभिला. पतिभेटीची तिची उत्कंठा

जाणून हनुमानानें तिला सांगितलें, " हे रामपत्नि जानकी; रावणाचा वध करून तुझी मुक्तता करण्याकरितां रामचंद्र येथें येईल हें खास होय; पण त्या गोष्टीस कालावधी लागेल. याकरितां तूं माझ्या पाठीवर बैस. मी उड्डाण करून तुला आत्तांच रामाकडे नेतों. "

हनुमानाचें भाषण ऐकून सीतेला हर्ष झाला. पण तो वानर कांहीं तरी शक्तीच्या बढाया मारीत असावासें वाटून ती ह्मणाली; " हे वानरा ! तुझें भाषण मला माकडचेष्टेंतलेंच वाटतें. तुझें शरीर अल्प असतांना तूं एवढा पुरुषार्थ कसला बोलून दाखवितोस ? "

आपल्या सामर्थ्याची शंका येऊनच सीता असें बोलत असावी असें समजून हनुमानानें तिला आपलें विशाल स्वरूप दाखविलें. तेव्हां सबंध लंकानगरी देखील आपल्या पाठीवर वाहून नेण्यास समर्थ असें मारुतीचें रूप पाहून सीता विस्मय पावली. वस्तुतः ती त्याचें सामर्थ्य व पराक्रम जाणत होती. तिनें त्याच्या बलाबद्दल जो संशय व्यक्त केला तो उगीच होता. त्याच्या पाठीवर न बसण्याचें तिचें खरें कारण वेगळेंच होतें. तिनें काढलेली शंका मारुतीच्या विशालस्वरूपानें निरसन होतांच ती साध्वी त्यास म्हणाली, " हे कपिराया, मी तुझें शौर्य जाणतें. पण मला माझ्यासंबंधीं पूर्ण विचार केला पाहिजे. मला रामदर्शनाची उत्सुकता आहे. माझा पतीही मजकरितां तळमळत आहे. या साऱ्या गोष्टी खऱ्या; पण मी पातिव्रत्यसंपन्न स्त्री आहे हें ध्यानांत आण. माझें सर्व प्रेम एका रामाच्या ठिकाणींच एकवटलें आहे. रामावांचून अन्य कोणाच्याही शरीरास मी स्वेच्छेनें स्पर्श करणें शक्य नाहीं. रावणाचा जो मला स्पर्श झाला तो माझ्या इच्छेनें झाला नाहीं. याकरितां तूं ह्मणतोस ती गोष्ट होणें नाहीं. तूं येथून परत जाऊन रामाला सर्व वृत्त सांग. माझा पति अमोघ पराक्रमी आहे. त्यानें लंकेवर स्वारी करून रावणादि दुष्टांस मारून मला घेऊन जाण्यांतच भूषण आहे."

असें सांगून सीतेनें आपलें एक शिरोरत्न मारुतीजवळ खूण ह्मणून दिलें. तें घेऊन मारुती तेथून निघाला. तो पुन्हां उड्डाण करून महेंद्र पर्वतावर उतरला. तेथें त्यास सर्व वानर भेटले. तेथून ते पंपा-सरोवरावर आले. तेथें त्यांची राम व सुग्रीव यांच्याशीं भेट झाली. मारुतीनें लंकेंतील सर्व वृतान्त रामाला कथन केला. त्यानें सीतेनें दिलेलें रत्न रामाला तिची खूण ह्मणून दिलें व सीतेची सर्व स्थिति कळवून तिचा निरोपही सांगितला.

सीतेला रावणाच्या छळांतून मुक्त करण्याकरितां रामासह सर्व वानर उत्सुक झाले. त्यांनीं कडेकोट तयारी करून ते लंकेवर चालून गेले. लंका समुद्राच्या पलीकडे होती. समुद्र ओलांडण्याकरतां नळ वानरानें अद्भुत सेतु बांधला. तो सेतु वाहून जाऊं लागला. तेव्हां त्यांनीं दगडांवर रामनाम घातलें. रामनामाच्या प्रभावानें त्यावेळीं दगड पाण्यावर तरले आणि सेतु तयार झाला. त्यावरून सर्व वानरसैन्य चालून गेलें. रामाचें सैन्य आलेसें पाहून रावण घाबरला. त्यानें मोठी सभा भरवली. त्याच्या प्रधानांनीं त्याला धीर दिला. त्याचा पुत्र इंद्रजित व बंधु कुंभकर्ण यांचा पराक्रम ध्यानांत आणून रावणानें अवसान धरलें. त्यानें लागलीच युद्धाची तयारी केली. त्याचा भाऊ बिभीषण हा रामभक्त असल्यानें त्यानें रावणाला रामाशीं सख्य करण्याचा उपदेश केला. रावणानें त्याची उलटी निंदाच केली. त्याच्या दुर्भाषणाकडे लक्ष न देतां बिभीषणानें त्यास सीतेला मुक्त करून रामाच्या स्वाधीन करण्याबद्दल विनविलें. त्याबद्दल रावणानें त्याचा धिःक्कार करतांच तो रामचंद्राला जाऊन मिळाला. सुलोचना, मंदोदरी यांनींही रावणाला सदुपदेश केला. परंतु त्याची मती भ्रष्ट झाल्यामुळें तो कोणाचाच उपदेश ऐकेना. अखेर त्याचें व रामाचें युद्ध सुरू झालें. रावणाचें सैन्य जर्जर होऊन

माघार घेऊं लागलें. तें पाहून रावणाला आपला पराभव होतोसें वाटलें. रामानें आपणास जिंकलें तर सीता आपल्या हातची जाईल; असें वाटून त्यानें तिला त्यापूर्वी वश करण्याची खटपट चालविली. त्यानें आपला जय झाल्याचा बहाणा करून मायावी राम उत्पन्न केला व त्याचें शिर सीतेपुढें ठेवून तो तिला उद्धटपणानें म्हणाला, “ हे सुंदरी ! तूं ज्याच्या जिवावर उड्या मारीत आहेस तो हा तुझा पति मीं युद्धांत मारला आहे. आतां तुझें रक्षण माझ्या अधीन आहे. आतां तूं सुविचार धारण करून मला माळ घाल. मी तुला आपल्या सर्व भार्यांत मुख्य करून लंकेची मालकीण करतों. ”

रामाच्या सर्व चिन्हांवरून ती त्या मायावी रामाच्या मस्तकास खरेंच रामाचें मस्तक समजली. पतीचें शिर पाहतांच ती अत्यंत दुःखित होऊन ह्मणाली, “ हे कैकेयी ! आतां तरी तुझे डोळे थंड होऊं देत ! तुझ्यामुळेंच रामचंद्राचा नाश होऊन सूर्यवंशाचा लय झाला. कैकेयी; माझ्या पतीला वनांत धाडण्यासारखा त्यानें तुझा काय गुन्हा केला होता बरें ? ” असे उद्गार काढून ती थरथर कांपूं लागली. ती धाडकन् भूमीवर पडून बेशुद्ध झाली. कांहीं वेळानें सावध होऊन ती बोलूं लागली, “ रामचंद्रा; तुझ्या नाशामुळें मला वैधव्याचा नरक प्राप्त झाला. पतीचें मरण हाच कायतो साध्वीवर कोसळणारा अनर्थ होय. रामचंद्रा; तूं लोकांचें जन्ममरण टाळणारा असून आज तूंच कसा मृत्यूच्या मिठींत सांपडलास ? अति निष्ठुर काळरात्रीनें तुला कसें वश केलें ? मला दीन साध्वीला सोडून आज तूं पृथ्वीलाच कसें आलिंगन देत आहेस ? रामा; तूं आपला पराक्रम दाखवून बालपणींच मला प्राप्त करून घेतलेंस आणि आज तूं मजकडे ढुंकूनसुद्धां कां रे पाहत नाहींस ? हे दाशरथी ! तूं आपल्या संगतीं मला तरी घेऊन जा. माझा त्याग करून परलोकीं जाणें तुला कसें बरें रुचलें ?

हे रावणा; तूं आतां कृपा करून माझाही वध कर. पतिपत्नींची भेट केल्याचें आतां तरी पुण्य जोड. तूं जर माझें ह्मणणें मान्य करणार नाहींस तर मी कांहीं तरी उपायानें आत्महत्या करून घेईन. भर्त्याच्या मार्गानें गमन करणें हा साध्वीचा धर्मच आहे."

सीतेचें इतकें भाषण होत आहे तों रावणाच्या एका सेवकानें तेथें येऊन त्यास प्रहस्त प्रधानाचा निरोप कळविला. तो ऐकतांच रावण तेथून लगबगीनें निघून गेला. रावण जातांच तें मायावी राममस्तकही गुप्त झालें. त्याठिकाणीं सरमा नांवाची दासी होती. तिनें तो राममस्तकाचा प्रकार मायावी होता याबद्दल सीतेची खात्री करून देऊन तिचें समाधान केलें. तिनें तिचे अश्रुपूर्ण नेत्र पुसून रामहस्तें रावणाचा वध होऊन तिची व रामचंद्राची भेट लौकरच होईल या विषयींही तिच्या मनाची खात्री करून दिली. सरमेचें भाषण सीतेला सत्य वाटलें. पण तसा योग जमून येईपर्यंत तिची तळमळ संपणार कशी ?

पुढें इंद्रजिताशीं रामलक्ष्मणाचें युद्ध सुरू झालें. इंद्रजितानें नागपाशानें रामलक्ष्मणास बांधून टाकलें. त्या स्थितींत ते मूर्छित होऊन पडले असतां रावणानें ते मेले अशी लंकेंत दवंडी पिटवली. त्यानें राक्षसींना सीतेला विमानांत बसवून ते मूर्छागत रामलक्ष्मण दाखविण्यास सांगितलें. त्यांना पाहून ती स्वतःला अनाथ समजून तरी मग आपणास माळ घालील अशी रावणाची समजूत होती. सीता बेशुद्ध रामलक्ष्मणास पाहून विलाप करूं लागली. परंतु त्रिजटेनें तिची ती गैरसमजूत दूर करून त्यांच्या जिवंतपणाबद्दल तिची खात्री केली.

पुढें इंद्रजितानें एक मायावी सीता निमार्ण केली व तिला समरभूमीवर आणून त्यानें तिचा शिरच्छेद केला. ही गोष्ट मारुतीकडून रामचंद्राला समजली. तेव्हां जिच्याकरितां आपण इतका संग्राम माजविला ती मृत झाली असें कळतांच राम सीतेचे गुण आठवून रडूं लागला.

रामाचा शोक पाहून लक्ष्मणानें सांत्वनपूर्वक सांगितलें, " रामचंद्रा; तूं देवाधिदेव परब्रह्म असून असा शोक कसला करतोस ? ही सर्व तुझीच माया आहे. जानकी ह्मणजे साक्षात् चिच्छक्ति होय. ती मेली तरी तुला सोडून कोठें जाणार आहे ? प्रभा दिव्याला सोडून जाणें शक्यच नाहीं. " इतक्यांत बिभीषणाचे दोन प्रधान तेथें आले. त्यांनीं रामाला सांगितलें, " रामा, अरे तूं वृथा दुःख कां करतोस ? आह्मी आतांच लंकेंतून आलों आहों. जानकी सुखरूप आहे. तुझा धीर खचण्याकरितां इंद्रजितानें ही सर्व राक्षसी माया दाखविली. "

हें भाषण ऐकतांच कपिगणांनीं जयजयकार केला व रामलक्ष्मणांनाही स्फुरण चढलें. त्यांनीं आपापलीं धनुष्यें सांवरलीं व भयंकर युद्ध माजवून त्यांनीं कुंभकर्ण, प्रहस्त, इंद्रजित वगैरे राक्षसांचा वध केला. इंद्रजित पडल्यामुळें रावणाला अतिशय क्रोध आला. त्याचे डोळे लाल झाले. तो रुद्ररूपीं दिसूं लागला. त्यानें करकरा दांत खाऊन उड्डाण केलें आणि सीतेचा वध करण्याकरितां तो एकदम अशोकवनांत गेला. त्यानें आपल्या हातांत प्रखर खड्ग धारण केलें होतें. सीतेपुढें तलवार पडताळून तो ह्मणाला, " जानकी, तूं अद्यापही माझा अंत पहात आहेस; पण आतां मी तुझ्या पतीला जिवंत ठेवीत नाहीं हें ध्यानांत आण. तूं निव्वळ कृत्या आहेस. तुझ्या पायगुणानेंच माझा बंधु, पुत्र, प्रधान यांचा नाश झाला आहे. अजूनही तूं होऊन जर मला माळ घालण्याचें कबूल करीत असशील तर मी तुझा स्वीकार करीन. तुझ्या वरचा रोष टाकून देऊन तुला सुखांत ठेवीन. तुझ्या पतीस जिवदान देईन. निदान तूं आपल्या पतीच्या प्राणसंरक्षणाकरितां तरी माझा स्वीकार कर. याउप्परही तूं आपला हट्ट सोडणार नाहींस तर मी तुझाही शिरच्छेद करीन. "

रावणाचें उग्ररूप पाहून सीता गांगरली. तो दुष्ट बोलल्याप्रमाणें

पतीचा घात करील असें वाटून ती रडूं लागली. पण त्या सत्वाच्या राशीनें श्रेष्ठ धार्ष्ट्याचा अंगिकार करून रावणास उत्तर दिलें, “ हे दुष्ट राक्षसा, तूं मला कोण समजतोस? अरे, त्रिभुवन चालक श्रीरामाची भार्या मी जानकी आहें. मेल्या, तुला पतिव्रता-स्त्रियांचा महिमा ठाऊक नाहीं काय? पतीचें संरक्षण करण्याकरितां सतीत्वापासून ढळणें ह्मणजे स्वहस्तेंच पतिघात करणें होय? यापेक्षां मी व माझा पति तुझ्या शस्त्रास बळी पडणेंच श्रेयस्कर आहे. मूढा; तूं जर पराक्रमी आहेस तर आह्मां बायकांपुढें कसल्या तरवारी नाचवितोस? तुझ्या प्राणाचा बळी घेण्याकरितां समरांगणावर प्राप्त झालेल्या श्रीरामचंद्रापुढें मांडी ठोकून पराक्रम दाखीव; तुझा महा बलाढ्य बंधु कुंभकर्ण, अमोघ पराक्रमी पुत्र मेघनाद, तुझे अजिंक्य असे अनेक सेनानी या सर्वांना ज्यांनीं कंठस्नान घातलें त्या वीरांचें निवारण करून शौर्य गाजीव; आम्हांसारख्या साध्वी-स्त्रियांच्यापुढें शस्त्रें पाजळून काय होणार? बायकांवर शस्त्र चालवून शूरत्व गाजविणारा मनुष्य वीरच नव्हे; त्यानें कांकणेंच धारण करणें योग्य होय.”

सीतेच्या या भाषणानें तो दुर्बुद्धि चिडला. त्यानें अविचारानें तरवार सरसावली आणि सीतेचें शिर छाटण्याकरितां तो तिच्या अंगावर धावून गेला. त्याचें शस्त्र सीतेच्या देहास स्पर्श करणार तोंच त्याचा बुद्धिमान अमात्य सुपार्श्व हा धावत गेला आणि त्यास आडवून धरून ह्मणाला, “ हे वीरा; धर्मावर लाथ हाणून तूं या सीतेचा कां बरें वध करीत आहेस? तूं शूर आहेस तेव्हां आज युद्धभूमीवर चलून तुझा सर्व क्रोध रामावरच सोड. तूं आपल्या श्रेष्ठ रथावर आरूढ होऊन युद्ध करूं लागलास ह्मणजे ब्रह्मा, शिव यांच्या वरप्रभावानें जय मिळविशील. तुझ्या हस्तें रामाचा वध झाल्यावर ही सीता तुला सहजच माळ घालील. थोडक्याकरितां अधर्म करून स्वतःचा नाश

करून घेण्यास कां प्रवृत्त होतोस ? "अमात्याच्या या भाषणास मान देऊन रावण आपल्या सभास्थानाकडे निघून गेला.

यानंतर विरूपाक्ष, महोदर, महापार्श्व इत्यादि राक्षसांना राम-लक्ष्मणांनीं ठार मारिलें. शेवटीं रावणही रामासमोर उभा राहिला. तो वरदानामुळें मत्त झाला होता. रामासारख्या मानवाला तो तुच्छ मानीत होता. तो शस्त्रास्त्रानें युक्त होता तरी पण पापाचरणानें त्याचें सर्व सामर्थ्य पोकळ झालें होतें. मदनानें पीडित होऊन रावण जर निरीच्छ स्त्रीवर बलात्कार करील तर तत्क्षणीं त्याचे सात तुकडे होतील असा नलकूबरानें रावणास शाप दिला होता. त्या शापाच्या भयानें त्यानें जानकीला स्पर्श केला नव्हता तरी त्या सध्वींबद्दल पापवासना धरल्यामुळें त्याच्या शक्ति क्षय पावल्या होत्या. साध्वीछलाचें पातक त्याच्या कुकर्मपरिपाकाची वाट पाहत होतें. त्याच्या दुष्कर्माचा घडा पूर्ण भरतांच श्रीरामचंद्राच्या बाणांनीं त्याचीं शिरें तुटून पडलीं. एवढें चौदा चौकड्याचें राज्य करणारा, देवदानवांसही अवध्य असा तो लंकाधीश दशरथ पुत्र रामचंद्रासारख्या मानवाच्या हस्तें समरभूमीवर धूळ खात पडला.

रामचंद्रानें लागलीच मारुतीला आज्ञा करून सीतेला घेऊन येण्यास सांगितलें. त्यानें अशोकवनांत जाऊन सीतेला नमस्कार घातला. रामचंद्र विजयी होऊन त्यानें बिभीषणाला मृत रावणाच्या गादीवर स्थापिलें आहे असें मारुतीकडून समजतांच जनककन्येचा हर्ष काय विचारावा ? ती रामदर्शनाकरतां अगदीं उतावीळ झाली. मारुतीनें लागलीच बिभीषणास हाक मारून आणलें. बिभीषणानें सीतेपुढें लोटांगण घातलें. नंतर ते दोघे हात जोडून ह्मणाले, "हे जगन्माते ! तुझ्या पातिव्रत्यप्रभावानेंच रावणाचा वध होऊन सर्व देवगण मुक्त झाले आहेत. आतां तूं मंगलस्नान करून रामदर्शनास चल. यावेळीं रामचंद्र सुवेळेमध्यें तुझी वाट पाहत आहे."

त्यांचीं विनंति ऐकून सीता बोलली, " तुह्मी दोघांनीं रामकार्य-साधण्याकरितां बहुत कष्ट केले. सूर्यचंद्र आहेत तोंपावेतों तुह्मी दोघेहि चिरायू व्हाल. तुह्मी मला मंगलस्नान करण्यास सांगत आहां पण रामचंद्राला मंगलस्नान घातल्यावांचून मी कसें करावें. पतीवांचून कोणताही कार्योपक्रम करणें आह्मां पतिव्रतांना योग्य नव्हे. रामाज्ञे-वांचून केलेला धर्म तो अधर्मच होय. "

यावर मारुतीनें सांगितलें, " आपणास मंगलस्नान करण्याबद्दल रामाचीच आज्ञा आहे. " हें कळतांच सीता स्नान करण्यास तयार झाली. बिभीषणाची राणी सर्व उपचार घेऊन तेथें आली. त्रिजटा व सरमा यांनीं जानकीचें पूजन केलें. त्यांनीं तिला सुगंध तेल लावून न्हावूं घातलें. न्हाणें झाल्यावर त्यांनीं तिला उत्तरवस्त्र नेसाविलें व उत्कृष्ट कंचुकी घातली. त्यांनीं तिच्या अंगावर दिव्य अलंकार घालून तिला कुंकुमाचा मळवट भरून तिच्या सर्वांगास केशरकस्तुरी चोपडली. त्यांनीं दिव्य फळांनीं तिची उटी भरून तिच्याकडून त्यांतील एक फळ खावविलें. बिभीषणानें दिव्य मण्यांचा हार आणून तो जान-कीस अर्पण केला. सुवेळेस जाण्याची सर्व तयारी होऊन वाद्यें वाजूं लागलीं. रथ, हत्ती, घोडे, पालख्या, मेणे तयार झाले. लंकेंतील सर्व सैन्य रामदर्शनाकरितां निघालें. सीतादेवीला पालखींत बसविलें. त्रिजटा-यांही सीतेसंगतीं पालखींत बसल्या. त्या पालखीवर बुरखा घालून ती झांकून टाकण्यांत आली. मारुती व बिभीषण सेनेंत मिसळले. एकंदर लोकांची दाटी झाली. वाद्यांचा गजरांत सर्वजण चालूं लागले. जो तो सीतेला पाहण्याकरितां तिच्या पालखीजवळ जाऊं लागला. पालखी भोंवतालची गर्दी मोडावी ह्मणून जयशब्द करणारे वेत्रधार लोकांना दूर सारूं लागले. ही सर्व मंडळी रामसेनेंत येऊन दाखल होतांच गर्जनायुक्त शब्दांनीं आकाश दणाणून गेलें. सर्व वानर

सीतेच्या पालखीभोंवतीं जमले. ललकारणारे भालदार वानरांना दूर सारूं लागले. वानरांची इच्छा जाणून रामचंद्रानें बिभीषणास आज्ञा करून भालदारांचें निवारण केलें. वानरांना सीतेचें दर्शन व्हावें ह्मणून रामाच्या आज्ञेनें तिच्या पालखीवरील बुरखा काढण्यांत आला.

त्रिभुवनपती रामचंद्राची राणी दृष्टीस पडतांच सर्वांना आनंद झाला. तिचें अद्भुत सौंदर्य पाहून सर्व जन, सुरवर, यक्षगण, असुर, गंधर्व, चकित् झाले व त्या सर्वांच्या मनांत विकल्पानें प्रवेश केला. सीतेसारखी अनुपम स्त्री सहा महिने ताब्यांत असतांना रावणानें तिला शुद्ध ठेविलें नसावें असा सर्वांना संशय आला. दशाननासारखा दुर्जन व पापी राक्षस सहा महिने स्वस्थ बसला असेल ही गोष्ट अशक्य वाटून सर्वजण सीतेच्या शुद्धपणाबद्दल शंकित् झाले. लोकांमधील भलतीच गुणगुण थोडक्यांतच चोहोंकडे पसरली. रामालाही तो लोकापवाद बरोबर वाटला. रामचंद्रानें लागलीच भिंवयीला आठ्या घातल्या. सीतेला गाढ आलिंगन देऊन आनंदाच्या शिखरावर बसण्याऐवजीं त्या महात्म्यानें तिच्याकडे वक्र दृष्टीनें पाहिलें. तो सर्वांच्यासमक्ष सीतेस ह्मणाला, "जानकी, आतां येथून पुढें तुझा तूं आपला काय तो विचार पहा. तुला राक्षसानें पळविलें; त्या राक्षसाला कंठस्नान घालून, मीं तुला मुक्त करून मीं आपलें स्वतःचें कर्तव्य बजाविलें. तूं सहा महिने त्या राक्षसाच्या सहवासांत होतीस हें चांगलें ध्यानांत वागीव. आतां तूं पाहिजे तिकडे जा. मी सर्वसंग सोडून विरक्त झालों आहें. मी उदास होऊन नेहमीं अरण्यवासच करणार. माझा लोभ सोडून तूं हव्या त्या राजपुत्रास हवीतर माळही घाल. तुला कोठेंही जाण्यास दाहीदिशा मोकळ्या आहेत. कोणालाही माळ घालण्यास माझी तुला अडकाठी नाहीं. मला छत्र नाहीं, सिंहासन नाहीं; कैकयीनें मला राज्यभ्रष्ट केलें आहे.

मीं वनवासी होऊन पाले खाणाऱ्या वानरांशीं मित्रत्व जोडलें आहे. मजजवळ अन्न नाहीं, वस्त्र नाहीं; कंदमुळें हेंच माझें अन्न व वल्कलें, हींच माझीं वस्त्रें. तुला राजकन्येला मजजवळ सुख लागणार नाहीं. तूं हवी तिकडे जा; येथें थांबण्याचें मुळींच कारण नाहीं. मीं स्वत:वरील लोकापवाद टाळण्याकरितांच रावणाचा नाश केला आहे. तूं आपला विचार कायतो पहा. तुझ्या वर्तनाबद्दल संशय उत्पन्न झाला असल्यामुळें मला तुझें दर्शनही सहन होत नाहीं. जिला रावणाच्या अंकाचा स्पर्श होणें संभवनीय आहे तिचा मीं स्वीकार कसा करावा ? तुझ्या दिव्य कांतीवरून, तुला सहा महिने आपल्या कैदेंत ठेविली असतांना रावणानें तुझी उपेक्षा केली असेल अशी नुसती कल्पना मनांत आणतांही येत नाहीं. "

रामाचें हें भाषण म्हणजे सीतेच्या अंगावर वज्रच पडलें. रामानें शब्दरूपी सांडसानें आपला देह तोडला असेंच त्या कल्याणीला वाटलें. तिला ग्लानि येऊन ती निस्तेज दिसूं लागली. तिच्या डोळ्यांतून अश्रुबिंदु पडूं लागले. त्यांतल्यात्यांत सात्विकी धैर्य धरून ती साध्वी रामचंद्रास ह्मणाली, " हे जगद्वंद्य रामचंद्रा; आज सहा महिने मी आपल्या चरणाच्या आशेवरच जीवंत राहिले. आपण आपल्या हातानें आतां माझा वध करा ह्मणजे माझ्या जगण्याचें सार्थक झालें. आज माझें खरें दुर्दैव ओढवलें हें निश्चित होय. कामधेनूची धार काढीत असतां शेराच्या चिकानें भांडें भरावें तसाच आज प्रसंग ओढवला आहे. माझ्या दैवदुर्विपाकामुळें आज अशक्य गोष्टी शक्य झालेल्या दिसत आहेत. गरुडाचा आश्रय करणाराला सापांनीं चावावें; सिंहानें ज्याला हातांत धारण केलें त्याला कोल्ह्यांनीं ओढून न्यावें अशांतलीच आज माझी स्थिति झाली आहे. शरण आलेल्या भागीरथीला समुद्र ठाव न देईल, तर हे रामचंद्रा ! तिनें कोठें जावें बरें ? पाणी जर जलचरांना

आश्रय न देईल; आकाश जर पक्षांवर क्रोध धरील; सूर्य जर किरणां-वर रागावेल; समुद्र आपल्या लाटांशीं वैर करील, आई जर मुलाला विष पाजील, कल्पवृक्ष जर आपल्या फांद्यांशीं अबोला धरील, मेरु जर आपल्या शिखराचा द्वेष करील तर त्या सर्वांची गति काय होईल बरें ! रावणानें कपटवेषानें मला पळवून नेलें यांत माझा काय अपराध झाला. रावणाच्या कपटाचरणाबद्दल मला दंड भोगावयास लावणें प्रशस्त आहे काय ? मी रावणाच्या घरीं जरी सहा महिने राहिलें असलें तरी माझें मन सदैव रामचरणींच गुंतून राहिलेलें आहे हें आपण जाणत नाहीं काय ? अग्नि किंवा भागीरथी यांच्याप्रमाणें मी रामभार्या अक्षय्य शुद्धच असणार हें आपणास सत्य वाटत नाहीं काय ! वाऱ्याच्या योगानें ज्या कमळिणीचा देह लटलटावयास लागतो तिच्यावर वज्र टाकणें योग्य होईल काय ? रामा; यःकश्चित् पुरुष एखाद्या क्षुद्र स्त्रीला बोलतो त्याप्रमाणें आपण मला बोलणें शोभतें काय ! मी महान् पतिव्रता आहें अशींच आपली शेवटीं खात्री होईल. रावणाचा मला स्पर्श झाला तो माझ्या इच्छेनें झाला नाहीं. अमं-गळ व धर्मभ्रष्ट स्त्रियेचें आचरण पाहून सर्व स्त्रीजातीबद्दल कुशंका काढणें अयोग्यच होय. माझें शरीर रावणानें बंदींत ठेविलें होतें पण माझें मन आपल्याच चरणीं होतें. हे दीनवत्सल रामा, आपण माझा अंत पाहूं नका, मी पूर्ण शुद्ध आहें. मी आजपावेतों काया, वाचा, मनें करून एका रामचरणावरच अनुरक्त आहें. आपण क्रोधवश होऊन व लोकांच्या कुशंकेस बचकून मज साध्वीचा, या रामपत्नीचा, या भारतवर्षीय पतिव्रतेचा छल करूं नका. आपण माझें चरित्र ध्यानांत आणा. मी जनकाची कन्या नाहीं. मी पृथ्वीपासून उत्पन्न झालेयें आहें. मी बावन्नकशी सुवर्णाप्रमाणें अस्सल कुलांगना आहें. सोन्याच्या अंगीं डाग आहे कीं नाहीं याची परीक्षा अग्नीनें होते.

मीही अग्नीमध्यें देह घालून स्वतःचा शुद्धपणा स्थापित करून दाखविण्यास तयार आहें. "

असें बोलून तिनें अग्निकुंड तयार करण्यास सांगितलें. व त्याप्रमाणें रामाचीही इच्छा जाणून लक्ष्मणानें कुंड तयार केलें. अग्निज्वाला भडकूं लागल्या. सीतादेवी अग्निकुंडासमोर उभी राहिली व प्रेमळ दृष्टीनें आपल्या पतीकडे पाहून ती शुद्ध साध्वी मोठ्यानें ह्मणाली, " जर मी दोषी असेन तर हा अग्नि मला भस्म करून टाकील व मी जर शुद्ध असेन तर मी आपल्या शुद्धतेच्या सहाय्यानें या अग्नींतूनही रामदर्शनास परत येईन. आजपावेतों जर माझें मन पतीपासून दूर गेलें नसेल, रामध्यानावांचून जर मला कशाचाही ध्यास नसेल, काया, वाचा, मनें करून जर मी पवित्र असेन तर हा जगत्साक्ष अग्नि माझें रक्षण करील यांत संशयच नाहीं. "

असें बोलून त्या साध्वीनें कुंडाभोंवतीं प्रदक्षिणा घातली व पुन्हां एकदां डोळे भरून रामाला पाहून, आपल्या गळ्यांतील हार काढून तिनें अग्नींत टाकला आणि त्रिवार ' सत्य जय सत्य ' असा उच्चार करून त्या पवित्र साध्वीनें निःशंकपणें कुंडांत उडी घातली.

सती सीतादेवी अग्नीमध्यें पडतांच कन्येच्या छळामुळें भूमाता थरथर कांपूं लागली. कपिमंडळी शोकाकुल झाली, सकल देवगण व्याकुल झाले. त्यांना तो प्रलयकाल वाटला. लक्ष्मण, मारुती रडूं लागले. स्वतः रामचंद्राचे नेत्रही अश्रूंनीं भरून आले. दाही दिशांत धूर दाटला; सप्त समुद्र कढूं लागले. वैकुंठ व कैलास हीं स्थानेंहि डळमळूं लागलीं. सरासरीं अर्ध घटका होतांच कुबेर, यम, वरूण, इंद्र, ब्रह्मदेव, शंकर हे सर्वजण विमानांत बसून त्या ठिकाणीं प्राप्त झाले. त्यांनीं रामाची स्तुति करून तो कोण आहे याचें त्यास ज्ञान करून दिलें. त्या सर्वांनीं सीतेच्या शुद्धतेविषयीं साक्ष दिली. इतकें होत

आहे तों साक्षात् अग्नि सीतेला घेऊन कुंडांतून बाहेर आला. तो रामास ह्मणाला, " रामचंद्रा, ही सीता निष्पाप व निष्कलंक आहे. तिचें मन अक्षय्य आपल्या पतिचरणींच आसक्त झालेलें आहे. या निष्पाप व शुद्ध अंतःकरणाच्या पतिव्रतेचा तूं स्वीकार कर. या जाज्वल्य पतिव्रतेला, या जगन्मातेला, या भाग्यवान् आर्य साध्वीला भलतेंच बोलून तूं दुःख देशील तर सर्व देवगण, ऋषिमुनी, पितृगण यांच्याकडून तुझी निंदा होईल. तूं या पवित्र सीतेला आलिंगन दे."

अग्नीची आज्ञा होतांच रामानें जानकीला आपल्या वामांकावर घेतली. मेघकांतीनें युक्त असा रामचंद्र व विजेप्रमाणें चमकणारी सीता यांचा समरस पाहून सर्वत्रांनीं त्यांच्यापुढें लोटांगणें घातलीं. वाद्यध्वनी निघूं लागले. जयशब्दांनीं आकाश गर्जून गेलें. सुरगणांनीं रामसीता यांवर पुष्पवृष्टी केली. नंतर रामचंद्रानें बिभीषणाचा निरोप मागितला. बिभीषणास रामवियोग पसंत न पडून तोच त्यांच्याबरोबर जाण्यास तयार झाला. त्यानें पुष्पक विमान सज्ज केलें. रामचंद्र सीतेसह विमानांत स्थित झाला. सर्व सैन्य मोठ्या थाटानें चालूं लागलें. आपल्या वानर, रीस वगैरे सर्व भक्तांसह श्रीरामचंद्र सहकुटुंब अयोध्येच्या मार्गास लागले. वाटेनें त्यांनीं कित्येक पुण्यक्षेत्रें, पवित्रस्थानें, पुण्यवान् मुनि यांचीं दर्शनें घेतलीं. भरताची भेट होऊन त्यांनीं त्याला आपल्या विमानांत बसविलें. अशा थाटानें मार्गक्रमण करीत करीत ते अयोध्येंत आले. रामचंद्र विजयी होऊन आल्याचें वृत्त समजतांच जनकराजा तेथें धावून आला. छप्पन्न देशींचे राजे त्या ठिकाणीं प्राप्त झाले. रामचंद्र व सीता यांनीं वसिष्ठ गुरूंच्या चरणावर मस्तक ठेविलें. रामानें सर्व नृपतींना आलिंगन दिलें. रामचंद्र व सीता यांनीं कैकयी, सुमित्रा, कौसल्या यांना वंदन केलें. सर्वांनीं मंगल स्नानें केलीं. नगरवासी नारीनरांनीं रामचंद्र

आणि सीता यांचें दर्शन घेतलें. वसिष्ठानें रामाला अभिषेक कर-ण्याची सर्व तयारी केली. सीतारामास मंडपांत बसवून ऋषींनीं त्यांच्यावर वेदमंत्रांनीं अभिषेक केला. त्यांनीं जानकीसहवर्तमान रामाला सिंहासनावर बसविलें. अभिषेकोत्सवास आलेल्या सर्व मंड-ळींना ज्याच्या त्याच्या दर्जानुसार बक्षिसें देण्यांत येऊन सर्व पाहुणे परत गेले. याचकांना अपार दानें देण्यांत आलीं. अतृप्त व दुःखी कोणीही राहिला नाहीं. याप्रमाणें समारंभ यथासांग पार पडला. साध्वीव्रततत्पर सीतेसह रामचंद्र यथान्याय राज्य करूं लागले. अशाप्रकारें जिच्या पातिव्रत्यामुळें रामचंद्र विजयी झाले; व ज्याच्या भक्तीमुळें सीता सर्व देव, ऋषि, साधुसंत इत्यादिकांना वंद्य झाली त्या सीतारामाच्या नांवाचा उच्चार करितांच महत्पातकांची होळी होऊन भवरोगाचें निर्सन होईल आणि मनुष्य पूर्णकाम होऊन अंतीं परमपदाला जाईल याबद्दल संशय नाहीं !

## ९ पद्मावती.



जगन्नाथ क्षेत्रामध्यें एक अग्निहोत्री ब्राम्हण राहत असे. त्याला एक पद्मावती नांवाची कन्या होती. पद्मावती ही स्वरूपानें सुंदर होती. तिचे नेत्र कमलाप्रमाणें असल्यामुळें ती सदा प्रसन्न दिसत असे. तिचें अपूर्व लावण्य व पद्माक्षीप्रमाणें असलेले नेत्र यामुळेंच तिचें पद्मावती असें नांव ठेविलें होतें. आपल्या कन्येचें रूप गुण-लावण्य ध्यानांत आणून तिच्या बापानें कांहीं निराळाच विचार मनांत आणला. त्यानें भक्तिभावानें ती कन्या आपल्या मनानें

जगन्नाथासच अर्पण केली. पद्मावती वयानें मोठी होतांच लोकाचारा-प्रमाणें तिच्या लग्नाची वाटाघाट चालू झाली. तिचे सद्गुण व सौंदर्य जाणून उत्तम अशा द्विजकुलांतील वराकडून तिला मागण्या येऊं लागल्या. कन्येला आलेल्या मागण्यांपैकीं तिच्या बापानें कोणतीही मागणी मान्य केली नाहीं. आपण आपली कन्या कृष्णा-र्पण केली असल्याचें त्यानें सर्वांना स्पष्टपणें सांगितलें.

कांहीं दिवस गेल्यानंतर भगवान् श्रीविष्णूंनीं ब्राम्हणाच्या स्वप्नांत जाऊन त्यास असें सांगितलें कीं, "तूं आपली कन्या पद्मावती मला अर्पण केली आहेस. मी या कलियुगांत बौद्धरूपी असल्यामुळें मला तुझ्या कन्येचा भार्या या नात्यानें स्वीकार करितां येणार नाहीं. जयदेव नांवाचा कवि हल्लीं हयात आहे. तो माझाच पूर्ण अंश आहे. तरी तूं ती कन्या त्या जयदेवाला अर्पण कर."

असें स्वप्न पाहून त्या ब्राम्हणाला मोठा हर्ष वाटला. त्यानें जयदेवाची गांठ घेतली. त्याला तो सर्व वृत्तान्त कथन केला. जय-देवाचा रुकार मिळतांच त्या ब्राम्हणानें घटित पाहून लग्नाचा निश्चय केला. त्यानें अलंकारासहित सर्व साहित्य तयार केलें. देवक-प्रतिष्ठा, ब्राम्हणभोजन, निर्विघ्नाचें पूजन करून त्यानें सालंकृत कन्यादान केलें. ब्राम्हणांनीं मंगलाष्टकें म्हणून जयदेव व पद्मावती यांचें लग्न लाविलें. चार दिवस आनंदीआनंद होऊन लग्नसोहळा यथासांग पार पडला.

जयदेव आपल्या पत्नीसह जगन्नाथ क्षेत्रांतच मुक्काम करून राहिला. कांहीं काळानें एका सावकारानें जयदेवास आपल्या गांवीं नेऊन आपल्या घरीं कांहीं दिवस ठेवून घेतलें. थोडे दिवसांनीं जयदेवानें आपल्या गांवीं परत जाण्याची इच्छा दर्शविली. तेव्हां सावकारानें त्याच्या मर्जीप्रमाणें त्याची बोळवण केली. त्यानें त्याच्याबरोबर अपार

धन व पद्मावतीकरितां पुष्कळ अलंकार दिले. त्या धनालंकारांसह जयदेव परत येत असतां त्याला अरण्यामध्यें दोन चोरांनीं गांठलें. त्यांनीं त्याची संपत्ति हरण केली व त्याचे हातपाय तोडून त्याला एका कूपांत नेऊन टाकलें.

त्याच दिवशीं क्रौंच नांवाचा राजा त्या अरण्यांत शिकार करण्याकरितां आला. शिकारीच्या श्रमानें थकून तो राजा पाणी पिण्याच्या निमित्तानें त्या कूपाकडे गेला. त्या कूपांत लुला होऊन पडलेला जयदेव आत्मदुःख विसरून हरिभजन करीत होता. त्याच्या भजनाचा स्वर क्रौंचराजाच्या कानावर पडतांच त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें मोठ्या धैर्यानें व शौर्यानें जयदेवास बाहेर काढलें. तो हातपायरहित आहे असें पाहून राजाला फार वाईट वाटलें. त्यानें त्याच्या त्या दुःखद स्थितीची चौकशी केली. जयदेव हा ज्ञानसंपन्न व भगवद्भक्त असल्यामुळें त्यानें त्या राजाला चोरांचा कांहींच प्रकार सांगितला नाहीं. त्यानें त्यावेळीं मोठें तात्विक भाषण करून देहाचें अनित्यत्व व आत्म्याचें नित्यत्व याचीच प्रौढी गायली. त्याचा अधिकार ओळखून राजानें त्यास आपल्या नगरांत नेलें.

जयदेवाची परत येण्याची मुदत टळतांच पद्मावती चिंतायुक्त झाली. तिनें लागलीच सावकाराकडे मनुष्य पाठवून आपल्या पतीची चौकशी केली. जयदेवाची सावकारानें बोळवण केली. असें वर्तमान कळतांच पद्मावती जास्तच चिंतातुर झाली. ती चोहोंकडे पतीची चौकशी करूं लागली; पण तिला कांहींच पत्ता लागेना. ती एकसारखी पतीचें नामस्मरण करीत त्याच्या भेटीविषयीं आतुर होऊन राहिली.

क्रौंच राजानें जयदेवाची पूजा करून त्याला आपला गुरु केला. त्या ठिकाणीं जयदेवाच्या भेटीकरितां पुष्कळ संतजन येऊं लागले.

संतजनांचा सत्कार करून राजा त्यांना धनदौलत देत असे. संपत्तीच्या मोहानें जयदेवाला अपकार करणारे ते दोन्ही चोर संतवेषांत त्या ठिकाणीं प्राप्त झाले. त्या ठिकाणीं जयदेव कवि अधिकारसंपन्न होऊन राहिलेला असेल अशी त्यांची कल्पनाही नव्हती. द्रव्यलाभ होईल या आशेनें ते दोघे क्रौंचराजाकडे येतांच त्यानें त्यांना जयदेवाकडे नेलें. जयदेवानें त्यांना ओळखलें पण तो भक्तश्रेष्ठ असल्यानें अपकाऱ्यावर उपकार करणें हेंच तो आपलें ब्रीद समजत होता. त्यानें त्या चोरांना कांहींच ओळख न देतां राजाकडून त्यांची बरदास्त राखली. ते दोघे तेथून जाण्यास निघाले तेव्हां जयदेवानें राजाकडून त्यांना धन देऊन संतुष्ट केलें. राजानें आपले सेवक बरोबर देऊन त्यांची बोळवण केली. मार्गक्रमण करीत असतां राजसेवकांनीं त्या संतरूपीं भामटयांस त्यांची हकीकत विचारली. त्या दुष्ट पाप्यांनीं त्यावेळींही सत्य भाषण न करितां बनावट मजकूर सांगून आपण जयदेवाचे प्राण वांचविले आहेत असें मोठया आढ्यतेनें सांगितलें. त्यांनीं तशा असत्यवाणीचा उच्चार करतांच धरणीदेवी एकदम कंपायमान झाली आणि तिनें त्या दोघां पापतत्पर दुष्टांना गट्ट करून टाकलें. तो प्रकार पाहून राजसेवक भयभीत झाले. त्यांनीं राजाकडे येऊन तो सर्व वृत्तांत राजा व जयदेव यांना कळविला. राजाला मोठें आश्चर्य वाटलें. जयदेवाची वृत्ति मात्र कांहीं चमत्कारिक झाली. ते चोर आपले अपकारकर्ते होते हें तो जाणत होता. तो सामान्यजन असतां तर आपल्या शत्रुनाशानें तो आनंद पावला आसता. पण तो हरिभक्त होता. तो समभावी असल्यामुळें त्याच्याशीं वैर करणाऱ्यांबद्दलही दुष्टभाव धारण करणें ही गोष्ट त्याला खपणारी नव्हती. राजसेवकांनीं सांगितलेलें वर्तमान ऐकतांच त्याला गहिंवर आला. आपल्याशीं शत्रुत्व करणाराला अधोगति मिळणें ह्मणजेहीं

आपली दुष्कीर्तीच आहे असें वाटून त्यानें परमेश्वराचा धावा केला. त्याची भक्तियुक्त प्रार्थना ऐकून परमेश्वरानें त्याला दर्शन दिलें. भगवंताचें दर्शन होतांच जयदेवाचे हातपाय पूर्वीप्रमाणें झाले. त्याच्या इच्छेस अनुसरून परमात्म्यानें त्या दोन्ही चोरांचा उद्धार करून सत्संगतीचें महात्म्य वाढविलें. यावेळीं राजानें जयदेवास त्याचा पूर्व वृत्तांत विचारला. राजाच्या इच्छेप्रमाणें जयदेवानें त्याला आतांपर्यंतचें सर्व चरित्र सांगितलें. जयदेवस्वामीस पद्मावती नांवाची स्त्री आहे हें समजतांच राजानें पालखी पाठवून पद्मावतीस आपल्या नगरींत आणलें. पतिभेटीकरितां अन्नपाणी वर्ज करून रात्रंदिवस तळमळत असलेल्या पद्मावतीला जयदेवाचे चरण दृष्टीस पडतांच अत्यानंद वाटला. राजानें पद्मावतीला वस्त्रें अलंकार अर्पण केले व राजा स्वतः जयदेवाच्या सेवेस लागला आणि त्यानें आपल्या पत्नीलाही पद्मावतीच्या सेवेला लाविलें.

याप्रमाणें कांहीं काळ गेल्यानंतर सर्व राजस्त्रिया पद्मावतीसह गप्पागोष्टी करीत बसल्या होत्या. त्या समयीं राजशालकाची भार्या त्या ठिकाणींच रहावयास आलेली होती. पद्मावती सर्व स्त्रियांच्यामध्यें बसली होती. सर्व नद्यांमध्यें जशी भागीरथी, सर्व मंत्रांत जशी गायत्री, सुगंधित पदार्थांत जशी कस्तुरी, सर्व अलंकारांत जशी गळसरी त्याप्रमाणेंच त्या सर्व स्त्रियांत पद्मावती मुख्यस्थानी शोभत होती. एकमेकींशीं विनोदपर भाषणें करण्यांत त्या सर्वजणी गढून गेल्या आहेत तों त्या ठिकाणीं कांहीं राजदूत दुष्ट बातमी घेऊन आले. त्यांनीं आणलेल्या बातमीनें त्यांचा सर्व आनंद मावळला. राजदूतांनीं असें सांगितलें कीं, “ राजाचा मेहुणा एकाएकीं मृत झाला असून तें दुःखद वर्तमान आपणांस कळविण्याचें आमच्या वांशिनीं आलें आहे. ”

हें ऐकतांच राणीनें किंकाळी फोडली. ती आपल्या भावाकरितां शोक करूं लागली. तिची भावजयही पतिनिधनामुळें आक्रोश करूं लागली. त्यांचा विलाप ऐकून इतर स्त्रियांही दुःख करूं लागल्या. कांहीं वेळानें राणीचा शोक बंद झाला. तिची भावजय मात्र रडणें बंद करीना. राणी व इतर स्त्रिया यांनीं तिची बरीच समजूत केली; पण ती कांहीं केल्या ऐकेना. ती पतिनिष्ठ असल्यानें तिला पतीच्या पश्चात् जगणें श्रेयस्कर वाटेना. तिनें सती जाण्याची इच्छा प्रगट केला. तिची ती इच्छा कळतांच राणीस मोठें नवल वाटलें. इतर स्त्रियाही आश्चर्यभरित होऊन तिच्याकडे दृष्टि लावून बसल्या. परंतु पद्मावती मात्र मौन धरून स्वस्थ होती. इतर स्त्रिया आणि पद्मावती यांच्या वृत्तींतील फरक ध्यानांत आणून राणी पद्मावतीस ह्मणाली, " आपल्या पतीवर निष्ठा ठेवून माझी भावजय सती जाऊं पाहत आहे याबद्दल आपल्याला कांहींच आश्चर्य वाटत नाहीं हें कसें ? माया, ममता, स्वप्राणलोभ, सौख्य यांचा त्याग करून माझी पतिव्रता भावजय सती जात आहे ही गोष्ट नवल करण्यासारखी नाहींच काय ? असें अद्भुत पुण्य जोडणारी स्त्री सर्वांच्या स्तुतीस पात्र नाहीं कां ?"

राणीचें भाषण ऐकून पद्मावतीनें शांतपणानें सांगितलें, "तुमची भावजय स्तुतीस पात्र नाहीं असें कोण ह्मणेल; पण त्याबद्दल मोठेंसें नवल करण्याचें विशेष कारण नाहीं. एकपतिनिष्ठ साध्वी स्त्रिया पतीच्या मागें स्वतःला मृतच समजतात. पतिव्रतांचा हा सत्यधर्मच होय. पण अशाप्रकारें सती जाणें ह्मणजे थोडें कमी दरजाचेंच आहे. पतीचा प्राण जाऊन किती तरी वेळ गेल्यानंतर सती जाऊन त्याची भेट होण्यास उशीरच लागणार ! आपली भावजय महान् पतिव्रता आहे यांत संशयच नाहीं. आपण स्वतःही श्रेष्ठ साध्वीव्रतपर आहां. तरी पण माझें ह्मणणें इतकेंच आहे की, भ्रताराची मरणवार्ता कानीं

पडतांच पतिव्रता स्त्रीचा प्राण देह सोडून गेला पाहिजे. पतिपत्नी यांमध्यें जर सूर्य आणि त्याची प्रभा यासारखा संबंध आहे तर सूर्यास्ताबरोबरच त्याच्या प्रभेचा लय होणें इष्ट नाहीं कां ? ”

पातिव्रत्याच्या अत्यंत श्रेष्ठ दरजाचा विचार केला असतां पद्मावतीचें भाषण यथायोग्यच होतें; पण राणीला तें यावेळीं रुचलें नाहीं. पद्मावती कांहींतरी बढाया सांगून आपला श्रेष्ठपणा स्थापूं पाहत आहे असें मानून ती तें भाषण फुशारकीचें समजली. बरोबरच आहे; राणीला पद्मावतीची खरी किंमत अद्याप समजलीच नव्हती. ती आपल्या विचारावरूनच दुसऱ्याच्या मनोवृत्तीची कल्पना बसविणारी होती. ज्याला प्रत्यक्ष अनुभव प्राप्त झाला नाहीं त्याला ब्रह्मज्ञानाचें विवेचन खरें कसें वाटणार ? पद्मावतीनें श्रेष्ठ पातिव्रत्याच्या गोष्टी सांगितल्या तरी प्रत्यक्ष अनुभव पटेपर्यंत राणीला त्या वृथा वल्गना आहेत असें वाटणेंच साहजिक होतें. ती तिचें भाषण असत्यच धरून चालली. तिनें ती वेळ तशीच जाऊं देऊन तें आढ्यतेचें भाषण ध्यानांत ठेविलें आणि पद्मावतीची परीक्षा करण्याचा बेत ठरविला.

कांहीं दिवसांनीं राणीनें प्रधानाशीं मसलत करून, त्यास असें सांगितलें, “ मला पद्मावतीच्या श्रेष्ठतम पातिव्रत्याची कसोटी पहावयाची आहे, त्याकरितां तुम्ही मला मदत करा. तुम्ही जयदेव स्वामींस कांहीं निमित्तानें येथून दूर न्या. आणि तो अकस्मात् मरण पावला अशी बातमी नगरांत पाठवून द्या. जयदेवाची मृत्युवार्ता कळली म्हणजे पद्मावती काय करते तें मला पहावयाचें आहे. ”

राणीचें कार्य जाणून प्रधानानें ती गोष्ट कबूल केली. तसा कांहीं प्रसंग येण्याची तो सावध राहून वाट पहात होता. कांहीं दिवसांनीं राजा जयदेवासह वनक्रीडेस निघाला. तें पाहून प्रधान व राणी यांनीं आपली मसलत साधली. त्यांच्याबरोबर प्रधानही वनक्रीडेस गेला.

जातांना त्यानें जयदेवाचीं वस्त्रें गुप्तपणें आपल्याबरोबर घेतलीं होतीं. त्यानें आपल्या कांहीं सेवकांनांही मथवून ठेविलें होतें. वनांत गेल्यावर प्रधान व राजा यांनीं व्याघ्राच्या शिकारी केल्या. प्रधानानें जयदेवाचीं वस्त्रें वाघाच्या रक्तांत भिजवून तीं सेवकांबरोबर दिलीं व त्यांना असें सांगितलें, " तुह्मी हीं वस्त्रें घेऊन राणीसाहेबांकडे जा व जयदेवाला वनामध्यें वाघानें मारिलें असें त्यांस कळवून गांवांतही त्याचा बोभाटा करा. " प्रधानाच्या आज्ञेप्रमाणें ते सेवक वस्त्रें घेऊन राणीकडे गेले. राणीला तो सर्व बेत आधींच ठाऊक होता. तिनें तीं रक्तानें भरलेलीं वस्त्रें पाहतांच दुःखाचा बहाणा करून रडण्यास सुरुवात केली.

यावेळीं पद्मावती आपल्या महालांत बसली होती. तेथें कांहीं दासी व इतर राजस्त्रियाही होत्या. राणी मनामध्यें कपटभाव धरून नक्राश्रू ढाळीत पद्मावतीकडे गेली. तिचें तें दुःख पाहून पद्मावती तिला शोकाचें कारण विचारूं लागली. तिनें लागलींच तीं रक्तार्द्र वस्त्रें तिच्यापुढें टाकून तिला जयदेवाच्या मृत्यूचें वृत्त कळविलें.

राणीच्या मुखांतून पतिनिधनाचें वृत्त ऐकतांच व तीं वस्त्रें पाहतांच त्या उच्चतम साध्वीनें तेथेंच प्राण सोडला. सूर्यास्त होतांच जसे त्याचे किरण मावळतात, दीपक विझतांच जसा त्याच्या प्रभेचा तात्काल लोप होतो, पौर्णिमा उलटतांच जशा चंद्राच्या कला तुटतात, पुष्पांचा चुरगळा करितांच जसा त्याचा सुवास नाहींसा होतो, त्याप्रमाणें जयदेवाच्या नाशाची बातमी कळतांच त्या थोर पद्मावतीच्या आत्म्यानें तिच्या कुडीचा त्याग केला. तिची ती मृत दशा पाहतांच राणीला मोठेंच आश्चर्य वाटलें. आपण कपट धरून भलत्याच गोष्टीचा अनुभव पाहण्याचा खटाटोप केला याबद्दल आतां तिला फार पश्चात्ताप होऊं लागला. पद्मावतीची पतिनिष्ठा पाहून

सर्वांना तिचा महिमा कळून चुकला. राजशालकाच्या मरणसमयीं तिनें ज्या गोष्टी सांगितल्या त्या शिळोप्याच्या गप्पा नव्हत्या असें आतां सर्वत्रांच्या प्रत्ययास येऊन सर्वजण त्या सत्वशील पतिव्रते बद्दल फारच हळहळूं लागले.

वनक्रीडा संपल्यावर राजा जयदेव व प्रधान यांसह परत आला. गांवांत येतांच त्यानें सर्व लोक दुःख करीत आहेत असें पाहिलें. घरीं येतांच त्याला पद्मावतीच्या मरणाचा सर्व वृत्तांत समजला. आपल्या भार्येनें कपटक्रिया केल्यामुळेंच एकंदर अनर्थ ओढवला असें जाणून तो राणीला ठार मारण्यास तयार झाला. तरी पण राणीचा वध केला तरी पद्मावती परत न येतां स्त्रीहत्या मात्र आपल्या डोक्यावर बसेल असा विचार उत्पन्न होऊन राजा राणीला मारण्याच्या कल्पनेपासून परावृत्त झाला. राणीच्या हातून घडलेल्या पातकाची निष्कृति करण्याकरितां तो स्वतःच अग्निकाष्ठ भक्षण करण्यास तयार झाला. त्यानें गांवाबाहेर अग्नि तयार करण्यास सांगितलें. अग्नीमध्यें आपली आहुती देण्यास जाण्यापूर्वीं तो जयदेव स्वामीस नमस्कार करण्याकरितां गेला. जयदेवस्वामी अंतर्ज्ञानी असल्यामुळें त्यांनीं सर्व गोष्टी ओळखल्याच होत्या. राजानें त्यांना नमस्कार करून आपला सर्व बेत कळविला. राजाची ती सात्विकी निष्ठा पाहून जयदेवस्वामी प्रसन्न झाले. त्यांनीं राजाला आत्मघातापासून परत फिरविलें आणि सर्व मंडळींसह ते आपल्या प्रिय पत्नीच्या प्रेतासंन्निध गेले.

जयदेवस्वामींनीं त्यावेळीं आपल्या हातांत वीणा धारण केला होता. पद्मावतीचें प्रेत पाहतांच जयदेवांना प्रेमाचें भरतें आलें. तिची पातिव्रत्याची कल्पना ध्यानांत घेऊन जयदेवांना गहिंवर दाटला. तिच्या सत्वसंपन्नतेविषयींच्या आदरानें त्यांचें अंतःकरण भरून गेलें. हातामधील वीणाच्या सुस्वरावर त्यांनीं तेथें राधाविलास

आरंभिला. त्यांनीं त्यावेळीं चोवीस अष्टपद्या तयार करून हरिलीला गायली. नंतर त्यांनीं परमेश्वराच्या नांवाचा सारखा गजर उसळून दिला. त्यांनीं परमात्म्याचा धावा आरंभिला. "हे भक्तवत्सल, आनंदकंदा गोपाला; धाव; या जयदेवाच्या उद्धारार्थ धावत ये. गजेंद्राची करुणा ऐकून तूं जसा गरुडावर बसून धावलास, प्ऱ्हादाचें रक्षण करण्यास तूं जसा खांबांतून प्रगट झालास, त्याप्रमाणेंच यावेळींही येथें प्रगट हो. हे मधुसूदना; हे गोपींचें मनरंजन करणाऱ्या श्रीकृष्णा ! पांडवांचें रक्षण करण्यास तूं जसा त्वरेनें धावलास त्याप्रमाणें आत्तांही सत्वर धावून ये. तूं भीमातीर-वासी दिगंबर आहेस; तूं पतितपावन आहेस; तूं अनाथांचा नाथ असून भक्तजनांचा उद्धार करणें हें तुझें ब्रीद आहे. द्रौपदीची लाज राखण्याकरितां तूं जसा तातडीनें धावलास त्याप्रमाणें या दीन, अनाथ, पतित जयदेवाचें संरक्षण करण्याकरितां त्वरित ये."

जयदेवाचा धावा ऐकून भगवंतानीं जयदेवास दर्शन देऊन पद्मावतीला सजीव केलें. पद्मावती उठून बसतांच एकच जयजय-कार झाला. सुरवरांनीं विमानांत बसून पुष्पवृष्टि केली. सर्वांना मोठा आनंद वाटला. सर्व मंडळी हरिनामाचा गजर करूं लागली. राजानें जयदेवाला साष्टांग नमस्कार घातला. जयदेवानें राजाला आशिर्वाद देऊन उठविलें आणि आपल्या पोटाशीं धरिलें. जयदेव व साध्वी पद्मावती यांची भेट झाली. राणीनें पद्मावतीचें चरण धरिले. जो तो जयदेव व सावित्रीतुल्य पद्मावती यांची स्तुति करूं लागला. अशा प्रकारच्या साध्वींचीं चरित्रें गाणाऱ्या भाविक जनांना संकट-काळीं परमात्मा सहाय्य करून त्यांच्यावर आपलें कृपाछत्र उभारील यांत संशयच नाहीं.

---

# १० सुलोचना.



लंकेवर राज्य करणाऱ्या महाबलाढ्य रावणाला मेघनाद या नांवाचा एक पुत्र होता. त्यानें जन्मताक्षणीं मेघासारखी आरोळी फोडली ह्मणून त्याला मेघनाद असेंच नांव पडलें. तो अत्यंत बलाढ्य निपजला. त्यानें मोठमोठे अभिचार यज्ञ करून अनेक शस्त्रास्त्रें व वरदानें मिळविलीं. त्यानें इंद्राशीं युद्ध करून त्याला जिंकलें. या कारणानें तो मेघनाद पुढें इंद्रजित या नांवानें प्रख्यात झाला. सुलोचना ही त्या इंद्रजिताची भार्या होय.

सुलोचना ही शेषाची कन्या होय. ती स्वरूपानें फारच लावण्यसंपन्न होती. तिचें सौंदर्य पाहून देवांगनाही लज्जित होत. इंद्राची शची ही तिची दासीही शोभत नसे. कित्येक गंधर्वकन्या सुलोचनेच्या सेवेला सादर असत. तिच्या अंगाच्या सुवासानें आसपासचें वातावरण सुगंधित होत असे. तिच्या नाजुकपणाशीं तुलना करण्यास मदनाची रतीही योग्य नव्हती. नैषधपत्नी दमयंतीच्या स्वरूपास कित्येक काव्यकर्त्यांनीं बहुत थोरवी दिली आहे; पण या शेषकन्या सुलोचनेपुढें दमयंतीचें लावण्यही फिकें पडण्यासारखें होतें.

सुलोचना सौंदर्याप्रमाणें सद्गुणानेंही संपन्न होती. ती साध्वी व्रताचार जाणत होती. ती नेहमीं आपल्या पतीच्या सेवेंतच दंग असे. इंद्रजित हा जरी भलभलते यज्ञ करून तामसी शक्ति प्राप्त करून घेण्याच्या खटपटींत असे तरी ती शुद्ध साध्वी नेहमीं आपल्या पतीला तामसी भाव टाकण्याची विनंति करी. सुलोचनेचे सद्गुण पाहून व तिची पतिनिष्ठा ध्यानांत आणून इंद्रजित तिला जीवकीं प्राण करीत

असे. तिचेंहि आपल्या भ्रतारावर निःस्सीम प्रेम होतें. तिच्या सद्गुणामुळें रावणावरही तिचें कांहींसें वजन असे. रावणानें अभिलाषबुद्धि धरून श्री रामचंद्राची जानकी पळवून आणली तेव्हां सुलोचनेनें राव-णासही शुद्ध धर्माचा उपदेश करण्यास कमी केलें नाहीं. परस्त्री व परधन यांचा अभिलाष करणें कसें घातक आहे ह्याचें प्रतिपादन करून तिनें इंद्रजिताला सीतेला सोडून देण्याविषयीं वारंवार विनंति केली होती. अशाप्रकारची ती सती सुलोचना आपल्या पतीबरोबर आनंदानें काळक्रमणा करीत असतां तिच्यावर भयंकर संकट ओढवलें.

रामरावणाच्या युद्धांत रावणाच्या असंख्य सैन्याचा निःपात झाला. त्याचें मकराक्ष, महापार्श्व, नरांतक वगैरे वीर पडून त्याचा पुत्र अतिकाय व बंधु कुंभकर्ण हेही समरांगणावर पतन पावले. पुत्र व बंधु यांचा अंत होतांच रावण मूर्च्छित होऊन सिंहासनावरून खालीं पडला. इंद्रजितानें त्याला पडतां पडतां सावरून सावध केलें. त्यानें त्यास आपल्या पराक्रमाची प्रौढी सांगून तो रामलक्ष्मणांचा नाश करण्याकरितां समरांगणावर गेला.

इंद्रजिताला ब्रह्मदेवापासून असें वरदान मिळालें होतें कीं, जो वीर चौदा वर्षें निराहारी राहून ब्रम्हचारी राहिला असेल त्या-च्याच हातून इंद्रजिताला मृत्यु प्राप्त होईल. या वरदानामुळें इंद्रजित आपणास अजिंक्य समजत होता. तशा प्रकारचा व्रतस्थ वीर सांपडणें दुर्घट आहे असें जाणून इंद्रजित निःशंक मनानें राम-लक्ष्मणावर बाणांची वृष्टि करूं लागला. रामाचा बंधु लक्ष्मण हा शेषाचा अवतार असल्यानें तो सुलोचनेचा पिताच होता. याप्रकारें लक्ष्मणाकडे जरी इंद्रजिताच्या श्वशुराचें नातें होतें तरी त्याच्याच हस्तें इंद्रजिताचें शिर तुटावयाचें ठरलेलें असल्यानें तो रामबंधु तसा व्रतस्थ वीर होता, ही गोष्ट बिचाऱ्या इंद्रजिताच्या गांवींही नव्हती.

इंद्रजितानें युद्धामध्यें मेघांच्या आड दडून रामलक्ष्मण यांना नागपाशानें बद्ध केलें. त्यावेळीं भगवद्भक्त गरुडानें धांवत येऊन रामलक्ष्मणांचा मोह दूर केला. नागपाशांतून रामलक्ष्मण सावध होतांच ते फार खवळले. ते इंद्रजिताला पाहूं लागले परंतु तो यावेळीं निकुंभलेकडे गेला होता. रामलक्ष्मण सुवेळा नांवाच्या पर्वतावर होते. रामानें लक्ष्मणाच्या डोक्यावर हात ठेवून त्याला दिव्य अस्त्रांचा उपदेश केला आणि लक्ष्मण वानरसैन्य बरोबर घेऊन इंद्रजितावर चाल करून गेला.

लक्ष्मण व इंद्रजित यांचें युद्ध जुंपलें. लक्ष्मणाच्या अमोघ बाणानें इंद्रजिताच्या भुजा व शिर तुटलें. तें शिर आकाशमंडळांत उडून खालीं पडत असतां तें ऋषभवानरानें झेललें. लक्ष्मणाला यश प्राप्त होतांच तो आपल्या सैन्यासह सुवेळा पर्वताकडे परतला. रामचंद्राला इंद्रजिताचें शिर दाखवावें या हेतूनें ऋषभवानर तें शिर घेऊन सर्व सेनेबरोबर रामचंद्राकडे गेला.

इंद्रजिताची व लक्ष्मणाची लढाई चालली होती तेव्हां सुलोचना आपल्या मंदिरांत बसली होती. तिचें नेत्र आपल्या पतीकडे लागले होते. आपला पति विजय मिळवून परत येतांच आपण त्याला ओवाळूं असल्या विचारांनीं तिचें अंतःकरण व्यापलें होतें; मध्येंच तिचे ते विचार नाहींसे होऊन त्या जागीं दुसऱ्याच कल्पना उठत. आपला सासरा रावण व पति इंद्रजित यांनीं रामकांता सीतासतीचा छळ चालविला आहे त्या अर्थीं त्यांना युद्धामध्यें यश मिळणें दुरापास्त आहे असें वाटून ती मनामध्यें वरचेवर खिन्नही होत असे. अशा तऱ्हेच्या विचारांत सुलोचनेचें मन हेलकावे खात आहे तोंच तिच्या मंदिराच्या अंगणामध्यें कांहीं तरी पडल्याचा आवाज झाला. अंगणांत एकाएकीं काय येऊन पडलें हें पाहण्याकरितां तिच्या दासी मंदिरांतून बाहेर आल्या तों त्या अंगणांत कोणा वीर पुरुषाचा हात

पडला आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. त्यांनीं सुलोचनेला ती गोष्ट कळविली. सुलोचना अंगणांत येऊन तिनें तो वीरहस्त पाहतांच तिचा चेहरा तेव्हांच उतरला, नेत्र विव्हल झाले, अंग विकळ जाहलें व तिच्यानें पाऊल टाकवेना. लढाईमध्यें आपल्या शूर पतीचा अंत होऊन त्याचाच हातें आपल्या अंगणांत येऊन पडला आहे असें त्या पतिव्रतेनें जाणलें. ती आक्रांत करूं लागली. कोमल फुलाच्या कळीवर वीज पडावी त्याप्रमाणें सुलोचनेची स्थिति झाली. ती निस्तेज होऊन पडली. लोभी जसा धननाश झाला असतां तळमळतो त्याप्रमाणें ती तळमळूं लागली. आपल्या पतीचा पराक्रम आठवून ती ह्मणूं लागली, "कालाची गति किती विपरीत आहे पहा! आज अगस्ती मृगजलांत बुडाला! अंधकाराच्या पेवांत सूर्य गडप् झाला! हरिणबालकानें वनामध्यें सिंह पकडला. शत्रूशीं लढाई करीत असतां इंद्रजिताचा पाडाव झाला ह्मणजे मुंगीनें मेरूच गिळला ह्मणावयाचा! आळीनें गरूड गट्ट करावा, चिलटानें वणवा प्राशन करावा, पिशाच्चांनीं शंकराला कैद करून न्यावें अशांतलाच आज हा अघटित प्रकार घडला!"

सुलोचनेचा विलाप ऐकून तिच्या दासी अगदीं भांबावून गेल्या. त्यांनीं तिला बसती केली; आणि त्या तिला धरून बसल्या. सुलोचनेनें तो पतीचा हात कवळून ती त्याला ह्मणाली, "माझ्या पतीस मरण कसें आलें; लढाईमध्यें काय काय वृत्तांत घडला तो मला लिहून दाखीव. आजपर्यंत मी जर पातिव्रत्यधर्मानें वागलें असेन, आजपर्यंत पतिचरणींच माझें मन तल्लीन झालें असेल तर मला सर्व हकीगत लिहून दाखीव."

असें म्हणून तिनें त्या भुजेपुढें भूर्जपत्र, शाई व लेखण आणून ठेविली. पतिव्रतेची आज्ञा जाणून त्या भुजेनें सर्व मजकूर लिहून दाखविला. पत्रलेखन होतांच सुलोचनेनें तें पत्र वाचलें. त्यांत असा

मजकूर लिहिला होता कीं, " हे शेषकन्ये; माझे प्राणवल्लभे सुलोचने ! जयाची आशा धरून मी अग्नींत हवन केलें. अग्नीमधून दिव्य रथ बाहेर आला. फलप्राप्तीचा समय साधून माझे शत्रु तेथें धावून आले. त्यांनीं मोठमोठ्या शिळा टाकून माझें दैवत क्षोभविलें. सगळा पर्वत चढून गेल्यानंतर शिखरावरून कोणीतरी धक्का मारावा, सबंद नदी पोहून आल्यानंतर अगदीं तीराजवळ बुडावें; वैराग्यज्ञान प्रगट होतांच विषयांचा हल्ला येऊन पडावा; मोठ्या कष्टानें वेदाध्ययन संपविल्यानंतर अभिमानाची धाड पडावी त्याप्रमाणेंच यावेळीं माझी अवस्था झाली. माझ्या शत्रूंनीं अखेर वेळ साधली. भयंकर संग्राम सुरू झाला; पण जय आह्माला पारखा झाला. विजयश्रीनें लक्ष्मणाला माळ घातली. सौमित्राची धनुर्विद्या व शौर्य पाहून मी आपलें शिर त्यास अर्पण केलें. देहत्रय निरसून मी रामचंद्राशीं मित्रत्व जोडलें. देहाची आशा धरून बिभीषण भीतीनें शरण गेला. सौमित्र हा बहुत दिवस निराहार राहून व तीव्रतप करून अखेर समुद्र उतरला आणि मजपाशीं माझें शिर मागण्यास आला. मी कृपणता टाकून त्याला शिरदान केलें. त्यानें माझें शिर रामचरणीं अर्पण केलें. माझा देह रणामध्यें उभा आहे. माझें शिर रामदर्शनास गेलें आहे. मीं आपला हात तुला बोलावण्याकरितां तुझ्याकडे पाठवून दिला आहे. दुर्घट मायानदीचें उल्लंघन करून मी पैलतीरावर तुझी वाट पाहत आहे. प्राणप्रिये; तूं सत्वर येऊन मला भेट दे. हा संसार परम दुस्तर आहे. रामचरणाच्या ठिकाणीं अपार सुख आहे हें समजल्यामुळें तुझ्याकडे मीं आपला हस्त पाठविला आहे. तूं त्वरित निघून ये. "

अशा मजकुराचें पत्र वांचतांच सुलोचनेनें अंग धरणीवर टाकिलें. ती पुन्हां शोक करूं लागली कीं, " आज बळाचा समुद्र आटला; धैर्याचा पर्वत खचला; प्रतापाचा वृक्ष उपटून पडला. ज्या इंद्रजीतरूपी

सूर्याच्या किरणांनीं शत्रुरूपीं तारांगणें मावळत असतां त्याला आज लक्ष्मणरूपीं राहूनें खग्रास ग्रहण लाविलें. रणसरोवरांमधील शत्रुरूपीं कमळें छेदन करणाऱ्या इंद्रजीतरूपीं हत्तीच्या गंडस्थळावर आज त्या सौमित्रसिंहानें आपला पंजा मारून तें गंडस्थळ विदीर्ण केलें. ऐरावतावर बसलेल्या इंद्राला ज्यानें समरांगणामध्यें उलथून पाडलें त्या इंद्रजिताला लक्ष्मणासारख्या मानवानें मारावें काय ? माझ्या सौभाग्यठेव्यावर लक्ष्मणानेंच दरवडा घातला. माझ्या सौभाग्यसागराचें आचमन करण्यास लक्ष्मणच अगस्ति झाला. ”

सुलोचनेचा शोक ऐकून तिच्या सख्याही रडूं लागल्या. त्यांनीं रडत रडतच तिची नानाप्रकारें समजूत केली. सखीजनांच्या समजुतीच्या गोष्टीस कांहींसा मान देऊन सुलोचनेनें तेवढ्यापुरता शोक बंद केला आणि ती आपल्या मंदिरांत गेली. तेथील संपत्ति पाहून तिला फारच वीट आला. परापवादानें जसे सज्जन विटतात, परदारा पाहतांच जशी विरक्तांना किळस येते त्याप्रमाणेंच मंदिरांतील उपभोग्य वस्तूंच्या दर्शनानें सुलोचनेस किळस आली. तिनें तेथील पिंजऱ्यांत असलेले शुक, सारिका यांना सोडून दिलें. तिनें लागलीच एक पालखी सजविली व पतीची भुजा त्यांत ठेविली. ती स्वतः चपळ घोडीवर बसून त्या शिबिकेसह लंकेकडे निघाली.

सूर्यास्त होऊन बरीच रात्र झाल्यानंतर सुलोचना लंकेस पोंचली. यावेळीं लंकानाथ रावण सभेमध्यें बसला होता. त्यानें सुलोचना तेथें आलेली पाहतांच तो आश्चर्यभरित झाला. सुलोचनेनें सद्गद होऊन रावणाच्या चरणावर मस्तक ठेविलें. त्यानें तिच्या अकस्मिक येण्याचें कारण विचारलें. तिनें पतीची भुजा व भुजेनें लिहिलेलें पत्र रावणापुढें ठेविलें आणि ती ह्मणाली, “ माझ्या पतीनें स्वर्गलोकीं गमन केलें. त्याच्या संगतीं मीही जावें अशी माझी इच्छा आहे. ”

सुलोचनेकडून इंद्रजितवधाची वार्ता कळतांच रावण सिंहासनावरून खालीं पडला. लंकानाथ आपल्या दाहीं तोंडांत माती घालूं लागला. त्यावेळीं एकच आकांत झाला. आरोळ्यांना तर पारावारच उरला नाहीं. तो कल्लोळ ऐकतांच त्या ठिकाणीं मंदोदरी धावून आली. पुत्राची मरणवार्ता कळतांच तीही बेशुद्ध होऊन पडली. तिच्या दासींनीं तिला सावरून धरून सावध केली. ती विलाप करूं लागली कीं, "बाळा इंद्रजिता! तूं मला न विचारतां लढाईस कसा गेलास? त्रिभुवन शोधलें तरी तुझ्यासारखा पुत्र सापडणार नाहीं. तूं आपल्या शत्रूंना बाणांनीं खिळून सुरवरांनाही बंदींत घातलेंस. मीं पूर्वीं व्रतें, तपें मध्येंच टाकलीं म्हणून मला पुत्रशोक झाला काय? मीं पंक्तिभेद केला, संतांना दुष्ट शब्द बोललें, हरिहरांत भेद मानला, हरिकीर्तनाचा मोड केला, भुकेलेल्या मनुष्याला पानावरून उठविलें, परद्रव्याचा अभिलाष केला, मजकडून गुरुद्रोह घडला, मीं दुसऱ्याची लाभहानि केली, हरिणी व तिचें पाडस यांचा वियोग केला म्हणूनच माझा इंद्रजित मला टाकून गेला काय?" असें बोलत बोलत तिनें सुलोचनेला मिठी मारली. त्या दोघींच्या शोकानें भूमी कंपित झाली. सुलोचना शोक आंवरून म्हणाली, "मला सहगमन करावयाचें आहे. माझ्या पतीचें शिर मला आणून द्या. माझ्या पतीचे डोळे माझ्याकडे लागून राहिले असतील. उठा, मला लौकर पतिशिर आणून द्या."

सुलोचनेचें हें भाषण ऐकतांच रावणाला क्रोध चढला. त्यानें लागलीच सेना सिद्ध करण्याची आज्ञा दिली. निर्वाण संग्राम करून रामलक्ष्मणांना कंठस्नान घालावयाचें आणि इंद्रजिताचें शिर आणावयाचें या गोष्टीस रावण तयार झाला; असें पाहतांच मंदोदरीनें सुलोचनेला सांगितलें, "आपल्या पतीचें शिर आणण्यास तूंच जा. जनककन्या

सीता हिच्यावाचून जो स्त्रियांना माता समजतो अशा त्या चराचरव्यापक रामचंद्राजवळ तूंच शिर माग. तो एकपत्नी, एकबाणी व एकवचनी आहे. सुग्रीव, जांबुवंत, हनुमान यांसारखे वीर त्याचे मसलतगार आहेत. तूं स्वतः शिर आणण्यास गेलीस म्हणजे तुला रामदर्शन घडून तुझ्या जन्माचें सार्थक होईल."

मंदोदरीचा विचार सुलोचनेच्याही मनास आला. ती रावणाजवळ रामसभेंत जाण्याची परवानगी मागूं लागली. आपली सून आपल्या शत्रूंकडे गेली असतां त्यांनीं जर तिला कैद केली तर मग मोठी पंचाइत पडेल असें रावण म्हणाला. आपण ज्या रामाकडे शिर मागण्यास जात आहों त्याचा व रावणाचा वैरभाव असल्यामुळें तो भलत्या शंका घेत आहेसें जाणून सुलोचनेनें सांगितलें, "आपणास संशय येतो तो आपल्या बुद्धीनें कदाचित् बरोबर असेल; पण मी पतिव्रता आहें हें आपण ध्यानांत आणा. जो कोणी चांडाळ परसतीविषयीं पापबुद्धि ठेवितो त्याचा वंश भस्म होतो. पतिव्रतेचा अभिलाष धरून आजपर्यंत कोणीही जय किंवा कल्याण पावला नाहीं."

सुलोचनेचें बोलणें ऐकून शेवटीं रावणानें तिला परवानगी दिली. सुलोचनेनें आपल्याबरोबर विचक्षण शिष्ट व दासदासी घेतल्या. ती स्वतः घोडीवर बसली आणि रामसभेमध्यें जाऊन पोंचली.

यावेळीं रामचंद्र वानरांना भोंवतीं घेऊन आपल्या पीठावर विराजमान झाला होता. सुलोचना घोडीवरून उतरून हंसगतीनें सभेमध्यें गेली. तिला पाहतांच वानरांना ती सीताच आली असें वाटलें. त्यांनीं रामाला तिच्याकडे पाहण्यास सांगितलें. रावणाचा वध झाल्यावांचून सीता मुक्त होणार नाहीं ही गोष्ट राम जाणत असल्यानें त्याला वानरांचें म्हणणें खरें वाटलें नाहीं. त्यानें सुलोचनेला पाहतांच बिभीषणाकडे दृष्टि फेकली. सुलोचनेचें मुखकमल पाहतांच बिभी-

षणाच्या डोळ्यास पाणी आलें. त्यानें पूर्व वृत्तांत ध्यानांत आणून रामाला सांगितलें, " ही इंद्रजिताची धर्मांगना सुलोचना आपल्या पतीचें शिर मागण्यासाठीं आली असावी. "

बिभीषणाचें वाक्य संपतें तोंच सुलोचना रामाच्या सन्निध गेली. तिनें उल्हसित अंतःकरण करून रामचरणावर मस्तक ठेविलें. तिनें आपल्या नेत्राश्रूंनीं रामाच्या पायांस स्नान घातलें. तेव्हां जगदीश्वर रामानें तिला आशिर्वाद देऊन उठण्यास सांगितलें. रामाच्या वचनास मान देऊन ती उठली. तिनें दोन्ही हात जोडले आणि रामाचें स्तवन केलें कीं, " जयजय रामा; विषकंठमित्रा श्री रामचंद्रा, मी तुला नमस्कार करितें. हे संसारछेदका, तापत्रयहारका श्रीरामा, तुझें स्तवन करण्यास शेषाची वाणीही समर्थ नाहीं. ज्या तुझें वर्णन करण्यास शास्त्रेंहि मुकीं होतात तेथें मी अबलेनें एका जिव्हेनें तुझी कीर्ति कोठवर सांगावी ? डबक्यांतल्या पाण्यानें भागीरथीस स्नान घालणेंच अप्रशस्त नव्हे काय? पितळ्याचें फूल वाहून सुवर्णपर्वताची पूजा करणें, कूपांतील ओंझळभर पाण्यानें महासागराला अर्घ्यदान करणें, मलयपर्वतावरील वाऱ्याला पदरानें वारा घालणें आणि मी अबलेनें तुझें यश गाणें या गोष्टी सारख्याच आहेत. पृथ्वीला पारड्यांत घालून तिचें वजन कसें होईल ? आकाशाला खांबाचें टेंकण कसें देतां येईल ? टिटवीला सप्तसमुद्र प्राशन कसे करवतील ? सर्वांना प्रकाश देणाऱ्या चंद्राला दशी वाहून त्याचें पूजन करणें, आणि मी तुझें स्तवन करणें सारखेंच आहे. तुझ्या चरणाचें दर्शन होतांच माझें देहत्रयबंधन तुटलें आहे. मन उन्मत्त होऊन राहिलें आहे. घागर आणि रांजण यांमधील पाण्यांत दोन सूर्य निराळे दिसतात. पण वस्तुतः तो एकच सूर्य असतो. तद्वतच स्त्रीपुरुषादि निरनिराळ्या व्यक्तींच्या अंतःकरणांत तूं एकच परमात्मा वास्तव्य करतोस. कसेंही असलें तरी

या माझ्या स्त्रीदेहाच्या आकृतीस इंद्रजिताची पत्नी अशी संज्ञा आहे. इंद्रजित माझा पति आहे. त्याच्या शिरासमवेत मला अग्नींत घालणें हें तुझ्या हातांत आहे. तूं अयोध्येचा पति असून उदार आहेस. मी तुझ्याजवळ पतिशिर मागणारा याचक आहे. मी चातक आहे; तूं कृपारूपीं जल धारण करणारा मेघ आहेस. तूं सूर्यवंशाचा प्रकाशक आहेस आणि सूर्याचा उदय होईल तर चक्रवाकांची भेट होते. तेव्हां माझ्या पतीशीं माझी भेट करणें हें तुझ्या हातीं आहे. पतीच्या नाशाचें वर्तमान ऐकलें तेव्हांच माझे पंचप्राण गेले आहेत; पतिशिराचें निमित्य करूनच मी तुझ्या दर्शनास आलें आहे. तूं सर्वांचें मनोगत जाणणारा आहेस."

सुलोचनेचें हें भाषण ऐकून रघुवीर तटस्थ झाला. सुलोचनेचें चातुर्य पाहून सर्व कपींनीं माना डोलविल्या. तिच्या पतीचें शिर तिच्या स्वाधीन करून तिला लावून द्यावें असें सुग्रीवानें रामाला सांगितलें. जांबुवंत, अंगद, मारुती यांनींही सुग्रीवाच्या मतास पुष्टी दिली. इतक्यांत रामचंद्रानें तिला विचारलें, "तुझ्या पतीचें शिर वानरवीरांनीं माझ्याकडे आणिलें आहे हें तुला कसें समजलें?"

यावर त्या सतीनें उत्तर केलें, "माझ्या पतीच्या भुजेनें मला तो सर्व मजकूर लिहून दाखविला." असें ह्मणून तिनें तें पतिहस्तलेखन रामापुढें ठेविलें. इंद्रजिताच्या निर्जीव हातानें पत्र लिहिलेली गोष्ट कपींना खरी वाटेना. ते ह्मणाले, "ही जर आपल्या पतीचें शिरास हसावयास लावील तर हिचें भाषण आह्मीं सत्य मानूं."

या अटीस अनुसरून सुग्रीवानें ऋषभाकडून इंद्रजिताचें शिर तेथें आणविलें. सुलोचनेनें त्या शिरासच आलिंगन दिलें. तिनें आपलें वस्त्र भूमीवर पसरून त्यावर तें शिर ठेविलें. नंतर सती सुलोचनेनें हात जोडून त्या शिराची प्रार्थना केली कीं, "स्वर्गांतील सुरगण व हा अयो-

ध्याधीश रामचंद्र माझें पतिव्रतेचें कौतुक पहात आहेत; तरी आपण हास्य करून मला रामाकडून धन्यवाद देववावा. आपण माझे सर्व अपराध क्षमा करा. तुमच्या शत्रूनीं तुमच्या होमाचा विध्वंस केला म्हणून रागावून तुम्ही मौन धरलें असेल तर यावेळीं तें टाकावें. आपल्याला रामदर्शनामुळें सायुज्य पद मिळालें असें वाटून बोलणें खुंटलें असलें तरी या वेळेपुरतें तरी हास्य करावें."

सुलोचनेनें अशा प्रकारें बहुत प्रार्थना केली तरी तें शिर हास्य करीना. आपलें सत्व आतां नाश पावतें असें जाणून सुलोचना फार दुःखित झाली. शेवटीं रामचंद्राला आपला प्रभाव दाखविण्याकरितां ती पुन्हां म्हणाली, "मी आपला पिता लक्ष्मण याला तुमच्या मदतीस बोलाविलें असतें तर त्यानें तुमचे सर्व शत्रु ठार केले असते. तसें करण्यास मी हयगय केली आणि माझ्या हयगयीनें प्रत्यक्ष सौमित्रानेंच तुमचा नाश केला याबद्दल राग सोडा. मी जर आजपर्यंत आपणावांचून सर्व पुरुष लक्ष्मणासमान मानले असतील, मी जर आपल्यालाच दैवत समजत असेन, मी जर खरी पतिव्रता असेन तर आपण हास्य करून मला यशस्वी करा."

इतकें बोलतांच तें शिर हंसूं लागलें. तें पाहतांच कपींना कौतुक वाटलें. तिच्या भाषणांतील भावार्थाबद्दल संशयित होऊन त्यांनीं त्यासंबंधानें रामाला प्रश्न केला. तेव्हां रामानीं त्यांना सांगितलें, "ही सती सुलोचना शेषकन्या आहे. लक्ष्मण हा शेषाचाच अवतार आहे. लक्ष्मणानें इंद्रजिताला मारिलें म्हणजे सासऱ्यानें जांवयाचा नाश केला असेंच झालें."

रामाचें भाषणावरून कपींचा संशय फिटला. ते सर्व कपी तिच्या पातिव्रत्याची वाखाणणी करून तिला धन्यवाद देऊं लागले. आपल्या हस्तेंच आपला जामात नाश पावला याबद्दल लक्ष्मणाच्या मनांत उद्वेग

उत्पन्न झाला. त्याचें हृदय मायामोहानें भरून गेलें. तो डोळ्यांत आंसवें आणून सुलोचनेकडे पाहूं लागला. कांहीं वेळानें तो रामास ह्मणाला, " हा मजकडून मोठाच प्रमाद घडला. मी समरांगणावर उभा राहून आपल्या हातांनींच इंद्रजिताचा घात करून कन्या सुलोचना इला संकटांत लोटलें. "

लक्ष्मणाचा शोक दूर करण्याकरितां रामचंद्र ह्मणाले, " बा लक्ष्मणा! क्षत्रियानें असा शोक करणें योग्य नव्हे. पिता, बंधु, पुत्र, जांवई कोणीही समरभूमीवर प्राप्त झाला असतां त्याचा वध करण्यांत क्षत्रियाला दोष लागत नाहीं असा क्षत्रियधर्म आहे. "

रामाच्या भाषणावर लक्ष्मण ह्मणाला, " आपण ह्मणतां तें सर्व खरें आहे. आपण ज्ञानसंपन्न आहां. पण दुर्गम मायेनें व्याप्त होऊन आपणही सीतेच्या वियोगानें तळमळत आहां. जानकीचा विरह असह्य होऊन आपण वनांतील वृक्षपाषाणांनाही मिठ्या मारल्या. "

लक्ष्मणाचें भेदक भाषण ऐकतांच प्रभु रामचंद्र ओशाळले आणि लक्ष्मणास ह्मणाले, " तुझें म्हणणें यथार्थ आहे. या सुलोचनेचें दुःख हरण करण्याकरितां मी इंद्रजिताला सजीव करतों. इंद्राकडून अमृत आणवून मी तुझा जांवई इंद्रजीत याला आतांच उठवितों. "

रामाचें हें बोलणें ऐकतांच सुग्रीव, अंगद, जांबुवंत वगैरे वानर भीति ग्रस्त झाले. तेव्हां वायुसुत हनुमान स्पष्टपणानें बोलला, " रामचंद्रा; तुमचें औदार्य आह्माला ठाऊक आहे. यावेळीं तुमचा उदारपणा बाजूस ठेवा. बोकड म्हणून लांडगा घरांत आणूं नका. सर्पाशीं कधींही मित्रत्व करूं नये. दूध घालून विषतरू वाढविण्यांत अर्थ कोणता ? या इंद्रजिताच्या सामर्थ्यानेंच रावणानें सर्व देवगण बंदींत घातले हें आपण जाणतांना ? "

सर्व वानर इंद्रजिताच्या विरुद्ध आहेत असें जाणून लक्ष्मणानें

रामाला सांगितलें, "सर्वांच्या हितास अनुकूल असेल तेंच आपण करा." हें ऐकून जांबुवंत व सुग्रीव यांनीं जलदी करून तें शिर सुलोचनेच्या स्वाधीन केलें. कोणीकडून तरी ती सती तेथून त्वरित जाईल असें करणेंच त्या कपींना इष्ट वाटलें. त्यांनीं तिला तेथून लौकर परत जाण्याची आग्रहानें विनंति केली. त्यांचा मानस जाणून सती सुलोचना पतीचें शिर घेऊन जावयास निघाली. तिनें नम्रतेनें रामाला पुन्हां नमस्कार केला व अशी विनंति केली कीं, "हे आदिपुरुषा, वैकुंठाधीश श्रीरामचंद्रा; मत्स्यरूपानें तूंच वेदांचा उद्धार केलास; कासवाच्या रूपानें तूंच आपल्या पाठीवर मंदरपर्वत धारण केलास. वराहतनू घेऊन आपल्या दंताग्रानें तूंच पृथ्वी उचललीस. खांबांतून प्रगट होणारा नरहरी तूंच आहेस. वामनरूपानें तीन पावलांत त्रिभुवन व्यापणारा तूंच आहेस. परशुरामरूपानें तूंच ही पृथ्वी एकवीस वेळां निःक्षत्रिय केलीस. अशा लीला करणारा तोंच तूं परमात्मा सांप्रत कौसल्यासुत रघुनाथ झाला आहेस. माझे आई, बाप, बंधु, गणगोत सर्व कांहीं तूंच आहेस. माझी आतां इतकीच विनंति आहे कीं, मी अग्निप्रवेश करीपर्यंत माझ्या कार्यांत कोणीही विक्षेप करूं नये ह्मणून आपण हे सर्व कपि आवरून धरावे, त्यांना लंकेकडे पाठवूं नये."

रामचंद्रानें त्या साध्वीचें भाषण मान्य केलें. तिनें त्याला पुनः पुनः नमस्कार केले. त्यानें तिला शुभ आशिर्वाद दिले. नंतर ती तें पतिशिर घेऊन लंकेकडे गेली. तिनें समुद्राच्या किनाऱ्यावर अग्निकुंड तयार करण्यास सांगितल्यावर रावणानें कुंडाची तयारी करून दिली. रावण मंदोदरीसह तेथें आला. सतीचें कौतुक पाहण्यासाठीं आकाशांत देवांची गर्दी जमली. सुलोचनेनें स्नान करून सौभाग्यकारक वाण दिलें. तिच्या पतीचा देह कुंडांत टाकून महा अग्नि प्रज्वलीत करण्यांत आला. कुंडाला प्रदक्षिणा करून ती साध्वी धर्मशिळेवर उभी राहून

आकाशाकडे पाहूं लागली. आकाशांत दुंदुभींचा ध्वनी होत होता. विमानांत सुरगणांची दाटी झाली होती. सुरांगना हातामध्यें अक्षय्य वाणें घेऊन उभ्या होत्या. इतक्यांत आकाशामध्यें एका विमानांत दिव्य देहधारी इंद्रजित बसला आहे असें सुलोचनेनें पाहिलें. पतीचें दर्शन होतांच ती कासावीस झाली. तिनें तेथल्यातेथेंच शरीराचा त्याग केला. तिच्या देहांतून आत्मज्योती निघाली. ती स्वतः दिव्य देह धारण करून आपल्या पतिसन्निध जाऊन बसली. नंतर लोकांनीं तिचें मृतशरीर उचलून अग्नींत टाकिलें. स्नुषेच्या अग्निप्रवेशामुळें रावण व मंदोदरी यांना बहुत खेद झाला. भार्येसह स्नान करून रावण दुःख करीत राजभुवनास निघून गेला. एकंदर मडळी सुलोचनेचें यश वर्णन करू लागली.

---

# ११ संत सखू.





कृष्णानदीच्या काठीं करवीरपूर या नांवाचें एक नगर होतें. त्या ठिकाणीं एक ब्राह्मण राहत असे. त्याचें कुटुंब फारसें मोठें नव्हतें. त्याची बायको, एक मुलगा व सून एवढाच कायतो त्याचा परिवार होता. त्याच्या सुनेचें नांव सखू असें होतें. सखू परमेश्वराची भक्ति करीत असे. तिचा स्वभाव क्षमाशील व शांत होता. ती सुख दुःख सारखें मानी. संतजनांच्या तोंडून तिनें ईश्वराच्या स्वरूपाचें वर्णन ऐकिलें होतें. त्या वर्णनास अनुसरून ती ईश्वरध्यान करीत असे.

सखूची सासू तिला फार जाच करी तरी सखू ही ईश्वरभक्त असल्यानें ती आपल्याला होणाऱ्या सासुरवासाचें गाऱ्हाणें कोणाला सांगत नसे. तिची सासू मोठी कर्कशा होती. ती नेहमीं सखूला घालून पाडून बोलत असे. सासूच्या शब्दबाणांनीं सखूचें हृदय भेदून जाई तरी ती परत उत्तर ह्मणून देत नसे. सखूला घरामध्यें शिळ्या तुकड्यावांचून कांहींएक खावयास मिळत नसे. आपलें नशीबच तसलें असें मानून ती ते वाळके तुकडे खाऊनच देहसंरक्षण करी. सखू घर सारवूं लागली ह्मणजे तिची सासू तिच्या हातांतील पोतेरें हिसकावून घेऊन तिचा गाल धरी आणि कसें सारवावें तें तिला शिकवी. सखू पाणी भरूं लागली ह्मणजे तिची सासू रांजणाला भोंक पाडून ठेवी. रांजण भरेल या आशेनें सखू सारख्या घागरी वाही; तेव्हांही ती एकसारखी पाणी तर पाणीच भरते ह्मणून तिची सासू तिला शिवीगाळ करी. सणावाराच्या दिवशीं देखील सखूला उष्ट्या अन्नावांचून कांहींएक मिळत नसे. सखूच्या सासुरवासाचा हा प्रकार शेजाऱ्यापाजाऱ्यांना ठाऊक होता. बाहेरची कोणी मंडळी सखूला होणाऱ्या जाचाबद्दल कांहीं बाटाघाट करूं लागली किंवा तिच्या सासूला कांहीं उपदेश सांगूं लागली म्हणजे सखूची सासू व सासरा हे शेजारीं पाजाऱ्याशींच तंटा करीत.

राजाची कृपा असली म्हणजे मग मुत्सद्दीमंडळाच्या अवकृपेस कोण विचारतो ? क्षुद्र दैवतांचा क्षोभ झाला आणि हरीची कृपा असली तर मग त्या दैवतांच्या क्षोभाचें कोणीही भय धरणार नाहीं. ज्याला अमृताचा लाभ झाला असेल तो कुपथ्यानें वागण्यास मुळींच डगमगणार नाहीं. सासुसासऱ्यांनीं सुनेचा छळ चालविला असतां तिचा पति जर तिच्यावर प्रेम करून आपलें पतीचें कर्तव्य जाणणारा असेल तर त्या बिचारीला त्या जाचाचें विशेष दुःख वाटणार नाहीं.

पण सखूची स्थिति त्या बाजूनेंही चमत्कारिकच होती. तिच्या सासुसासऱ्याप्रमाणें तिचा पतीही तिची नेहमीं उपेक्षाच करीत असे. तरी पण आपलें जन्मांतरीचें कर्म वाईट असल्यामुळेंच आपणास अशा दुष्ट माणसांचा सहवास प्राप्त झाला आहे असें समजून ती आपलें समाधान करून घेई. तिचा जाच पाहून ज्यांना तिची कींव येई ते तिला विचारीत कीं, "तुझ्या माहेरीं कोण कोण आहे ? तुझीं माहेरचीं माणसेंही तुझी कांहींच वास्तपुस्त कशी करीत नाहींत !" यावर सखू त्यांना सांगे कीं, "पंढरपुर हें माझें माहेर होय. रखमाई व विठोबा हे माझे आईबाप होत. माझ्या आईबापास मुलें फार असल्यामुळें त्यांना माझा समाचार घेण्यास सवड होत नाहीं."

अशा प्रकारचा जाच सोशीत सखू आपल्या सासरीं असतांना एक दिवस त्या गांवीं कांहीं यात्रेकरू आले. पताका हातांत घेऊन ते वैष्णव भक्तिरसांत तल्लीन झाले होते. टाळ व मृदंग वाजवून ते हरिभजक हरिनाम गात होते. नामगर्जनेनें नादब्रह्म मुसावल्यामुळें आकाश कोंदलें होतें. कोणी कोणी पावा वाजवीत होते. कोणी पायांत घुंगुर बांधून नाचत होते. याप्रमाणें कीर्तन करीत ते हरिभक्त पंढरीस चालले होते. या समयीं घागर भरण्याकरतां सखू नदीवर आली होती तेव्हां तिनें ती यात्रा पाहिली. संतमुखांतून हरिचरित्र ऐकतांच तिचें चित्त आल्हादयुक्त झालें. तिच्याही मनांत यात्रेस जावें असें आलें. तिनें तो बेत नदीवर असलेल्या दुसऱ्या बायकांना कळविला. आपण असेच पंढरीस गेलों तर सासुसासरा आपणास मारतील असें जाणून तिनें पंढरीहून मुळीं परतच यावयाचें नाहीं असें आपल्या मनाशीं ठरविलें. इतका विचार ठरवून सखू त्या संतमंडळींत सामील झाली.

सखू परस्पर यात्रेला निघाली हें पाहतांच नदीवरील कांहीं बायका

लागलीच सखूच्या सासरीं गेल्या. त्यांनीं सखूच्या सासूला सांगितलें, " तुम्ही स्वस्थ काय बसला आहां. तुमची सून वारकऱ्यांचा हात धरून पंढरीस निघाली आहे. ती नदीवर जमलेल्या संतांच्या मेळ्यांत मिसळलेली आह्मीं प्रत्यक्ष पाहिली आणि मग आम्ही तुमच्याकडे आलों. बरीच कीं आहे तुमची सून ! आजपर्यंत आह्मी ह्मणत होतों कीं, तुह्मीच सुनेचें उगींच हाल करतां; पण तुह्मी निरपराधी असून सखूच खट्याळ आहे हें आज आम्हाला कळून आलें. "

शेजारणींनीं आणलेली बातमी ऐकतांच सखूची सासू खवळली. तिनें तो सर्व वृत्तांत आपल्या लेकाला सांगितला. सखूची बहुत निंदा करून तिनें त्याला फार चीड आणली. आईच्या चिथावणीनें सखूचा नवरा सखूला धरून आणण्याकरितां नदीतीराकडे धावला व त्यानें सर्व यात्रा शोधली. त्यांत सखू दृष्टीस पडतांच त्याचे डोळे चढून गेले. त्यानें तिला ताडण करून तिची वेणी धरली; आणि तिला फराफर ओढीत तो आपल्या घरीं आला.

सखूची सासु, सासरा आणि पति या त्रिवर्गांनीं संगनमत करून सखूला खांबाशीं बांधलें. यात्रा परत येईपर्यंत तिला तशीच बांधून उपाशी ठेवावयाची असा त्यांनीं संकल्प ठरविला. आपल्या विहित पत्नीचा कांहींच अपराध नसतांना तिला अशा निर्दयपणानें गांजण्याची तिच्या नवऱ्याला मुळींच शरम वाटली नाहीं. त्यानें निदान कांहीं भूतदया तरी धरावी कीं नाहीं ! तें तर बाजूलाच राहिलें; पण त्यानें तिला इतकी आवळून बांधली कीं, तिला ज्या दोऱ्यांनीं आवळली त्या दोऱ्या सखूच्या मांसांत रुतून बसल्या.

सासु, सासरा व पति यांनीं विनाकारण इतका त्रास दिला तरी ती साध्वी त्यांना अपमानकारक असा एक शब्दही बोलली नाहीं. ती प्रेमळ व भाविक असल्यानें पतीनें दिलेलें दुःख सुखच मानीत

होती. पतीनें केलेल्या छळाचा शोक करणें उचित नव्हे असें समजून ती परमेश्वराला हाका मारूं लागली. ती मनामध्यें ह्मणूं लागली, " माझ्या पतीनें मला बांधून ठेविल्यामुळें देवा; मला तुझे पाय अंतरले. तुझें दर्शन होऊन मग मी मेलें असते तर त्यांत मला समाधानच होतें. हे पंढरीनाथा; यावेळीं बंधु, भगिनी, आई, बाप, इष्टमित्र, सर्व कांहीं तूंच आहेस. मला तुझें दर्शन न घडतां जर माझा अंत झाला तर मी भूत होऊन तुला लागेन. "

इकडे पंढरपुर क्षेत्रांत यावेळीं असंख्य यात्रा जमली होती. साधुसंत पांडुरंगापुढें कीर्तन करीत होते. सुरवर आपल्या विमानांत बसून हरिभक्तांचें कीर्तन श्रवण करीत होते. श्रीशंकर तांडवनृत्य करण्यांत गढले होते. अशा समयीं सखूचा धावा पांडुरंगाच्या कानावर पडून ते खिन्न झाले. रुक्मिणीनें पांडुरंगाला त्यांच्या उद्विग्नतेचें कारण विचारलें. पांडुरंगांनीं रखमाबाईला सखूचा मजकूर सांगून ते स्वतः सखूच्या रक्षणाकरितां करवीरपुरास चालते झाले.

पांडुरंगांनीं स्त्रीवेष धारण केला. तो नुसता बायकोचा वेष नसून त्यांनीं हुबेहूब सखूची भूमिका स्वीकारली. मध्यरात्रीच्या सुमारास पांडुरंग त्या वेषानें सखू होती तेथें प्रकट झालें. त्यांनीं तिला " सखू सखू " ह्मणून हांका मारल्या. आपल्याला सोडविण्याकरितां कोणी शेजारीण आली आहे असें समजून सखूनें तिला ' कोण ' ह्मणून विचारिलें. पांडुरंगांनीं सांगितलें, " मी पंढरीला जाणारी यात्रेकरीण आहें व मी तुला यात्रेस नेण्याकरतां आलें आहे. "

तिचा बेत ऐकून सखू ह्मणाली, " तूं चांगलेपणानें मला हाक मारण्यास आलीस; पण माझें नशीब फुटकें पडलें ना. मला कशी बांधली आहे हें तूं पाहतच आहेस. यांतून माझी सुटका कशी होणार ? "

यावर त्या यात्रेकरणीनें सांगितलें, " मी तुझी जन्माची मैत्रीण

आहें. मी तुझ्या ऐवजीं बांधून घेतें. तूं खुशाल पंढरीला जा. मी तुझ्यासारखीच असल्यानें तुझ्या घरांतील माणसें मला कोणी परकी समजणार नाहींत." असें बोलून पांडुरंगांनीं सखूला मुक्त करून तिला पंढरपुरास पोंचती केली. भक्तिभावानें भुललेल्या पांडुरंगानें पुन्हां तेथें परत येऊन स्वहस्तेंच आपणाला बांधून घेतलें. परमात्मा भावाचा भुकेला असल्यानें तो आपला थोरपणा विसरून भक्ताकरितां कसे कष्ट सोसतो पहा. भक्तजन संकटांत पडतांच निर्गुणनिराकार असा परमात्मा लागलीच सगुण बनतो, आणि काळवेळ न जाणतां भक्ताची आपत्ति हरण करण्यांतच धन्यता मानतो.

सखूची सासुसासरा तिला नित्य शिक्षा देत त्या सर्व पांडुरंग आनंदानें सहन करीत. पंधरा दिवस त्या स्थितींत गेल्यानंतर सखूच्या नवऱ्यानें असा विचार केला कीं, अशाप्रकारें आपण बायकोला उपाशी ठेवली तर ती मरेल आणि मग आपल्याला बायको नाहींशी होऊन आपला संसार वृथा होईल. असें जाणून त्यानें सखूला मुक्त केलें. त्यानें तिला गोड शब्दांनीं हाक मारून तिच्याबद्दल कळकळ दर्शविली. आपण केलेल्या छळाबद्दल त्यानें तिची क्षमा मागितली. अनेकप्रकारें त्यानें तिचें सांत्वन केलें. आणि तिला घरांतील संसारकार्य करण्यास सांगितलें.

आपण बंधनापासून सुटलों असें पाहून पांडुरंगासही हर्ष झाला. आतां आपण एकदम अदृश्य व्हावें असें त्यास वाटलें. पण आपल्या नाहींसें होण्यानें सखूचा पुढें अधिक छळ होईल असें जाणून पांडुरंगांनीं तो बेत रहित केला आणि सखू परत येईपर्यंत तिची भूमिका बरोबर आचरून दाखवावयाची असा त्यांनीं बेत ठरवून टाकिला. पांडुरंग सखूच्या रूपानें घरांतील कामधंदा करूं लागले. त्यांच्या हातचा स्वयंपाक खातांच त्या तिघांना अपूर्व रुचि प्राप्त झाली.

पांडुरंगांनीं सखूचें रूप धारण करून तिच्या पतीशीं पत्नी या नात्यानें योग्य आचार ठेवून त्याचे मनोरथ पूर्ण केले. जो अंतरसाक्षी असून विश्वव्यापक आहे, श्रुतीलाही ज्याचा अंत लागत नाहीं, जो घट, मठ, स्त्री, पुरुष, अलंकार इत्यादिकांच्या ठिकाणीं अभिन्नरूपानें वास्तव्य करतो असा श्रीहरि कसा निर्लज्ज बनतो पहा. पांडुरंग चार घटका रात्रीं उठून दळणकांडण करीत; सकाळ होतांच सडासंमार्जन व झाडलोट करीत व घागर घेऊन पांणी भरीत. सारांश, त्यांनीं आपल्या यथास्थित वागणुकीनें सखूच्या सासुसासऱ्यास व पतीस रतिमात्रही शंका येण्याचें कारण ठेविलें नाहीं.

परमात्मा इकडे असा घरधंद्यांत गुंतून राहिला. तिकडे सखु पंढरीस पोंचली. पांडुरंगापुढें चाललेला कीर्तनघोष ऐकून तिच्या चित्तास समाधान वाटलें. तिनें चंद्रभागेंत स्नान केलें आणि देवाचें दर्शन घेण्याकरितां ती सभामंडपांत गेली. तिनें विठ्ठलापुढें लोटांगण घातलें. कानांनीं ऐकलेलें रूप सखूनें प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें. सुंदर श्रीमुख पाहून सखूचे त्रिविधताप जळून गेले. ती देवाचे चरण घट्ट धरून ह्मणाली, " हे अंतरसाक्षी, चैतन्यघना, देवाधिदेवा ! मी आतां येथून हलणार नाहीं. माझ्या कुडींत प्राण आहे तोंपर्यंत मी या पंढरीक्षेत्राचा त्याग करून कोठेंही जाणार नाहीं. " इतकें बोलून ती तेथून उठली. तिनें तो दिवस नुसत्या दर्शनसौख्यांतच घालविला. दुसऱ्या दिवशीं तिनें स्नान करून पांडुरंगाचें ध्यान आठविलें आणि तत्काळ प्राण सोडला.

त्या सुमारास करवीरपुराचा एक ब्राह्मण पंढरपुरास यात्रेकरितां आला होता. त्यानें सखूचा अचेतन पडलेला देह पाहिला. त्यानें सखूस ओळखून बाकीच्या यात्रेकऱ्यांना तिची सर्व कांहीं माहिती सांगितली. तेव्हां त्यांच्यांत विचार ठरून त्यांनीं सखूच्या प्रेतास

अग्नि दिला. हा सर्व प्रकार जाणून रुक्मिणीमाता चिंतातुर झाली. जिच्याकरितां पांडुरंग संसारकृत्यांत दंग होऊन राहिले आहेत ती सखू मरण पावली त्याअर्थीं आतां पांडुरंगाना लवकर परत येणें मुष्किलीचें आहे असें जाणून जगन्माता कष्टी झाली तिला पांडुरंगाच्या भेटीची उत्कंठा झाली. तिनें पांडुरंगाची सुटका करून त्यांना पंढरीस आणण्याचें मनांत योजिलें. ज्याठिकाणीं सखूचा देह जळाला त्या ठिकाणीं तिच्या अस्थी पडल्या होत्या. त्या अस्थीवर जगन्मातेची दृष्टि जातांच, जिच्या इच्छामात्रेकरून ब्रह्मांडरचना होते, जिच्या सामर्थ्यानें निर्गुण आकारास येतें तिच्या अमृतदृष्टीनें सखू तेथेंच जिवंत झाली. रुक्मिणीनें दृष्टांतांत जाऊन सखूला असें सांगितलें, " कुडींत प्राण आहे तोंपर्यंत पंढरपुरांतून न जाण्याबद्दल तूं प्रतिज्ञा केली होतीस ती तुझी कुडी जळून गेली. ही तुझी तनू वेगळी आहे. आतां तूं आपल्या घरीं जा. कोणताही संशय धरूं नको. "

जगन्मातेचा असा दृष्टांत होतांच सखू यात्रेकऱ्यांच्या सोबतीनें करवीरपुरास पोहोंचली. सखू पानवठ्यावर आली त्याचवेळीं पांडुरंग तिच्याच रूपानें घागर भरण्याकरितां तेथें आले होते. त्यांनीं तिला दर्शन दिलें. सखूनें त्यांचे पाय धरले. दरवर्षीं आषाढास पंढरीची यात्रा घडण्याबद्दल सखूनें देवाजवळून वरदान मागून घेतलें. सखूला कृतार्थ करून पांडुरंग अदृश्य झाले.

खरी सखू यात्रेला गेली होती ही गोष्ट कोणासच माहीत नव्हती. पानवठ्यावर येतांच पंढरीनाथांनीं आणलेली घागर सखूनें आपल्या हातांत घेतली. व पांडुरंग अदृश्य होतांच सखू ती घागर भरून घेऊन आपल्या घरीं गेली.

ज्या ब्राह्मणानें सखू मेलेली पाहून तिचें दहन केलें तो करवीरपुरास येतांच तें वृत्त सांगण्याकरितां सखूच्या घरीं गेला. त्या ठिकाणीं

सखू कामधंदा करीत असतांना पाहून तो आश्चर्यचकित् झाला. त्यानें पंढरपुरांतील सर्व वृत्तांत घरांतील माणसांना निवेदन केला. त्यांनीं सखूकडे कौतुकानें पाहिलें. आपली खरी सून पंढरीस जाऊन मृत झाली असून ती पुन्हां जिवंत होऊन येथें कशी आली ? आधीं ती बंधांतून सुटून पंढरीस गेली कशी ? तिच्या पश्चात् आपल्या घरांत सखूच्या रूपानें आपली सेवाचाकरी कोणीं केली ? असे अनेक विचार उत्पन्न होऊन घरांतील मंडळी घोटाळ्यांत पडली. तिचा पति तर अगदीं स्तब्ध झाला. त्यांनीं त्यासंबंधानें सखूलाच प्रश्न विचारला. सखूनें सर्व वृत्तांत त्यांना सांगितला. आपल्या घरीं सखूचें रूप घेऊन काबाडकष्ट करणारा पांडुरंगच होय अशी त्यांची खात्री होऊन ते अनुताप पावले. आपली सून महान् भगवद्भक्त आहे अशी त्यांची खात्री झाली. भक्तमहिमा न जाणतां आपण सखूचा व्यर्थ छळ केला याबद्दल ते आपणांस दूषण लावून घेऊं लागले. ते तिघे निर्दय, दुष्ट, पापी, अनाचारी होते. पण सखूच्या कृपेनें ते भगवद्भक्त बनून सर्वकाळ भजन करीत राहिले. ते सर्वजण मोठ्या प्रेमानें आषाढी कार्तिकीस पंढरपुरची यात्रा करूं लागले. आपली सून साध्वी असून तिनें आपल्या सामर्थ्यानें परमेश्वरास आपल्या घरांत मजूरदाराप्रमाणें राबावयास लाविलें याबद्दल ते तिच्याकडे आदर बुद्धीनें पाहून आनंदांत राहिले. याप्रकारें सखूनें आपल्या पतीलाही भगवद्भक्त बनवून त्याचा उद्धार केला. अशा त्या महान् साध्वी, श्रेष्ठ भगवद्भक्त, सदाचारी, कर्तव्य दक्ष सखूच्या नामस्मरणानें हा भवसिंधू तरून जाण्यास किती सहाय्य होईल हें सांगणें नकोच.

---

# १२ देवहूती.







र्दम या नांवाचा एक ऋषि होता. बिंदुसरोवराच्या काठीं त्याचा आश्रम होता. हें पुण्यकारक सरोवर सरस्वती नदीनें वेष्टिलेलें आहे. त्यांतील पाणी स्वच्छ, निरोगी, मधुर व पुष्टिदायक असल्यानें कित्येक मुनींनीं त्याच सरोवराचा आश्रय केला होता. कर्दम मुनीचा आश्रम अनेक वृक्षवेलींनीं वेष्टिलेला होता. अनेक प्रकारचे हरिण, भारद्वाजासारखे पवित्र पक्षी त्या आश्रमाच्या आसमंतात् सुखानें संचार करीत असत. पक्षिगणांचें सुस्वर गाणें, भृंग्यांचा गुंजारव, मोरांचें नृत्य यांमुळें तें आश्रमाभोंवतालचें वन सजीव आहे असें वाटे. या ठिकाणीं कर्दम ऋषीनें प्रखर तप करून परमेश्वरास प्रसन्न करून घेतलें होतें. एके दिवशीं कर्दमऋषि अग्नीला आहुती अर्पण करून स्वस्थ बसले होते. अशा समयीं स्वायंभुव मनु त्यांच्या आश्रमांत आले. त्यांच्याबरोबर त्यांची एक कन्या होती. हिचेंच नांव देवहूती असें होतें. देवहूती स्वरूपानें लावण्यसंपन्न होती. तिचें सौंदर्य इतकें मनोहर होतें कीं, एकदां ही देवहूती आपल्या वाड्याच्या गच्चीवर खेळत असतांना आकाशांतून संचार करीत असलेला विश्वावसु गंधर्व तिच्या रूपगुणांस मोहित होऊन आपल्या विमानांतून खालीं पडला.

स्वायंभुव मनूनें कर्दमाचें दर्शन घेतलें. कर्दमऋषि आपल्या तपश्चर्येमुळें फारच तेजसंपन्न दिसे. त्याच्या मस्तकावरील जटाभारानें त्याचें देहसौंदर्य अतिशय खुलविलें होतें. त्याच्या सर्वांगावर भस्मलेपन केलें असल्यानें तो भस्माच्छादित हिऱ्याप्रमाणें शोभत होता.

स्वायंभुवानें त्यास नमस्कार केला. कर्दमानें त्याच्या प्रणतींचा स्वीकार करून त्यास आशिर्वाद देऊन त्याचा योग्य सन्मान केला.

कर्दमऋषीनें स्वायंभुवाचा पराक्रम, औदार्य, याचें वर्णन करून त्यास राजधर्माचा उपदेश केला आणि तो त्यास ह्मणाला, " राजा, तूं यासमयीं माझ्या आश्रमीं येण्याचें कारण काय बरें ? तूं आल्यामुळें माझा आश्रम धन्य झाला असें मी मानतों. आमच्याकडून जर कांहीं तुझी सेवा होण्यासारखी असेल तर आम्हांस सांग. तुझी सेवा करण्यांत आह्माला आनंद आहे. "

कर्दमाचें भाषण ऐकून घेऊन स्वायंभुव ह्मणाला, " हे भगवन् ! आपण मला फारच थोरवी देत आहां. आपल्या दर्शनानें माझा देह पवित्र झाला असें मी समजतों. आपण सर्वज्ञ आहां. मीं कांहींच तप केलें नाहीं. माझा तसा अधिकार नसतांना आपण माझा थोर आदर ठेवला याबद्दल मला माझें भाग्य उगवलें असेंच वाटत आहे. आपणाकडे मी कांहीं याचना करावयास आलों आहे. ही माझी कन्या देवहूति अद्याप अविवाहित असून ती माझी फार आवडती आहे. हिला उत्तम पति मिळावा ह्मणून मीं सारखी खटपट करीत आहे. हिला बरोबर घेऊन मी स्थलोस्थलीं हिंडत असतां आपलें गुणवर्णन आमच्या कानीं पडले. आपले गुण कळल्यापासून ही कन्या आपल्यास वरण्यासच उत्सुक झाली. इतकेंच काय पण तिनें आपल्या मनानें आपणासच माळ घातली आहे. त्या वेळेपासून तिनें आपणांवांचून सर्व पुरुष माझ्यासारखे मानले आहेत. हे मुनिश्रेष्ठ, ही माझी हकीगत ध्यानांत घेऊन आपण या देवहूतीचा अंगिकार करावा अशी माझी आपणाजवळ प्रार्थना आहे. ऋषिवर्य ! गृहस्थाश्रमांतील कर्में करण्यास ही आपल्या उपयोगीं पडेल. आपण सूज्ञ व विवाहेच्छु आहांत असें मी जाणत आहे. आपण कसेंही करून या कन्येचें

पाणिग्रहण करून तिला धन्य करा व माझी काळजी दूर करा."

कर्दमानें स्वायंभुवाचें बोलणें मान्य केलें. पण त्यानें त्या संबंधानें अशी अट सांगितली कीं, "देवहूती गरोदर होतांच मी गृहस्थाश्रमाचा त्याग करून ज्ञानसंपादनाकरितां वनांत जाईन, ऋणत्रयापासून मुक्त झाल्यावर संन्यासाश्रम करण्यास कांहींच हरकत नाहीं."

ऋषीचें हें बोलणें स्वायंभुवानें पसंत केलें. त्यानें आपली बहुगुणसंपन्न कन्या देवहूती कर्दमाला अर्पण केली. त्यानें जांवयाला अलंकार, वस्त्रें व इतर संसाराचें साहित्य आंदण दिलें. आपल्या कन्येला उत्तम पति मिळाला ह्मणून स्वायंभुवाला अत्यानंद झाला; ती त्याची फार लाडकी असल्यानें तिला सोडून जातांना त्याला भडभडून आलें. त्यानें मोठ्या दुःखानें कन्या व जामात यांचा निरोप घेऊन आपल्या नगरास निघून गेला.

देवहूती आपल्या पतीची चाकरी करीत त्या आश्रमांत राहिली. ती नेहमीं पतिसुश्रुषेविषयीं दक्ष असे. पतीची आज्ञा ह्मणजे ती आपला प्राण असें समजे. तिनें आपलें चातुर्य, शहाणपण, पतिसेवा या योगानें पतीचें मन नेहमीं प्रसन्न राखलें होतें. कडकडीत पातिव्रत्य, सत्य, औदार्य, गांभीर्य इत्यादि सद्गुणांची ती खाणच होती. स्वेच्छाचार, कपट, आवज्ञा, वैर, लोभ, पापवासना इत्यादि दुर्गुणांपासून ती सर्वशः अलिप्त होती. तिचे सद्गुण पाहून कर्दमालाही समाधान वाटे.

इंद्रियजय करून कित्येक दिवसपर्यंत तिनें पतिसेवेचें व्रत चालविल्यामुळें दिवसेंदिवस ती कृश होत चालली. कर्दमाला तिची दया आली. आपल्या साध्वी स्त्रीची वासना आपण अद्याप पूर्ण करीत नाहीं याबद्दल त्यालाही वाईट वाटूं लागलें. दैव हें सर्वांत बलवत्तर होय. पण आपली पत्नी देवहूती आपणास अधिक बलवान

समजते असें जाणून व तिची एकनिष्ठ सेवा लक्षांत घेऊन कर्दम ऋषि प्रसन्न झाला. त्यानें तिला दिव्यदृष्टि देऊन अनेक कौतुकें दाखविलीं. योगसामर्थ्यानें एक विमान उत्पन्न करून त्यानें तिला त्यांतून हिंडविली. तें विमान सर्व उपभोग वस्तूंनीं भरलेलें होतें. नंतर त्यानें तिला बिंदुसरोवरांतील अनेक दिव्य लीला दाखविल्या. पृथ्वीवरील सर्व दर्शनीय देखावे आपल्या प्रिय पत्नीस दाखवून व नानातऱ्हेचे विलास तिला अनुकूल करून देऊन तो तिच्यासह त्या विमानांतून आपल्या आश्रमांत आला.

देवहूतीला आपण इतका विलास प्राप्त करून दिला तरी अद्याप तिची संततीप्राप्तीची इच्छा तृप्त झाली नाहीं असें जाणून कर्दमानें आपल्या प्रियेवर संततीचा अनुग्रह केला. त्याच्यापासून तिला नऊ कन्या झाल्या. पत्नीला गर्भसंभवावस्था होतांच गृहस्थाश्रमाचा त्याग करावयाचा अशी त्याची प्रतिज्ञा होती. तीस अनुसरून त्यानें नऊ शरीरें धारण करून नऊ कन्या उत्पन्न केल्या. त्या कन्या सुस्वरूप होत्या. कन्याप्राप्तीनें देवहूतीला आनंद वाटला. पण पतीच्या प्रतिज्ञेबद्दल तिला दुःख झालें. ती डोळ्यांत आंसवें आणून पतीला ह्मणाली, “ आपण मला अभय द्यावें. माझी आपणास एक विनंति आहे. विवाहसमयीं आपण प्रतिज्ञा केल्याप्रमाणें आपण आतां वनांत जाल. आपला वियोग मला सहन कसा होईल. या कन्या आपापल्या सासरीं जातील. आपण गेला ह्मणजे मला ज्ञान सांगण्यास कोण आहे. आजपर्यंतचा सर्व काल उपभोगांत गेला. मी आपल्या संगतीं असून मला अद्याप ज्ञानलाभ झाला नाहीं. आपण साधु आहां. मी आपली अर्धांगी आहें. आपल्यासारख्या सज्जन पतीच्या सहवासांत मीं बहुत काळ घालविला. मला संसारभयापासून आपण मुक्त करा. आपल्या सहवासांत इतके दिवस राहून मी आजपर्यंत या संसार-

बंधाचा विचार केला नाहीं त्या अर्थी मी मायेनें फसलेली आहें. आपण मजवर पुत्राचा अनुग्रह करून मला मोक्षाची प्राप्ति होईल असें करा."

देवहूतीची विनंति ऐकून कर्दम म्हणाला, "प्रिये! सद्गुणसंपन्न व पतिव्रता स्त्रिया शोकरहितच असावयाच्या. तूं स्वस्थ ऐस. तू आजपर्यंत जसें आचरण केलेंस तसेंच आचरण करीत रहा. दानें, व्रत, नेम, इंद्रियनिग्रह, पतिसेवा यांचाच आश्रय कर म्हणजे तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील आणि तुझी अहंकारग्रंथी तुटून तूं परमपदाला जाशील."

देवहूती पतीला देव मानी. पतीचा शब्द म्हणजे तिला वेदाज्ञाच वाटे. तिचें प्रखर पातिव्रत्य पाहून भगवान विष्णूंनीं तिच्या पोटीं अवतार धारण केला. त्या पुत्राचें नांव कपिल असें ठेविलें. कपिल मोठा होतांच कर्दमानें संन्यास घेऊन अरण्याचा मार्ग धरिला. त्यानें अहंकार, द्वेष, प्रेम यांचा सर्वस्वी त्याग केला. तो सर्वत्र परमेश्वरच पाहूं लागला. तहान, भूक, दुख, मोह, जरा, मृत्यु या त्याच्या साहाही लहरी शांत झाल्या. ईश्वराच्या अखंड भक्तीनें तो सर्व बंधनापासून मुक्त होऊन उत्तम गतीस जाऊन पोहोंचला.

आपला पिता कर्दम हा वनांत गेल्यानंतर कपिल आपल्या मातेजवळच राहिला. तो महाज्ञानसंपन्न होता. आपल्या पुत्राचा अधिकार लक्षांत आणून देवहूति त्याला ह्मणाली, "हे सत्पुत्रा; मी अज्ञानांधःकारानें व्यापून या प्रपंचांत पडलें आहे, मला ज्ञान सांग. मला या संसाराचें मर्म सांगून हा मायामोह दूर कर."

आईची इच्छा जाणून कपिलानें सांगितलें, "मनुष्यास मोक्षप्राप्तीचा उपाय म्हटला ह्मणजे आध्यात्मयोग होय. अंतःकरण हें आत्म्याच्या बंधमुक्तीचें कारण आहे. विषयासक्ती बंध उत्पन्न करते. हरिभक्ति मोक्ष देते. ब्रह्मप्राप्तीचा खरा सुलभ उपाय ह्मणजे निष्कामभक्ति होय.

सत्पुरुषांच्या संगतीनें भक्ति उत्पन्न होते. इंद्रियांमुळें विषयांचा अनुभव घेता येतो पण इंद्रियांचें खरें कर्म तें नव्हे. वेदविहित कर्माचें अनुष्ठान करणें हें इंद्रियांचें कर्तव्य आहे. कर्माच्या फलाविषयीं अभिलाष न धरितां सर्व सत्कर्मे परमेश्वराच्या चरणीं अर्पण करून एका परमात्म्याच्या ठिकाणींच आसक्ति ठेवणें हा भक्तियोग होय. भक्ताचा कधींही नाश होत नाहीं. सर्वांना ग्रासणाऱ्या कालचक्राचेंही हरिभक्तापुढें कांहीं चालत नाहीं. मनुष्यानें सद्भावपूर्वक ईश्वराची भक्ति करणें हाच त्याच्या कल्याणाचा उत्तम मार्ग होय."

कपिलाचें भाषण ऐकतांच देवहूतीस आनंद वाटला. त्याच्या तोंडून ज्ञानाचे सिद्धांत बाहेर पडून जगाचें व त्याबरोबर आपलें कल्याण व्हावें या हेतूनें तिनें त्याला अनेक प्रश्न विचारिले. आईच्या प्रश्नांस अनुसरून कपिलानें तिला निरनिराळीं तत्त्वें व त्यांचीं लक्षणें सांगितलीं. चतुर्व्यूहोपासना म्हणजे काय हें त्यानें तिला समजावून दिलें. ज्ञानप्राप्तीची अवश्यकता कां आहे याचाही त्यानें तिला बोध केला. दृढभक्ति, तीव्र वैराग्य, तें प्राप्त होण्याचीं साधनें, संसारभयाच्या नाशाचा उपाय, योगाचे भेद, सबीज योगाचें स्वरूप, आसनादिकांचे नियम, नवविध भक्ति, सदाचार, मनुष्यजन्म, मनुष्याची सांसारिक स्थिति, कर्माकर्म, यमदंड, काम्यकर्म, वगैरे गोष्टी त्या कपिलपुत्रानें आपल्या मातेस यथास्थित समजावून दिल्या. नंतर देवहूतीनें त्याला निष्कामभक्ति व परब्रम्ह यांविषयीं प्रश्न करतांच तो म्हणाला, "निष्कामभक्तीपासून संसाराबद्दल विरक्ति उत्पन्न होते. वैराग्य प्राप्त झालें असतां परब्रम्हाचा साक्षात्कार करून देणारें ज्ञान प्राप्त होतें. भक्तीनें अंतःकरण शुद्ध होतें. त्याचें मन भगवद्स्वरूपीं निश्चल झालें म्हणजे त्याच्या मनांतून सर्व वैषम्य, विकल्प व भेद नाहींसा होतो. त्याला आपण परमानंदाप्रत पोहोंचलों आहों अशी खात्री पटते.

ज्याच्या ठिकाणीं त्याज्य व ग्राह्य हा भेद नाहीं, जो निःसंग व ज्ञानरूपी आहे, ज्याच्या ठिकाणीं द्रष्टेपण व दृश्यत्व यांचा मिलाफ झाला आहे, तो ज्ञानस्वरूप आत्माच ब्रह्म होय असें त्याच्या अनुभवास येतें. त्यालाच उपनिषदें परब्रह्म म्हणतात. योगशास्त्रें त्यालाच ईश्वर म्हणतात, सांख्यशास्त्र त्यालाच पुरुष अशी संज्ञा देतें. त्यालाच भक्तियोग भगवान समजतो. वस्तुतः हा संसार खोटा आहे. पंचमहाभूतें, एकादश इंद्रियें, जीव, अहंकार, ब्रह्मांड, जग हें सर्व आत्मस्वरूपाचा भास आहे. याकरितां मनुष्यानें मन एकाग्र करावें, विषयासक्ति सोडावी, भक्तियोगाचा अभ्यास करावा, या योगानें त्याला ब्रह्मसाक्षात्कार होतो. निर्गुण ज्ञानयोग व निष्काम भक्तियोग या दोहींचें फल ब्रम्हप्राप्ति हें एकच आहे. ''

आईला इतकें ज्ञान सांगून कपिलमुनी त्या आश्रमाचा त्याग करून निघून गेले. पुत्राच्या वियोगानें खिन्न होऊन देवहूती आपल्या पतीच्या आश्रमांत समाधि लावून बसली. तो आश्रम सरस्वती नदीच्या मुकुटाप्रमाणें विलसत होता. देवहूतीचा केशभार काळा होता. पण त्रिकाळ स्नान करण्यानें तो चिकटून जाऊन त्याच्या जटा बनल्या. तपामुळें तिचा नाजुक देह कृश झाला. अमोलिक वस्त्रांचा त्याग करून ती वल्कलें नेसूं लागली. आपल्या पतीच्या सामर्थ्यानें प्राप्त झालेल्या सर्व सौख्यद वस्तूंचा तिनें त्याग केला. पतिवियोगाचें तिला दुःख होत होतें त्याचा तिला कपिलाच्या सहवासानें कांहीं विसर पडला होता. कपिलाचाही वियोग झाला तेव्हां तिला सर्व जग भयाण वाटूं लागलें. ज्ञानप्राप्तीनें तिच्या पुत्रध्यासांत कमीपणा येईना. तिनें ऐश्वर्याचा त्याग केला, इतकेंच नव्हे तर तिनें आपल्या शरीरावरीलही प्रेम सोडलें. पुत्राच्या उपदेशाप्रमाणेंच काळ कादावयाचा असा तिनें संकल्प ठरविला. संसाराच्या हव्यासानें तिनें मल-

त्याच उपद्र्व्यापात चित्त घातलें नाहीं. ती प्रथम परमात्म्याचें समग्र ध्यान करी; नंतर निरनिराळ्या अवयवांचें चिंतन करी. आपल्या वैराग्यानें व दृढभक्तीनें तिनें ब्रम्हपदाचें ज्ञान मिळविलें. समाधियोग उत्तम साधल्यामुळें गुणजन्य अहंकार तिला स्पर्शही करीना. तिची शरीरभावना नाश पावली. तपामुळें कृश झालेलें तिचें शरीर विलक्षण तेजसंपन्न दिसूं लागलें. तिच्या देहांत गुप्त ब्रम्हतेज वास्तव्य करीत होतें. अखेर ती देवहूती पुत्रानें सांगितलेल्या मार्गाप्रमाणें योग्य आचरण करून परब्रम्हस्वरूपांत मिसळून गेली. ज्या ठिकाणीं देवहूती ईशस्वरूपाच्या सिद्धीप्रत पोहोंचली त्या ठिकाणाला सिद्धपूर असें नांव आहे. तें अत्यंत पुण्यकारक क्षेत्र आहे अशी अद्यापही लोकांच्या मनांत भावना असल्यानें तेथें नेहमीं हजारों लोक यात्रेला जातात.

---

